अश्विनीकुमारप्रणीत

# श्रीमद्भरताचार्यप्रासादिक

# नाट्यकलारुक्कुठार

ऊर्फ

रा. रा. श्री. कृ. कोल्हटकर ह्यांच्या ‘ संगीत गुप्तमंजूष ’
नाटकावर संभाषणात्मक विनोदी टीका.

ही

**सदाशिव नारायण ठोसर बी. ए. एल्. एल्. बी.**

व

**गणेश सदाशिव मराठे एम्. ए.**

यांनीं तयार करून

पुणें येथें
महादेव नारायण कवडे यांच्या ‘ शारदा ’ छापखान्यांत
छापून प्रसिद्ध केली.

**अंतर्गूढानर्थानव्यञ्जयतः प्रसादरहितस्य ।**
**संदर्भस्य नदस्य च न रसः प्रीत्यै रसज्ञानाम् ॥**

आर्या सप्तशती.

---

सन १९०८.

**किंमत १२ आणे.**

ज्या रसिक व मार्मिक लोकांस

ह्या आमच्या प्रयत्नाचें

कौतुक वाटेल.

त्यांस

हें पुस्तक

अर्पण केलें असे.

ग्रंथकार.

# शुद्धिपत्र.

| पृ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ८ | ९ | स्त्री नृत्यं | स्त्रीनृत्यं |
| ,, | १० | पुं नृत्यं | पुंनृत्यं |
| ,, | २४ | जिल्ह्या | जिल्हा |
| २३ | ८ | चेवैतुहि | चवैतुहि |
| २९ | १० | माषणांत | भाषणांत |
| ४५ | ५ | हृदयांत | हृत्प्रांत |
| ५० | ३ | ( टाइप उडाला आहे ) | असेल |
| ५३ | १८ | वर्षे | वर्षी |
| ६९ | ४ | तूं कथीं...संप्रती | तूं कथीं या प्रती संप्रती |
| ७२ | ९ | मुळिं त्या न | मुळिं न त्या |
| ७५ | ४ | वाचतों | ( वाचतों ) |
| ८० | २१ | जगतीं | जगतिं |
| ८५ | २० | अरे ! अरे | अरे ! अरे ! |
| ८८ | ७ | कारावा | करावा |
| ९५ | १० | स्वयंस्वरास | स्वयंवरास |
| ११० | ९ | र रिपूतें | र रिपुतें |
| १३८ | १७ | सारखी | सारखी |
| १४० | १५ | सास्वाम्ताचा | सास्वान्ताच |
| १४२ | १७ | स्संशय | संशय |
| १४३ | १९ | ज्ञाताज्ञाताभाव | ज्ञाताज्ञातभाव |
| १४४ | १० | सेक्सपीयर | शेक्सपीयर |
| १४९ | ६ | पासुन | पाहून |
| १५१ | ११ | अलें | असें |
| १५६ | १८ | कहून | कडून |
| १५८ | शे. | राज्याला | राजाला |
| १६२ | १५ | त्या | ह्या दोन्ही |
| १६४ | २० | निला | तिला |
| १६५ | ६ | उघड | उघड |

# ग्रंथकर्त्यांचे चार शब्द.

टीकात्मक ग्रंथ बहुतकरून मोठ्या गंभीर भाषेंत लिहिलेले असतात. त्यांतील तत्वें व विचारसरणी कितीही उत्तम प्रकारची असली, तरी ज्या विषयावर ते लिहिलेले असतात ते विषय जर मोठमोठ्या राष्ट्रीय प्रकरणांपैकीं नसतील किंवा मोठमोठ्या योध्यांची अथवा मुत्सद्यांची चरित्रें नसतील, किंवा एखाद्या गहन शास्त्रांतील अगर वेदांतांतील प्रमेयें नसतील तर असले ग्रंथ क्वचितच लोकप्रिय होतील. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे गंभीरपणानें ग्रंथ लिहिण्यास विषयही भारदस्तच असावा लागतो. केवळ मनोरंजक ललितकलेचे विषयावर जर कोणी गंभीरपणाचे लेख लिहूं लागले तर त्यानें शास्त्राधारांचें कांहीं ढोंग केल्याशिवाय त्यांचे लेखांचा लोकांवर व्हावा तसा परिणाम होत नाहीं. सारांश मनोरंजक विषयावर लिहिणें झाल्यास भाषाही मनोरंजक वापरली पाहिजे.

असल्या विषयांवर रूपक, व्याजस्तुति किंवा साधा विनोद हे ज्यांत भरपूर भरलेले आहेत असे लेख गंभीरपणाच्या शास्त्रीय चऱ्हाटापेक्षां मनावर ठसा उमटविण्याचें काम जास्त उत्तम प्रकारानें करूं शकतात. पोपचें Essay on main व स्विफ्टचें Gullivers Travels हीं दोनच उदाहरणें आमच्या वरील विधानाची सत्यता सिद्ध करण्यास पुरेशीं आहेत. मराठी वाङ्मयांत वरील पद्धतीचे नांव घेण्यासारखे लेख 'सुदाम्याचे पोहे', ह्या शिवाय दुसरें कोणतेही नाहींत ह्मटलें तरी चालेल. तरी ही उणीव अंशतःतरी भरून काढावी या हेतूनें हा प्रस्तुतचा प्रयत्न आहे. 'नाटक कसें लिहावें' हा ह्या ग्रंथाचा विषय असल्यामुळें नाटकांतील प्रत्येक अंगाचा सूक्ष्म रीतीनें यथामति विचार केला आहे. हा सर्व ग्रंथ विनोदात्मक असल्यानें लिहिण्याच्या भरांत कोठें कोठें विनोदाचा अतिरेक झाला असेल; शिवाय कांहीं प्रसंग कदाचित् व्यक्तिविषयक भासतील. कारण सर्व ग्रंथ एकतंत्री कादंबरी रूपानें दिसावा म्हणून श्रीयुत रा. कोल्हटकर

यांचें ' गुप्तमंजूष ' नाटक निमित्त मात्र करून हातीं घेतलें आहे. त्यामुळें एका संगीत नाटकावर एवढी मल्लिनाथी करण्याचें काय प्रयोजन आहे असा आक्षेप निघण्याचा संभव आहे. तरी आमची अत्यंत नम्रपणें इतकीच विनंति आहे कीं, ह्या ग्रंथाचा अंतिम विषय ' नाटक कसें लिहावें ' हा आहे हें पूर्णपणें लक्षांत घेऊन सूज्ञ व रसिक वाचकांनीं आमच्या प्रमादाची क्षमा करावी.

कांहीं मंडळींच्याकडून अशी सूचना आली कीं प्रत्येक प्रवेशाचे आरंभीं दिलेला सारांश टीकेचा संदर्भ समजण्यास पुरेसा होत नाहीं. म्हणून आम्हीं सर्व नाटकाचा कथाभाग या पुस्तकाचे प्रारंभीं जोडला आहे. त्याच्या योगानें इष्टकार्य साधेल अशी आशा आहे.

सरते शेवटीं पुण्यपुरीतील रा. रा. वासुदेव शंकर गांधी बी. ए.एल्. एल् बी. श्रीमंत रा. बाबा साहेब पटवर्धन फर्स्ट क्लास आनररी म्यॉजिस्ट्रेट पुणें व मुंबई ग्रॅन्ट मेडिकल कालेजांतील सुप्रसिद्ध नट श्रीयुत बाळकृष्ण शिवराम भिडे यांनीं वेळोवेळीं ज्या उपयुक्त सूचना केल्या त्याबद्दल व रा. रा. गणेश रघुनाथ इनामदार बी. ए. डेक्कन कालेज पुणे यांनीं प्रस्तावनेचा सुंदर लेख लिहिल्या-बद्दल त्यांचे आम्हीं अत्यंत आभारी आहों रा. रा. नरसिंह. चिंतामण केळकर सं. ' मराठा ' ह्यांनीं गेल्या नाट्यसंमेलनाचे प्रसंगीं आमच्या प्रयत्नांची स्तुति करून रा. श्री. कृ. कोल्हटकर ह्यांनाही हें पुस्तक आवडलें असल्याचें सांगितलें त्याबद्दल आम्हीं त्यांचेही अत्यंत आभारी आहों. तसेंच 'शारदा' छापखान्या-च्या व्यवस्थापकांनीं छापण्याचें काम शक्य तितक्या काळजीनें केल्याबद्दल त्यांचेही आभार मानिले पाहिजेत.

**सदाशिव नारायण ठोसर.**
**गणेश सदाशिव मराठे.**

In order to prodnce poetry the Soul must, for the time being, have reached that state of exaltation, that state of freedom from Self-consciousness depicted in the lines:—

I started once, or seemed to start, in pain
Resolved on noble things, and strove to speak
As when a great thought strikes along the brain
And flushes all the cheek,

कवित्व असावें निर्मळ । कवित्व असावें रसाळ ।
कवित्व असावें प्रांजळ । अन्वयाचें ।
कवित्व असावें सोपें । कवित्व असावें अल्परूपें ।
कवित्व असावें प्रज्ञासाक्षेपें । प्रबंधाचें ॥

रामदास.

सारांश ज्याप्रमाणें स्वच्छ हंडींत किंवा लखलखीत कंदिलांत दिवा लावला असला म्हणजे त्याचा प्रकाश बाहेर उजळ पडून त्यास अधिक शोभाही येते, त्याचप्रमाणें आंतील अर्थ सुंदर असून ग्रंथाची शब्दरचनाही जर प्रसादगुणें-करून युक्त असेल तर तो अर्थ एरवींपेक्षां अधिक खुलेल हें उघडच आहे.

( नि. माला अंक २६. )

संस्कृत भाषेचा पक्ष उचलणारांचें जें म्हणणें कीं, तिच्या साह्यानें मराठीस प्रौढता व सरसत्व हे गुण येतात हें जसें खरें आहे, त्याच प्रमाणें महाराष्ट्र भाषेच्या पक्षकारांचें जें म्हणणें कीं, संस्कृताचें मिश्रण अतिशय होणें बरोबर नाहीं हेंही खरें आहे, कारण तसें झालें म्हणजे मूळच्या भाषेचें मातेरें होऊन जाईल हें उघडच आहे. ( निबंध माला अंक २६. )

पुस्तकें कितीही चांगलीं असलीं तरी तीं जर चावट आहेत तर तीं न झां-

लेलीं पुरवलीं असें आमचें, मत आहे. कारण असल्या ग्रंथात जितके गुण अधिक तितका त्यांपासून अधिक अनर्थ होण्याचा संभव. (नि. मा. अं. २७.)

विनोदात्मक लेखाची प्रवृत्ति मराठींत पूर्वी गद्यांत नव्हती व पद्यांतही नव्हती हें उघडच आहे. तशीच ती संस्कृतांतही विशेष म्हणण्यासारखी नाहीं हें तद्भाषाभिज्ञास माहीतच असेल. त्या भाषेंत इतकीं नाटकें आहेत; पण हास्यरसाचा विशेष प्रकार असा एका 'मृच्छकटिकां'त मात्र आहे. प्रहसन नांवाचा एक नाट्यप्रकार प्रसिद्ध आहे खरा, पण त्यांतील विनोद विशेष वाखाणण्यासारखा नसतो. असो; तर ही वरील रीत इंग्रजी भाषेवरून इकडे आली. वर्तमानपत्रें सुरू होऊन त्यांचा फैलाव जसा होत चालला, व जनमनोरंजन हें त्यांचें तत्व होऊन बसलें, तसतसा वरील प्रघात वाढत चालला. लोकप्रसिद्ध गोष्टींविषयीं व लोकप्रसिद्ध मनुष्यांस अनुलक्षून लिहिलेला मजकूर लोकांस मनोवेधक होत गेल्यानें तो मार्मिक रीतीनें लिहिण्याची रीत पडली. त्याप्रमाणें ग्रंथ लिहिण्याचा प्रघातही अलीकडे वाढत चालल्यानें टीका करण्याचा प्रचारही अलीकडे वाढत चालला आहे. ग्रंथाचे गुणावगुण लोकांस दिवसेंदिवस बरेच चांगले कळूं लागले आहेत; व मासिक पुस्तकांचा प्रचार सध्यांहून जर पुष्कळ वाढत चालला तर ग्रंथपरीक्षणांत वाचकांची निपुणताही अधिकाधिक होत जाईल हें उघड आहे. ... ... ... ... ... पुण्यांतील दोन व्यक्तींस अनुलक्षून 'लोककल्याणेच्छू' त 'गोल्या घुबड' या सहीचीं दोनपत्रें व 'ज्ञानप्रकाशां'त 'पढत मूर्ख' या सहीचें एक पत्र अशीं सुमारें चार पांच वर्षांपूर्वी तीन पत्रें प्रसिद्ध झालीं होतीं. तीं अशीं खुबीदार लिहिलीं होतीं कीं, कांहीं दिवसपर्यंत लोकांच्या तोंडी त्याशिवाय दुसरा विषयच नाहींसा झाला. जो तो त्या लोकप्रिय व्यक्तींचें चरित्र गाऊं लागला. तसेंच त्या पत्रांवरून वरील दोघां महापुरुषांस पुरतेपणीं कळून आलें कीं, पुण्याचें पाणी कांहीं निराळें आहे; वनजंबूकन्यायानें आपण पूर्वींच्या ठिकाणीं जी विचित्र लीला केली ती या पुण्यपत्तनांत खपली जाणार नाहीं; तेथें मोठमोठ्यांचीही मति कुंठित होते. (नि. मा. अंक २७.)

रा. रा. वाचक वर्ग यांसः—

श्री गणेशायनमः । श्री सरस्वत्यैनमः । श्री वेदकारेभ्योनमः । श्री व्यास वाल्मीकिभ्यांनमः । तदनंतर हजरत तानसेन व इतर यवनकवींच्या प्रासादिक वाणीला व मंजुल शब्द रचनेला सलाम करावा; त्याचप्रमाणें ' गुणसुंदरीच्या गुर्जर देशीय कवीला जयगोपाल करावा; तसेंच वंगनिवासी ' वंदेमातरम्‌ला ' वंदन करावें, अण्णासाहेबांच्या ' सौभद्रा'ला भद्रमस्तु म्हणावें. देवलांच्या प्रसाद वाणीचें चिंतन करावें. नंतर श्रीयुत कोल्हटकरांच्या स्वतंत्र रचनेला हात जोडावे, तद् नंतर लोकप्रिय पाटणकरांच्या धीटपाठ काव्याच्या धारिष्टाला ' प्रथमं वंदे ' असें म्हणावें. नंतर गल्लीगणेश कवींना त्रिवार प्रणाम जो आहे तो करावा. नंतर शेक्सपीअरचा पिच्छा पुरविणाऱ्या कवि पुत्रकांना ' चिरंजीव ' असा आशीर्वाद द्यावा. नंतर कर्नाटक कवींच्या मधुर गायनाचें अभीष्ट चिंतावें. ' तरुणीशिक्षण नाटिकेला ' व ' बायकांचें बंडा ' ला दंडवत घालावें. त्याचप्रमाणें चिपळूणकर, मोगरे, लेंभे, भिडे इत्यादि आधुनिक जगन्नाथ पंडितांना साष्टांग नमस्कार घालावा! ओंशम् इति श्री काव्य पुराणे कविमाहात्म्य समासे प्रातःस्तोत्रे नित्यपाठे प्रथमोध्यायः समाप्तः ।

याप्रमाणें जे आहे ते प्रभात समयींच्या नित्यपाठाचें पठण करीत रंगभूमीचे म्यानेजर नेत्रमर्दन करीत करीत शरीर यष्टीला उत्थापन देत्साते उभे रहाते झाले. तोंच कसायाच्या दुकाना पुढचे जिभल्या चाटणारे श्वानच कीं काय असें दिसणाऱ्या कविता देवीच्या पुत्रकांचा एक कळप चरणारविंदीं लीन झालेला त्यांना दृग्गोचर होता झाला. त्या आशाळभूतांना पाहून रंगदेवीच्या सूत्रधारांनीं नेहमींप्रमाणें आपल्या भ्रूधनुष्यांचा टणत्कार करून नाकपुड्या बेडकांसारख्या फुगवून आणखी जे आहे ते वदन कांती संतप्त अशा बोक्या प्रमाणें केली. परंतु काय चमत्कार सांगावा! गत रात्रीच्या प्रसंगाचें स्मरण होऊनच कीं काय क्षणार्धांत त्यांनीं मानवी स्वरूप धारण केलें. हा अद्भुत चमत्कार पाहून त्यांतील एक प्रमुख कविपुत्र किंचित हंसून व त्यांतल्यात्यांत आश्चर्य, खेद, उत्कंठा इत्यादि प्रकार करून मोठ्या धैर्यानें बोलते झाले.

प्रमुखकविपुत्र उवाचः—

श्रीमन्महाम्यानेजर साहेब आज हें काय दुश्चिन्ह ! आपली नेहमीची बभ्रुवाहनकांती आज अशी गर्भगलित कां दिसत आहे हें जाणण्याविषयीं आम्ही फारच उत्सुक झालो आहोत. तरी सांप्रत आह्मांस या चमत्काराचें जे आहे ते कारण निवेदन करावें.

श्रीमन्महाम्यानेजर साहेब उवाचः—

बा कवि पुत्रका प्रश्न मोठा चांगला केलास ! तर आतां सांगतों तें साव-धान चित्तानें श्रवण कर.

काल रात्रीं काय चमत्कार झाला. चांदणें कसें लोण्यासारखें शुभ्र पडलें असतां मी भोजनोत्तर आपल्या नगरा बाहेर पटांगणांत हिंडावयास गेलों. कवींची बाडें उलथीं पालथीं करण्यांत माझा जीव उसाच्या चिपाडा-प्रमाणें पिळून निघाला होता. तस्मात् विश्रांतीची फार अवश्यकता होती तरी दूर अंतरावर शेंकडो मशाली पेटल्या आहेत, मोठा गलबला होत आहे असा प्रकार माझ्या दृष्टीस पडला. त्याबरोबर उत्कंठेनें धक्के मारीत आह्मांस त्या स्थलाप्रत खेचीत आणिलें. तेथील प्रकार पाहून माझें लोचन युग साफ दिपून गेलें. थियटरामध्यें टांगलेल्या किटसनच्या दिव्यांनीं आज-पर्यंत माझे डोळे कधींच इतके दिपून गेले नव्हते. इतकें बोलून श्रीमन्म-हाम्यानेजर साहेबांनीं खरोखरीच आपल्या नाटकी रेशमी रुमालानें आपले डोळे झांकले हें पाहून जमलेल्या कविपुत्रकांनींहि तसेंच केलें. ( वाचकांनीं तसें करण्याचें कारण नाहीं. )

श्रीमन्महाम्यानेजर साहेब उवाचः—

पुत्रकांनो मी पुढें होऊन पहातों तो एका भव्य प्रचंड स्त्रीची आकृती दृग्प-थावर अवतीर्ण झाली. ती मोठी प्रचंड होती तरी रमणीय दिसत होती. तिचे नेत्र रात्रजागरामुळें ह्मणा किंवा मदिरापानामुळें ह्मणा आरक्त असून धुंद झालेले दिसत होते. तिचे कपोल अंगरागानें अगर चुंबनातिरेकानें संध्यारागासारखे लाल झाले होते. मुखांत तांबूलचर्वण सारखें सुरू असतांनाही

. . . . .ा रूष्ण वर्ण मधून मधून चमकत होता. याप्रमाणें तें परम .णीय देदीप्यमान स्वरूप पाहून मी मोहित जें आहे तें झालों, चकित झालों; विस्मित झालों. मग त्या देवीच्या संन्निध जाऊन उभा राहिलों. तेव्हां जो चमत्कार दृष्टीस पडला तो अद्भुतच! श्रीकृष्ण परमात्म्यांनीं मातोश्री जी यशोदा तिला आपलें मुख उघडून सर्व विश्वाचा चमत्कार दाखविला ( मग तो मेस्मेरिझमचा किंवा हिपनॉटिझमचा प्रकार ह्मणा ) त्याचप्रमाणें मला पुढील प्रकार दिसला. तिच्या रोमरध्रांचें ठिकाणीं कोट्यावधी प्रेक्षक लोक मला दिसले. ( मी प्रेक्षक लोकांस पूर्णपणें ओळखतों हे आपणास नव्यानें सांगावयास पाहिजे असें नाहीं ) त्याचप्रमाणें तिचे दिव्य वस्त्राचे ठायीं व सर्व अंगविक्षेपाचे ठायीं आपला सर्व नटवर्ग एकवट झाला आहे हें मी तात्काळ ओळखिलें; ( नट वर्गाचा मी प्रमुख चालक आहे हें तुह्मास विदित आहेंच. ) व शेवटीं 'मस्तानीचे गळ्यांतून विडा खाल्लेला जसा आर-पार दिसत होता त्याचप्रमाणें तिचें सुकुमार अंग, ह्मणजे कांचेचें कपाट कीं काय, त्यामधून तिच्या आत्म्याच्या ठिकाणीं सर्व ग्रंथकार व नाटककार या प्राण्यांची गर्दी उसळलेली मला स्पष्ट दिसली. काय सांगावें, पुत्र-कानों! अंगभूत असलेला हा तिचा चमत्कार पाहून मी तिचे सभोंवती दृष्टि फेंकली तों तेच लोक तिच्या भोंवतीं जमले आहेत असें मला स्पष्ट दिसलें, व 'नाट्यकला देवी की जय' असा जयघोष माझ्या कर्णपथावर येऊन आदळला. त्या सर्व लोकांत मोठें घनघोर युद्ध चाललें होतें. अर्थात् 'केशाकेशी, दंडादंडी' हे सर्व प्रकार तेथें होतेच. ही लढाई पहाण्याकरितां डोळे ताणून मी पुढें पाहूं लागलों. तो पुढील प्रकार नजरेस आला.

प्रथमारंभीं आत्म्याचे ठायीं आपल्याच नादांत नाचत असलेले जे कवी व नाटककार त्यांच्यामध्यें आपआपसांत लट्ठालठ्ठी सुरू झाली. त्याबरोबर मुम्बा-पुरीच्या आसपास घिरट्या घालणारे जे हजारो कृमिकीटक आहेत त्यांतील एक भव्य व विशाल पुरुष दंड थोपटून म्हणाला ' देवीचा आत्मा निराकार निर्गुण, निरामय, निर्भंग निर्वेष्टन निर्बंधन असा असावा. कारण ज्या स्थि-

तींत प्राणी जन्मतात, ज्या स्थितींत झाडें वाढतात त्याच स्थितींत त्यानें गायलें पाहिजे व हीच अवस्था निसर्गतः सुलभ आहे. शास्त्र, स... ताल, राग या जिनसांचे ढोंग आह्मांस बिलकुल नको. या सर्वांचा ' रि... सिंग' स्टेशनावरून कडेलोटच केला पाहिजे किंवा डायनामाइटनें यांन... पार उडवून तरी दिलें पाहिजे. या कविपुत्रक म्हणविणाऱ्या पुरुषाचें हें भाषण- ऐकताच हजारों इक्कुरियावाले, हमाल, चर्मकार, धोबी, तेली, गिरणबाबु यांनीं त्याचा जयजयकार केला. व देवीचें भाषण व गायन अशा प्रकारचें असेल तरच आम्ही दौलत जादा करूं नाहीं तर करणार नाहीं अशी त्यानीं धमकी घातली हा प्रकार पाहून संतापानें खदिरांगाराप्रमाणें लाल बुंद झालेला तुमान चढविलेला असा निझामशाहीतील एक कविपुत्रक आपल्या हातांतील ' गुंडांचा सोटा ' उगारून पहिल्या वक्त्याचें अंगावर चाल करून गेला व आवेशानें म्हणाला ' हा मूर्खा देवीचें गायन निराकार निर्गुण व सहज सुलभ असून कसें चालेल ? सुधारलेल्या काळांत निसर्गस्वरूप अत्यंत तुच्छ मानलेलें आहे. आतां तूं ह्मणतोस ' अलंकार शास्त्राला जाळून टाकावें, त्याला मी आनंदानें मदत करीन. प्रासादिक सुलभपणाला लत्ताप्रहार करावा, याही तत्त्वाचा मी बंदा गुलाम आहे. परंतु निव्वळ गद्य भाषणें पेटी, तबला लावून रागदारींत ह्मणायाला सांगशील तर हाच सोटा पहा ! भिऊं नकोस मी काय म्हणतों तें नीट ऐक; अत्यंत क्लिष्ट व कृत्रिम शब्द रचनेचें जाळें विणावें. हें काम करण्यास मोठमोठ्या ' कोशांचें ' सहाय्य घ्यावें. नंतर नवीन चालींची विटाळीं तयार करावींत ( मी त्यांचे पेटंट घेतलें आहे हें बहुश्रुतच आहे व ह्यांस आपले श्रीमन्महाम्यानेजर साहेब साक्षी आहेतच ). नंतर कांहीं तरी नवीन कल्पना जुळवाव्या मग त्या मनोहर किंवा आनंद जनक नसून क्लेश देणाऱ्या असल्या तरी चालतील. वर वर चांगल्या दिसून साहित्यालंकाराचे निकषावर लावल्या तर कुजक्या भुईमुगाच्या दाण्याप्रमाणें निघाल्या तरी चालतील. त्याचप्रमाणें संविधानकाचे ब्रह्मघोटाळे वगैरे करावे व हें काम परकीय वाङ्मयाच्या आधा-

...रानें पार पाडावें. अशाप्रकारें हा मलिदा वरील विटाळ्यांत इवा ... व श्रीमम्महाम्यानेजर साहेब मागतील तेव्हां त्यांस एकदम ...ां तर दोघांचेंहि नुकसान होईल. एका सारखें एक नाद काढणारे ... गर्दी करून ' प्रसाद ' या जगांत होता कां नव्हता असें करून

... मा... ऐकतांच त्याच्या मित्रांपैकीं कांहीं पदवीधरांनीं मामूल वहिवाटीप्रमाणें ...कधाच्या भाषणास अनुमोदन दिलें व त्याबद्दल त्याचें अभिनंदन केलें.

नंतर पुष्कळ कवींचा खडाजंगी वाद होऊन मोठेंच रण माजलें. जों जों या भाषापंडितांच्या हैदोसाला ऊत येऊं लागला तों तों देवीचें मस्तक त्रासानें अतिशय दुखूं लागलें तिचा आत्मा व्याकुळ होऊन तिची मरणप्राय अवस्था झाली. कृष्णलीलेंत गोपी गोफ विणीत असतां त्यांचा रंग होतो खरा पण गोफाची जशी अवस्था होते तद्वत् देवीचा आत्मा पिळवटूं लागला. तसेंच तिच्या तोंडावर प्रेतकळा दिसूं लागली तिचा श्वास बंद झाला. हें पहातांच नट वर्गांनीं कवींच्या शीर्षावरून चालत जाऊन देवीवर एक दिलानें हल्ला केला तंगड्या तोंडींत शिकार करणाऱ्या रथारूढ दुष्यंतानें ' लहान वस्तु ती स्थूल दिसली ' हें पद म्हणत देवीवर चाबुक उडवले. स्टेशनवर किटसनचे दिव्याचा जिकडे तिकडे लखलखाट झाला असतांना सुद्धां आपलेच डोळे झांकून वसंतसेनेचा अंधारांत शोध करणाऱ्या शकारानें देवीच्या अंगावर चाल केली. रुक्मिणीचे महालांतील दासी गातांना वारयोषितेचे हावभाव करूं लागली. बलरामानें आवेशाच्या भरांत एकदां बोधामृताचे ऐवजीं गर्गमुनींचें ... ' प्राशन तर केलें... कण्व ऋषींनीं आपण ' वल्कलधारी म्हणून ...ें म... ...ंडी लागूं नये म्हणून, अंगावर पांघरु... ... आलिंगन द्यावयाच्या ... ...नें नाटक संप...

एकानें तासगांवच्या कसरतींतले कांहीं खेळ दाखविण्यास प्रा
शेवटीं एका वस्तादानें खरोखरीच लोकोमोटिव्ह इंजीन आणून
कावर चालविलें.

हाय, हाय, हें सर्व प्रकार असह्य होऊन देवीस मूर्च्छा आली
कन् खालीं पडली. त्याबरोबर प्रेक्षक समुदाय बेफाम होऊन सै
लागला. सत्यप्रकार काय आहे ह्याचें पुर्ण अज्ञान पसरलें. व इ
णाच्या पंथास लागली. हें पाहून कांहीं सुज्ञानीं परमेश्वराची प्रार्थना केली 'हे त्र
तुझ्या कृपेनें या देवीला उतार पडूं दे' अशी ही भक्तांची प्रार्थना ऐकुन दि
तारे तुटल्याप्रमाणें 'अश्विनीकुमारां' ची स्वारी खालीं उतरली व त्यांनीं आप-
ल्या जवळ असलेल्या तीन रामबाण मात्रांपैकीं मात्रा 'नंबर एक' ची देवीच्या
मुखांत घातली. त्याबरोबर सिनेमाटोग्राफप्रमाणें तिच्या चेहऱ्यावर चलबिचल सुरू
झाली तात्काळ देवी हुषार होऊन मंजुळ व प्रसादउक्तवाणीनें बोलूं लागली.

तिचा आत्मा प्रभातींच्या गगनाप्रमाणें प्रसन्न झालेला दिसला. तोंच लोकप्रसादार्थं त्या अश्विनीकुमारांनीं हजारों पुड्या उधळल्या. इतक्यांत अरुणोदय झाला. त्या बरोबर हॅमलेटच्या बापाच्या पिशाचा प्रमाणें हा सर्व प्रकार नाहींसा झाला. तरी मी चलाखी करून तुह्मां सर्वां करितां एक पुडी आणिली आहे. ती पहा असें ह्मणून त्या श्रीमन्महाम्यानेजर साहेबांनीं 'श्री मद्भरताचार्य प्रासादिक नाट्यकला रुक् कुठार या नांवाचा ग्रंथ कवि-पुत्रकांस दाखविला. तो जसा त्यांना मंगलप्रसाद झाला तसाच तो सर्व वाचक वर्गासही होवो अशी माझी जगन्नियंत्या जवळ प्रार्थना आहे.

ही प्रत्यक्ष घडलेली सर्व गोष्ट मी पाहिली ती आपल्या सर्वांच्या कल्याणाकरितां
बहुश्रुत केली आहे. बरी वाटल्यास आपल्या जवळ ठेवून घ्यावी
करून व ही घडलेली हकीकत सांगतां
ना करावी एवढें सांगून

# विषयांची सूचि.

# नाटकाचा कथाभाग.

राजा मेघनाथ, राजा प्रतीप व दिगंबरनाथ लहानपणीं एका विद्यालयांत शिकत होते. दिगंबरनाथ फार विद्वान् होता, त्यामुळें असा वाद निघाला कीं, विद्या श्रेष्ठ किंवा वैभव श्रेष्ठ ! तेव्हां दिगंबरनाथाला ह्या दोघांनीं कैदेंत टाकून सांगितलें कीं विद्या श्रेष्ठ असेल तर आम्हांपैकीं कोणाचं तरी राज्य हिरावून घे. मेघनाथाला सौदामिनी नांवाची शिक्षणोन्मुक स्त्री प्राप्त होऊन तिच्या पोटीं त्यास नंदिनी हें एकच अपत्य होतें. प्रतीपाची स्त्री बाळंतपणांतच मेली व झालेल्या मुलासंबंधीं ज्योतिष्यांनीं असें भविष्य केलें कीं मुलगा वीस वर्षांचा होण्याचे आंत एका स्त्रीवरून तंटा होऊन, आपल्या बापाचे जीवावर उठेल. त्यावरून प्रतीपानें आपल्या विलास नांवाच्या मुलाला एका पेटी ऊर्फ मंजुषसकट एका दाईजवळ देऊन तिला गुप्तपणें रहाण्यास सांगितलें. ती विलास व स्वतःचा मुलगा वंचक ह्यांस घेऊन प्रतीपाचे येथें येऊन नोकरीस राहिली व विलासाच्या शिक्षणाची नंदिनीबरोबरच सोय झाली. त्या दोघांचें एकमेकांवर प्रेम जडलें. दिगंबरनाथ कैदेंतून सुटका करून घेऊन कांहीं वर्षें गुप्तपणें राहिला व आपले पुत्र शृंगी व भृंगी ह्यांसह मेघनाथाचे नगरीस येऊन "कैलासनाथ, वैद्य व ज्योतिषी" म्हणून प्रसिद्धीस आला. विलासाला पंधरावें वर्ष लागण्याचे दिवशीं मेघनाथ व सौदामिनी ह्यांच्यांत वाद होऊन मेघनाथानें वचन दिलें कीं राज्यांत एक तरी सुशिक्षित असून विनयवती अशी स्त्री दिसल्यास स्त्रीशिक्षणासाठीं शाळा काढण्यांत येतील. इतक्यांत राणीला रात्रीं स्वप्नांत देवीनें दर्शन देऊन सांगितलें कीं सहा वर्षें अज्ञातवास करून सरस्वतीच्या ओघांत आकंठ उभें राहिलें पाहिजे. स्वप्नाचा अर्थ तिनें कैलासनाथाला विचारल्यावरून त्यानें तिला सहा वर्षें गुप्तपणें राहून विद्याभ्यास करण्याची सल्ला दिली. त्यावरून तिनें पुरुषवेषानें प्रतीपाचे नगरीचा रस्ता धरला; परंतु रानांत तिचा घोडा मेला व तीही वाट चुकली. अशा समयास शिकारीसाठीं आलेल्या प्रतीपराजाची गांठ पडली व त्या पुत्र विरहाकुल राजास ह्या सुदामनामधारी तरुणाची दया

येऊन त्यानें त्यास पुत्राप्रमाणें वागविण्याचें कबूल केलें. इकडे सहा वर्षे संपण्याचे सुमारास दाई मेली व मरतांना तिनें विलासाची जन्म कथा तेवढी कैलासनाथास सांगितली व विलासास फक्त पेटी पुरल्याची जागा दाखवून जरूर लागेल तेव्हां उकरण्यास सांगितलें. राणी गेली त्या प्रसंगीं तिच्याकडून कळलल्या कांहीं सांकेतिक गोष्टी सांगून कैलासनाथानें राजावर आपला पगडा बसविलाच होता व रुग्णमार्जार नांवाचें औषध चालू करून त्याला बहुतेक दृष्टिहीन व शक्तिहीन करून टाकलें. दाईनें सांगितलेल्या रहस्याचा त्यानें असा फायदा घेतला कीं प्रतीपाच्या मुलाची जन्मकथा सांगून तूंच प्रतीपाचा मुलगा आहेस असें भृंगीस भासविलें व प्रतीपाकडे जाऊन भविष्याप्रमाणें त्याला ठार मारून त्याचें राज्य घेण्यास सांगितलें; आणि मेघनाथास व शृंगीस भासविलें कीं शृंगीच प्रतीपाचा गुप्त मुलगा होय; त्यावरून राजानें विलास व नांदिनी यांची तातातूट केली. शृंगीचा नंदिनीशीं विवाहही त्यानें केला असता पण ‘ नंदिनीचा स्वयंवर करीन ’ असें राणीस वचन दिलें असल्यामुळें तसें करितां येईना. परंतु राजाच्या संमतीनें कैलासनाथानें अशी युक्ति काढिली कीं, स्वयंवरांत दोन प्रश्न नंदिनीनें काढावे व एक अनीतीचा प्रश्न कैलासनाथानें काढावा व तिन्ही प्रश्न कोणास सोडवितां न आल्यास राजानें वाटेल त्याच्याशीं नंदिनीचा विवाह करावा. भृंगी प्रतीपाकडे पोंचण्याचे सुमारास सुदाम ( पुरुषरूपी सौदामिनी ) परत येण्यास निघाला होता व निघतांनां ‘ मी स्त्री आहे ’ इतकेंच त्यानें प्रतीपास सांगितलें. नंदिनीची स्वयंवरपत्रिका आल्यावरून प्रतीपही सुमंताचे हातीं राज्यकारभार देऊन सुदामाचे पाठोपाठ निघाला. विलासानें पेटी उकरून काढिली तिच्यावरून त्याला इतकेंच कळलें कीं, तो राजपुत्र आहे; त्यावरून त्याला वाटलें कीं, मीं नंदिनीचा भाऊ आहे. ह्यामुळें व नंदिनीची शृंगीवर प्रीति आहे असें वंचकानें खोटेंच त्याला सांगितल्यामुळें तो फार कष्टी झाला. इतक्यांत पांथस्थ ह्या नात्यानें सुदाम त्याकडे उतरण्यास आला. त्यानें सल्ला दिला कीं राजपुत्र म्हणून जिगीषुमंडळांत स्वयंवराचे वेळीं

जाऊन बसावें, राजानें हरकत न घेतल्यास नंदिनीचा भाऊ नाहीं असें समजावें. नंतर सौदामिनीनें राजवैद्यास ओळख देऊन त्याच्या साह्यानें वैराग्याचे वेषांत राजापर्यंत प्रवेश करून घेतला व मिळविलेल्या ज्ञानाच्या प्रभावानें, राजास चालू असलेलें औषध म्हणजे रुग्णमार्जार विष आहे असें ओळखलें; त राजास घेऊं नको म्हणून सांगितलें व खात्री पटण्यासाठीं शर्कीचें औषध त्याला देऊन त्याच्या डोळ्यांत दुसरें औषध घातलें. त्यानें त्याला बिलकुल दिसेनासें झालें, पण दोन दिवसांनीं दुसरें औषध दिलें म्हणजे 'दिव्य' दृष्टि येईल असें आश्वासन दिलें. इकडे स्वयंवराचे दरबारांत शृंगीच राजपुत्रत्व मागूंन सिद्ध व्हावयाचें असल्यामुळें विलासालाही त्याच अटीवर जिगीषमंडळांत बसूं देणें कैलासनाथास भाग पडलें. ( जिगीषु लोक राजकुलीन असले पाहिजेत व यशस्वी राजपुत्राची इतरांनीं एक दिवस सेवा केली पाहिजे अशा अटी होत्या. ) सुदामही मोह नगरीचा राजपुत्र म्हणून जाऊन बसला. पहिले दोन प्रश्न शब्द ओळखण्याची कोडीं होतीं तीं सुदाम व विलास ह्यांनीं ओळखली. तिसरा प्रश्न कैलासनाथानें सांगितला कीं सभेंतील आपल्या खेरीज दुसऱ्या कोणत्याही राजाच्या स्त्रीचे दंडावरील चिन्ह सांगावें. ह्यास विलासानें व सुदामानें हरकत घेतली, पण 'मंत्रशास्त्राचे ज्ञानाचा प्रश्न' ह्या सबबीवर ती राजानें ऐकली नाहीं. अंगावर बाजू येईल असें राजाला बजावून सुदामरूपी सौदामिनीनें आपल्या दंडावरील खूण राजास सांगितली. राजा संतापला पण बभ्रा व वचनभंग होऊं नये ह्मणून सुदामास नंदिनी देण्याचें ठरविलें, तथापि दुसरे दिवशीं डोकें उडवीन म्हणून सांगितलें. सुदामानें विलासाशिवाय बाकी जिगीषू लोकांस सेवेची माफी केली. रात्रीं सुदामानें नंदिनीची कामुकाप्रमाणें मनधरणी केली पण ती दुःखानें बेशुद्ध झाली तेव्हां तिला ओळख दिली. नंदिनीलाही वंचकानें भासविलें होतें कीं, विलासाचें शांति नांवाच्या कुमारीवर प्रेम आहे; ह्याबद्दल उट्टें काढण्याकरितां ती आतां परस्त्री ह्या नात्यानें येऊन तिनें विलासाची निर्भर्त्सना करून त्याच्या दुःखावर डा-

गण्या दिल्या, पण जातांना वचन देऊन गेली कीं, सकाळपर्यंत देह शुद्ध ठेवीन. इकडे प्रतीप सुदामाचे शोधांत असतां त्याला कळलें कीं, त्याच नांवाच्या एका राजपुत्रानें पण जिंकला, त्यावरून त्याला वाटलें कीं, सुदामरूपी स्त्रीनें नंदिनीचा विश्वासघात करण्याकरितां असें केलें, ह्मणून राजाला हें कपट कळविण्याकरितां तो त्याचेकडे निघाला व सकाळीं मेघनाथ सुदामाची चौकशी करीत असतांना तेथें येऊन म्हणाला कीं, 'येथें एक अति दुष्ट स्त्री आहे, ती आपल्या जातीवरच उठली आहे.' विलासाला वाटलें कीं तो नंदिनी संबंधानें बोलत आहे. ह्मणून तो तरवार उपसून प्रतीपाचे अंगावर धांवला. परंतु सुदामानें मध्यें पडून दोघांचें नातें कळविलें. मेघनाथाला बिलकुल दिसत नव्हतें पण सौदामिनीचे सांगण्यावरून राजवैद्यानें औषध लावलें तेव्हां त्याला 'दिव्य' दृष्टि प्राप्त झाली. तेव्हां सौदामिनीनें पुरुषवेष टाकून देऊन आपली हकीगत राजाला सांगितली. इतक्यांत प्रतीपाच्या शिपायांनीं भृंगीला कैद करून त्याच्याकडे आणलें; त्याचें कारण असें कीं भृंगी गेल्यावर कैलासनाथानें त्याला असें पत्र लिहिलें कीं 'प्रतीपाला मारतांना माझ्या सुडाची त्याला आठवण दे.' हें पत्र सुमंताचे हातांत पडल्यामुळें त्यानें त्याला कैद करून पाठविलें. विलास हा प्रतीपाचा पुत्र असें सौदामिनीनें सांगितल्याबरोबर शृंगी व भृंगी आपला हक्क सांगूं लागले. तेव्हां प्रतीपानें खुणेची पेटी मागितली, ती विलासानें दाखविल्यामुळें त्याला नंदिनी मिळाली. सुमंताचें पत्र आल्याबरोबर कैलासनाथाला पकडलाच होता पण त्यानें आपले अपराध कबूल केल्यामुळें व सौदामिनीनें मध्यस्थी केल्यामुळें त्याला क्षमा झाली. राजाच्या ह्मणण्याप्रमाणें सौदामिनी स्वतःच सुशिक्षित असून विनयवती स्त्री सांपडल्याकारणानें राज्यांत स्त्रीशिक्षणालयें स्थापन करण्याचें ठरलें व त्या कामावर कैलासनाथ यांसच मुख्य नेमलें.

———

Natyakala Rukuthar





### अश्विनीकुमारप्रणीत

# श्रीमद्भरताचार्यप्रासादिक नाट्यकलारुक्कुठार

विषयोपन्यास

"ज्या नाटककारांना उच्च शिक्षणाचा गंध नाहीं त्यांनीं आपले नाटकांतून वाटेल तसा धिंगाणा घालावा, मनसोक्त गद्यरचना पद्यरचना करावी आणि येनकेन प्रकारेण पैसे मिळवावे यांत मोठेंसें नवल नाहीं व त्यांना फारसा दोषही देतां येत नाहीं; पण या कवीला उत्तम शिक्षण मिळून त्यानें कवितादेवीच्या हात धुवून पाठीस तरी लागावयाचें नव्हतें !"

"काय ! मुंबापुरी-स्थ अशिक्षित नाटककारांपेक्षां आमचे श्रीयुत रा. रा. कोल्हटकर अधिक दोषार्ह झाले अं ! " मी सुसंतप्त होऊन उद्गारलों.

आमचे मित्र बाबूराव व मी फर्ग्युसन इत्यभिधानधारी विद्यालयाकडे सायंकाळीं विहार करीत होतों. नाटकावरून गोष्टी निघतां निघतां आरंभीं दिलेले उद्गार आमच्या मित्रवर्यांनीं काढले. ते माझ्या श्रवणसंपुटांत प्रविष्ट होतांच सकल अंगाला प्रखर अंगार लाविल्याप्रमाणें मला झालें. नंतर मी माझ्या आवडत्या कवीच्या तिन्ही नाटकांचें स्मरण करून जंगी वाद उपस्थित करणार तोंच बाबूराव सुशांतपणें उच्चारले.

" हें पहा गणपतराव, तुमचा आमचा या विषयावरील वादाचा हा कांहीं पहिलाच प्रसंग आहे असें नाहीं. तुमचें समाधान म्हणून कांहीं केल्यानें होत नाहीं; तर आतां असें करूं. येथें आमच्या एका मित्राच्या वाड्यांत नाट्यकलेचा जीर्णोद्धार करण्याकरितां मोठमोठ्या निवडक विद्वानांची एक सभा स्थापन झाली आहे व तिची बैठक आजपासूनच सुरू आहे. तुम्हाला मजबरोबर येण्यास मुळींच हरकत नाहीं. त्या मंडळींच्या टीका ऐकून तुह्माला आपलें मत खात्रीनें बदलावें लागेल. चला आजपासून आपण तेथें जात जाऊं "

ही गोष्ट मला मानवली व मी त्या ठिकाणीं रोज जाऊं लागलों. त्याचा परिणाम काय झाला तर आरंभीं ' नाटक रचावें कसें ' मग ' नाटक करून दाखवावें कसें ' व शेवटीं ' नाटक पहावें कसें ' या तीन गोष्टींचा सुविस्तृत रीतीनें त्यांनीं कसा उहापोह केला व प्रत्येक प्रसिद्ध नाटककाराला क्रमाक्रमानें हातीं धरून त्याच्या कृतीचें विलक्षण बारकाईनें सर्व दृष्टींनीं सुरस व मनोरंजक तऱ्हेनें गुणदोषविवेचन कसें केलें इत्यादि गोष्टी आधीं सांगत नाहीं, योग्य प्रसंगीं वाचकांस त्या कळतीलच.

विषयविस्तार

भोजनोत्तर आम्ही बापूसाहेब घरवाले—बाबूरावांचे मित्र—यांच्या भव्य वाड्यांत प्रवेश केला. पहारेकऱ्यानें मंडळी गच्चीवर बसली आहे असें कळविल्यावरून अनेक 'सोपानपरंपरांवर' आरोहण करून आह्मी वर गेलों. आह्मी त्या मंडळीला 'गोचर' होतांच त्यांनीं 'मान्यां अतिथीं जनांनां' अनुरूप असें चांगलें स्वागत केलें. बाबूरावांनीं माझा व बापूसाहेबांचा ' परस्पर नामाभिज्ञानविधि ' उरकला. बापूसाहेबांचा ' सु-वर्ण हरिद्रागौर ' असून ' अलक पंक्तिकलाप विशाल भाल–जालवन् ' पसरला होता. त्यांचे ' मृदुलमुरक सु–कपोल सुगुलाबाचि ताजे ' मला वाटले. त्यांनीं इतर मंडळींचा वर सांगितलेला विधि केला. सर्वांचे चेहेरे फारच पाणीदार दिसत होते.

**बापूसाहेबः**—गणपतराव तुह्मी ही मंडळी परकी मानूं नका. अगदीं घरच्यासारखे बसा. ही कांहीं मोठी थोरली सभा नाहीं. बाबूरावांनीं तुमचा भलताच

समज करून दिलासा वाटतो. चार घटका गप्पा मारायला मंडळी जमते झालं. कां बुवा खरं कीं नाहीं ?

**ललितबुवाः**—खरं आहे, पण बुधवारांत गंध्याच्या दुकांनीं केवळ चकाट्या पिटण्यापेक्षां या गप्पा फार उत्तम.

**अर्थभटः**—असो; बापूराव आतां आपण प्रस्तुत विषयाकडे वळूं या. काल आपण जें नाटक पहायला गेलों होतों तेंच आधीं हातीं घेऊं.

**बापूरावः**—ठीक आहे. तें गुप्तमंजूष नाटक घ्या इकडे. बरें पण हें नाटक पहायला तुम्हीं जीं पुस्तकं बरोबर घेऊन गेलां होतां त्यांचा कितपत उपयोग झाला ?

**अर्थभट**—कोल्हटकरांचं नाटक आहे असं जाहिरातीवर पहातांच मीं आपट्यांची संस्कृत इंग्लिश डिक्शनरी बरोबर घेतली, पण वीरतनय नाटकापेक्षां यावेळीं तिचा उपयोग थोडा कमी झाला.

आपट्यांची डिक्शनरी व अमरकोश.

**अमराचार्यः**—माझा ' अमर ' बरोबर होताच म्हणून बरं झालं.

**माभिकरावः**—मीं या बड्या भानगडींत न पडतां ' नाटक कसें पहावें ' हेंच एक पुस्तक खिशांत ठेवलं होतं. पण त्यापासून सुद्धां नाटक लिहिण्याचा उद्देश काय, त्यापासून बोध कांय घ्यायचा कांहीं कळलं नाहीं. व म्हणूनच आतां आधीं त्याच नाटकाला पुढें ओढा.

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

( **प्रवेशाचा सारांशः**—राजकन्या नंदिनी हिच्या दाईचा पुत्र विलास ह्याच्या वाढदिवसानिमित्त ती व तिच्या सख्या बागेंत जमल्या आहेत. त्यांचें बोलणें चालूं असतां राजा मेघनाथ व राणी सौदामिनी येतात व मुली जातात. राजाचा व राणीचा स्त्रीशिक्षणाविषयीं वाद होऊन एक तरी सुशिक्षित व

विनयवती स्त्री आढळल्यास आपण राज्यांत स्त्रीशिक्षणालयें स्थापन करूं असें राजा वचन देतो ).

ललितबुवांनीं नाटक उघडून पहिलें पद म्हणावयास प्रारंभ केला. वीणा, सतार, तबला, पेटी वगैरे साहित्य हजर होतेंच. तरी पदाची चाल नवीन असल्यामुळें बुवांना तें पद नीट साधेना; हें पाहून बाबूरावांनीं आमची शिफारस केली. मग काय सर्वांनीं आग्रह करून मला गायला लाविलें. माझें हें नाटक तर 'नितांत प्रियकर.' त्यांतल्या झाडून सर्व चाली मला पाठ. हो–मुद्दाम चाली शिक-
चालीं करितां नाटक ण्याकरितां तर तें नाटक मीं कमींत कमीं पंधरादां पाहिलं
पंधरादां पाहिलें. असेल मग कां नाहीं पाठ होणार ? नाटकाची प्रस्तावना अर्पणपत्रिकेसुद्धां मला पाठ. तेव्हां अशा 'मत्समरासिक विधुसमचकोरीकृत जन' नाटकावर ही बृहस्पतींची सभा काय तारे तोडते इकडे माझे 'लोचन तारक' लागून राहिले.

'जगदीशा तात असिस कलिकालर । तटवासी
निरखिसि अखिल शिशूंच्या बालिश लीला ॥ ध्रु० ॥
राहु करें झांकि सूर्यनयनांला ।
विधु तिमिरीं मांडि लपंडावाला ।
ही पिंगा घालितसे ग्रहमाला ।
स्वर्गंगा तटिं उडु फुगड्या खेळति जणुं बहु बाला ॥ १ ॥
मेघ पहा आक्रमुनी गगनाला ।
श्रमभारें सोडिति घर्मजलाला ।
वायु धरी क्रीडंत पांशुल तनुला ।

चोंहिकडे तांडव मांडित दीपवि जगता चपला ॥ २ ॥

याप्रमाणें मीं तें पद नितांत सुमनोहर सुस्वर स्वरांत म्हणून दाखविलें. तरी त्या मंडळीस व्हावें तसें समाधान झालें नाहीं असेंच मला वाटलें.

**बापूराव.**—( मला उद्देशून ) पहिल्या चरणाचा अर्थ कळला कां हो तुम्हाला ?

**मीः**—( हळूच ) खरं पुसाल तर मी अर्थाबिर्थाच्या फारसा भानगडींत पडत नाहीं. चाल बरोबर म्हटली कीं नाहीं बोला.

मी अर्थाबिर्थाच्या भानगडींत फारसा पडत नाहीं

बापूराव घरवाले अर्थभटाकडे पाहूं लागले तों त्यांचं नेत्रयुग्म 'संशय कल्लोल लोलोत्फुल्ल' होऊन राहिलं होतं असं मला दिसलं.

**बापू०**—काय अर्थभट ? पहिल्या चरणांत कवी काय म्हणतात ?

**अर्थभट.**—जगदीशा तूं कलीचा आणि कालाचा तात आहेस. कलिकाल हा द्वंद्व समास करावा.

**वाचस्पति**—मग कलिकालां असें अनुस्वारयुक्त रूप पाहिजे.

**मार्मिक०**—कलियुगाचा तात तूं आहेस. बाकी त्रेतायुगाचा तात दुसराच कोणी होता.

**अर्थभट.**—बरं, काल हा शब्द 'युग' अर्थी घेऊन पहा.

**मार्मिक०**-वा ! मग तर छान जुळतं. हे जगदीशा तूं या कलिकालाचा बाप लागून राहिला आहेस म्हणजे या कलीच्यापेक्षांही तूं जास्त भांडखोर आहेस !

**अर्थभटः**—बरं, कलियुगाचा तूं तात म्हणजे शास्ता आहेस.

**अमराचार्यः**—शांतं पापं ! ! तात याचा अर्थ शास्ता कधीं होणार नाहीं. 'तातस्तु जनकः पिता' इत्यमरः

**वाचस्पतिः**-अर्थभट नीट विचार करा.

**बाबुराव**—कलिका म्हणजे ज्या कळ्या त्यांना तूं बापाप्रमाणें आहेस.

**अर्थभटः**—नाहीं नाहीं तसें नाहीं. मी सांगतों हाच अर्थ, ऐका. हे कलिकाला म्हणजे कलीला मारणाऱ्या जगदीशा तूं तात असर्सा.

**मार्मिकरावः**—ठीक आहे. हा अर्थ कांहीं तरी बरा; पण कलिकाला हें विशेषण देवाला देण्यांत काय गूढार्थ आहे, त्या कवीलाच ठाऊक !

**अरविंदशास्त्री**—हं: ! हं: ! ! काय गूढार्थ आहे ह्मणे ! जे आहे ते क-लिकाल. या विशेषणांत 'क' हें अक्षर दोनदां व 'ल' हें सुद्धां दोनदां आलें आहे. वा: ! या पदलालित्यावर तर जे आहे ते आपण खुष होऊन गेलों.

'ल' हें सुद्धां दोनदां आलें आहे.

**मार्मिकराव:**—असो. या कलिकालाचा गोपालकाला बराच झाला ह्मणावयाचा. पुढें 'तटवासी'

**अर्थभट:**—तटवासी म्हणजे तटावर उभा राहणारा, पण हा तट कोठचा हो ? पुढें सुरगंगा आहे तिचा तट असेल कदाचित्.

**मार्मिकराव:**—सुरगंगा नाहीं हो स्वर्र्र्र्गंगा.

**वाचस्पति:**—स्वर्गंगा जरी धरली तरी तिच्या तटावर ईश्वर उभा आहे असा अर्थ संभवत नाहीं.

**अर्थभट:**—मग तटवासी याचा अर्थ तटस्थ वृत्तीनें राहणारा असाच केला पाहिजे.

**मार्मिक०**-शाबाशी ! शाबाशी ! ! तटवासी = तटस्थ. (वस = स्था) ह्मणजे अठरापगड जात असं ह्मणावयाच्या ऐवजीं अठरा शिरोभूषणजात असं म्हणावयाला कांहींच हरकत नाहीं. कारण अठरा हें कायम ठेवून पगड = शिरोभूषण. त्याचप्रमाणें गृहवासी म्हणजे गृहस्थ, उपवासी म्हणजे उपस्थ, सुवासी म्हणजे सुस्थ, प्रवासी म्हणजे प्रस्थ, आणखी देशवासी म्हणजे देशस्थ.

प्रवासी ह्मणजे प्रस्थ.

**बापूराव:**-बरं पुढें 'बालिश लीला'

**अर्थभट:**—म्हणजे मूर्खपणाच्या लीला.

**अमराचार्य:**-सत्य आहे 'अज्ञे मूढ यथा जात मूर्ख वैधेय बालिशाः' इत्यमरः।

**मार्मिकराव:**—बरोबर; ताऱ्यांचें भ्रमण, वाऱ्याचें संचरण, चंद्रसूर्यांचें ग्रहपीडन वगैरे सारा मूर्खपणाचा बाजार ! आहे काय आणि नाहीं काय ! आणि हें सारें पहायला कलिकाल्याला तटवासी करून ठेवलें आहे.

**शीघ्रकवीः**—या जागीं 'बालकलीला' 'बाललीला' 'अद्भुतलीला' 'मोहकलीला' वगैरे शब्द सहज घालतां आले असते.

**अरविंद०**—जे आहे त्ते आपण फार अज्ञ आहां म्हटलं. 'अखिल शिशूं' मध्यें दोनदां शकार आला आहे ना? मग पुढें इजा बिजा तिजा तिसरा 'श' कार अवश्य पाहिजे. 'शिशूंच्या बालिश' जे आहे त्ते तुमचें शब्दालंकाराकडे कांहींच लक्ष्य नाहीं.

तिसरा 'श' कार अवश्य पाहिजे.

**बापूराव०**—बरं पुढें 'उडु फुगड्या'.

**मार्मिकराव०**—( विचारांत पडतो. )

**अरविंदशास्त्रीः**—हँः हँः ! काय हो मार्मिकराव, आपल्या वदंतीला जे आहे त्ते म्हटलं खळंती पडली ! विचार कसला चालला आहे ?

**मार्मिक०**—विचार म्हणून येवढाच कीं, आमच्या येथल्या मुलींच्या तोंडून मी बस फुगडी, पद्र फुगडी, भुई फुगडी, दंड फुगडी इत्यादि प्रकार ऐकतों पण हा 'उडु फुगडी' काय प्रकार आहे कांहीं लक्षांत येत नाहीं.

उडु फुगडी काय प्रकार आहे.

**अमराचार्यः**—काय अज्ञान ! अहो 'नक्षत्रमृक्षं भं तारा तारकाप्युडु वा-स्त्रियाम्' असा अमर आहे.

**वाचस्पतिः**—आतां तुह्मी म्हणाल नक्षत्र, तारा, तारका, असे सोपे शब्द टाकून उडु वरच उडी मारली·ती कां ? तर ते शब्द झाले जुने !

**अरविंदशास्त्रीः**—जे आहे त्ते या कारणांत कांहींच रमणीयत्व नाहीं. मी म्हणतों पुढें फुगडींतला ड आहे म्हणून मागें उडु हाच शब्द कानाला गोड लागतो.

**प्रसादरायः**—तात्पर्य काय ? कीं, शब्दावडंबर करण्यासाठीं सोप्या व साध्या रचनेचे व अतएव प्रसादाचे खून करण्याकडे कवींचें जास्त लक्ष दिसतें.

शब्दावडंबरासाठीं प्रसादाचे खून

**बापूराव.**—पुढें ' **चोंहिकडे तांडव मांडित दीपवि जगता चपला** '

**वाचस्पति.**—' दीपवि ' हें रूप चूक आहे दिपवी असें पाहिजे.

**शीघ्रकवी.**—मग ' दिपवी जगता चपला ' असेंही जुळेल.

**बाबुराव.**—पण संस्कृत धातु दीप असा आहे; मग दीपवि असें रूप न चालवायचास काय झालें ?

**मार्मिकराव.**—पण तुह्मी संस्कृतमध्यें पदें करतां कीं मराठींत ? तें तरी एकदां कळूं या नीट.

**वाचस्पति.**—चपला तांडव करते मग शंकर लास्य करतो तर ! ' स्त्री नृत्यं लास्यमाख्यातं पुं नृत्यं तांडव स्मृतं ' याप्रमाणें संगीतनारायणांत सांगितलें आहे.

**अरविंदशास्त्री**--अहो कसलं संगीत न् कसला सत्यनारायण घेऊन बसलांत, जे आहे त्ते पुढें' मांडित ' असल्यावर मागें कोण नाहीं तांडव करणार.

**अर्थभट.**—असो, एकंदरींनें पहातां या पद्यांत अर्थगांभीर्य चांगलें आहे.

**अरविंदशास्त्री.**--जे आहे त्ते पदलालित्यही ठीक आहे. ' तांडव मांडित मांडि लपंडावाला. '

**मार्मिक॰**–मांडिल पंडावाला ( मेळ्यांतील एक पद पुटपुटतो.) ' बंडावे पुंडवि लांडे शिवाजी नृपती. '

**प्रसादराय.**--दुर्बोध रचनेमुळें दोन तीन चरणांत प्रसादाची गर्दनछाट झाली आहे.

**मीः**·–( धीटपणानें ) चाल फार गोड आहे.

**रागोपंतः**—चाल ठीक आहे, सोपी असून मधुर आहे हें खरें; तथापि या पदाचा राग कोणता तो पहा. राग आहे पिलु. आतां झिंजोटी, जिल्हा, काफी व पिलु हे राग जरी वाटेल तेव्हां ह्मणतात तरी नाटकाच्या अगदीं पहिल्याच नांदीच्या पदाला पिलु ह्मणणें हें

राग मीमांसा

साहित्यशास्त्रास अनुचित होय. नाटकाचा प्रारंभ मोठ्या गंभीर व उदात्त पदांनीं केला असतां प्रेक्षकांची उत्कंठित वृत्ति एकदम शांत होऊन नटांची रंगभूमीवर छाप बसते. हें साध्य होण्यास तालामध्यें चौताल उत्तम व त्यास जर का त्या कालास अनुरूप असा जो राग म्हणजे पूर्वी, यमन, हमीर, भूपकल्याण, छायानट अशांची जोड मिळाली तर अशी बहार होऊन इतका आल्हाद होतो कीं, पहिल्याच प्रवेशास रंगदेवता साध्य झाली असें वाटतें. यास प्रत्यंतर शारदा नाटकाचा प्रारंभ. पडदा वर झाल्यावर हमीर रागाचे सूर कानीं पडल्याबरोबर मन रंगून जातें. त्याशीं तुलना करतां पिलु, धुमाळी, झिंजोटी अगदीं साधे व बेचव लागतात. बरें एकंदर प्रवेशाचा विचार केला तर ' आकाशाच्या गालिं गुलाबी लालि निघाली ' इतकी पहांटेची वेळ आहे. अशा वेळीं पहांटेचे राग घातले तर ते सुद्धां गोड लागतील, परंतु पिलु रागानें प्रथमारंभीं तरी समाधान होत नाहीं.

मी ही टीका ऐकून भांबावूनच गेलों. ही स्वारी साध्या पिलु रागावर इतकी घसरली मग ' वीरतनया ' चे आरंभाला मालकंस घातला आहे त्यावेळीं तर हे त्या नटाचे श्रीमुखांतच भडकावयाचे. मग मी भीत भीत म्हटलें:—

**मीः**—शास्त्रामध्यें लाखों नियमांचीं बंधनें असतात; पण त्याप्रमाणें जर चालूं म्हणाल तर एकही नाटक पूर्ण होणार नाहीं. मग सुधारणा व्हावी कशी !

**वाचस्पतिः**—आम्ही कोणी सुधारणेचे शत्रु आहों असें मला तरी निदान वाटत नाहीं. पण सुधारणाही योग्य त्याच मार्गानें झाली पाहिजे. साहित्यशास्त्राला समूळ हरताळ लावून कसें चालणार ? नाटक जर संगीत आहे तर तें संगीतशास्त्राला धरूनच असलें पाहिजे. खऱ्या मार्मिकास ज्याप्रमाणें बेसूर व बेताल कधीं खपणार नाहींत, त्याचप्रमाणें भलत्यावेळीं भलता राग गायलेला चालणार नाहीं, लागलाच त्याचा रसभंग होईल. इतर परिस्थितीचा परिणाम जर बाजूस ठेवून विचार केला तर तुम्हास असें कळून येईल कीं, दिवस व रात्र यांच्या प्रत्येक प्रहराबरो-

संगीत साहित्यशास्त्राचीं मूलतत्वें

वर मनुष्याच्या नैसर्गिक मनोवृत्ती बदलत असतात. अगदीं पहांटे गंभीर, पुढें पुढें थोडी शृंगारयुक्त, पुन्हां गंभीर, सायंकाळीं शृंगारयुक्त ती मध्यरात्रपर्यंत. पुन्हां पुढें गंभीर इत्यादि व त्याप्रमाणें साहित्यकारांनीं रागदारीची रचना ठरविली आहे व ती फारच बारीक विचार करून मार्मिकपणानें केली आहे. गद्य भाषणांत ज्याप्रमाणें अमुक तऱ्हेनें ठांसून स्वरोच्चार झाला असतां संतापाचें भाषण बरोबर उठतें, मृदु व उत्कंठायुक्त स्वरानें शृंगार येतो, रडक्या स्वरानें शोकरस, हास्ययुक्त स्वरानें हास्यरस उत्पन्न होतो, त्याचप्रमाणें संगीताची रचना असते. अमुक एक रस अमक्या वेळीं मनांत उत्पन्न होतो, त्यावेळीं त्या रसाला अनुरूप असेच सूर काढले पाहिजेत म्हणजे ते सूर ज्या रागांत असतील तेच राग गायले पाहिजेत, म्हणजे तुम्हांला त्यापासून खरा आनंद प्राप्त होईल. आवेशयुक्त भाषण जसें रडक्या स्वरांत चालणार नाहीं, त्याचप्रमाणें समजा सायंकाळाला अनुरूप असें शृंगारयुक्त पद आसावरी किंवा मांड रागांत उपयोगाचें नाहीं. हीं जीं संगीत शास्त्राचीं मुलतत्वें तीं कायम ठेवून मग काय वाटेल ती सुधारणा करा. मग सूत्रधार नटीचा प्रवेश गाळला तरी चालेल, पण प्रारंभच मालकंसाला करूं नका, इतकीच हात जोडून विनंति आहे.

**मी:**—आतां रागावरून गोष्टी निघाल्या म्हणून विचारतों. नाटक सुरू होऊन बराच वेळ झाला तेव्हां अशा उत्तररात्रीं एखादा दुपारचा प्रवेश आला. मग तेथें सारंग म्हटलेला गोड लागेल कां ?

**रागोपंतः**—जरूर लागेल. कारण आहे. नाटक हें दृश्य काव्य आहे नाटक पहात असतां प्रेक्षकांचीं मनें त्या त्या भूमिकावर फिरलीं पाहिजेत, रडलीं पाहिजेत, हंसलीं पाहिजेत व त्या त्या प्रवेशामध्यें एकरूप होऊन गेलीं पाहिजेत. रंगभूमीवर दुपारचें वर्णन चाललें असत. खरोखरीच दुपार आहे असें जो भासवतो तो खरा कवी व असें ज्याला भासतें व नाटकगृहाबाहेर रात्र आहे हें जो विसरतो तोच खरा सहृदय

मध्यें रात्रीं सारंग

प्रेक्षक, हें तत्व लक्षांत ठेवून जरी मध्यरात्रीं तुम्ही सारंग गायलां तरी नाटक पहात असतां रसभंग न होतां तो गोडच लागेल.

शीघ्रकवी आपलें बाड घेऊन आतां पुढें सरसावले व त्याच चालीवर त्याच अर्थी आपलें सुधारलेलें पद गाऊं लागले.

जगदीशा तात असति तूं सकलां।
स्वच्छंदें राहुनि रमसी निरखित बालकलीला ॥ध्रु०॥
राहुकरें झांकि सूर्य नयनांला।
तिमिरिं सुचे लपंडाव चंद्राला।
ही पिंगा घालितसे ग्रहमाला।
सुरगंगातटिं जणूं तारा फुगड्या घालिति बाला ॥ १ ॥
मेघांचा गगनांगणिं धिंगाणा।
घामाच्या धारा आणित त्यांना।
धूलिमधें खेळ रुचे या पवना।
चोंहिकडे चमकत अवचित दिपवित अखिलां चपला ॥२॥

झालें. याप्रमाणें एक पद झालें. असा जंगीं वाद आणि तो एका पदासाठीं मी जन्मांत ऐकला नव्हता. ह्मणून 'वाद तरंगासवें विवश वाहतों जवें' अशी माझी अवस्था झाली. मंडळीनें पानसुपारी खाण्यास सुरवात केली. मीही पाणी पिऊन हुशार होऊन बसलों. हें पाहून बापूरावांनीं नाटक माझ्याच हातीं दिलें व मीं वाचण्यास सुरवात केली.

"सुनंदा—शब्दावरून हें बायकोनंच केलं असलं पाहिजे"

मार्मिक०—आणि अर्थावरून पाहिलं तर एखाद्या जाड्याभरड्या पुरुषाचें हें काम असावें, नाहीं ?

गद्यगदाधर—काय ह्मणतां ! 'शब्दावरून हें बायकोनं केलं असावं ?' काय

साधी रचना होती हो त्या पदाची. 'कलिकाला, तटवासी, उडु, स्वर्गंगा, पांशुल तनु' वा, अगदीं बायकांच्या तोंडचे शब्द !!! काय मार्मिक–पंडत ?

**मार्मि॰**—वा ! हें काय विचारावें ? परवां मी बाहेरून आलों तेव्हां आमच्या धुळींनें भरलेल्या जोड्याकडे पाहून आमचें कुटुंब म्हणालें 'इश्श हा इतका पांशुल तनु व्हायला गेला होतां तरी कुठें ? '

इश्श ! हा इतका पांशुल तनु व्हायला गेला होता तरी कुठें ?

**मी**–म्हणजे काय ? फुगड्या, पिंगा, लपंडाव हे नाहीं का बायकांचे शब्द ?

**गद्यगदा॰**—असतील, पण हें सारें दिसतें कसें समजलांत कां ? एखादा शास्त्री गहन वेदांतावर भाषण करीत असतां मध्येंच त्याच्या मुलीनें 'एक होती ऊ तिला झाली टू' असें म्हणावें त्याप्रमाणें.

**मी**–पुढें **'सुनंदा त्यांची धारणा शक्ति मोठी विलक्षण आहे म्हणतात'**

**मार्मिक॰**—( संशययुक्त मुद्रेनें ) कसली शक्ति ?

हें वाक्य ऐकल्याबरोबर सर्व कुचेष्टेनें हंसू दाबून घेऊं लागले. कां तें मला कांहींच कळेना.

**गद्यगदा॰**—ही बायकांची भाषा बरं कां; अवलोकनप्रचुर निरीक्षणसंवृद्ध धारणाबुद्धिः ! वा, छान !!

**बाबु॰**—**" ताराः–त्यांना शंभर वर्षें औक्ष असो. "**

**मार्मिक॰**—हं. येथें मात्र कवी शुद्धीवर आले बरं का. कीं या बायका बोलत आहेत.

**मी**—**"त्याचा वाढ दिवस आहे तो नंदिनी प्रेमानं पाळणार आहे.'**

**मार्मिक॰**—पाळणार आहे ? वाढदिवस नांवाचा एखादा कुत्रा असेल.

**मी**—खूप ! पाळणें हा शब्द दुसरीकडे जसा लावीतच नाहींत.

**मार्मिक॰**—हो हो, लावतात तर; सुतक नाहीं का पाळीत. ?

**शीघ्रकवी**—येथें ' वाढदिवसानिमित्त उत्सव करणार आहे ' ' वाढदिवस प्रेमानं साजरा करणार आहे ' ' त्या निमित्त नानाप्रकारचे खेळ खेळणार आहे. ' इत्यादि प्रयोग जास्ती गोड दिसले असते.

**गद्यगदा**०—काय हो, या विलासाच्या वाढदिवस पाळण्यांत स्वतः तो विलास नाहीं कुठें दिसत. तोही एक यांच्यांत दडपला असता ह्मणजे स्त्रीशिक्षणाबरोबर स्त्रीपुरुष संमेलन हीही एक सुधारणा घडवून आणतां आली असती.

**मार्मिक**०—म्हणजे काय ? विलासाची भूमिका घेणारें पात्र मुलामुलींत शोभण्यासारखें नसेल कदाचित्.

**शीघ्रकवी**०—खरें आहे. काय करावं ! आतांशा नाटक करणाऱ्यांतील पात्रांची लांबी रुंदी उंची मोजून आम्हांला नाटकं रचावीं लागतात हो. नटांकरितां नाटकें होत आहेत, नाटकांकरितां नट होत नाहींत महाराज सध्या ! ! 'बस आह्मांला आनंदपर्यवसायि नाटक पाहिजे, शोकपर्यवसायि नको ' असा म्यानेजरांनीं हुकूम फर्मावला कीं आह्मीं लागलोंच मेलेलीं पात्रें उठवायाला. मग एकंदर नाटकाचा विरस कां होईना, तिकडे मग आम्हीं लक्ष देत नाहीं. हो—कसं कां होईना, नाटक स्टेजवर तर आलें पाहिजेना !

नटांकरितां नाटकें होत आहेत ! नाटकां करितां नट नाहींत !!

नंतर मीं ' आकाशाच्या गालिं गुलाबी लालि निघाली ' हें पद ह्मणण्यास प्रारंभ केला. माझा कंठ निसर्गतःच 'मधुमधुर' असल्यामुळें व 'मधुमधून' ( मधुनमधुन ) ताणहि बरीच असल्यामुळें तें पद मीं आपल्याकडून तरी खुप बहारीचें वठवून दिलें व पेटी तबल्याची साथही बरी जुळल्यामुळें मंडळी बरीच खुष झाली असें मला तरी निदान वाटलें. रागोपंतांनांही मान डोलवतांना पाहून मला फार समाधान झालें.

'केलि मिळोनी आह्मी केली ' या ठिकाणीं मार्मिकराव थोडे कावरे बावरे होत व एकदां तर तबल्याची दुगण सुरू होऊन पद ऐनरंगांत आलें असतां ' केलि मिळोनी आम्हीं खाली' असें पुटपुटतांना त्यांना मी स्पष्ट ऐकलें.

केलि मिळोनी आह्मी खाल्ली.

अरविंद०—जे आहे ते या ठिकाणीं ' लवली-वेली-केली केली ' हा चरण घातला तर पदलालित्याला असा कांहीं पूर येईल—

अर्थभट.—कीं त्यांत सारा अर्थ पार वाहून जाईल.

मार्मिक०–मी ह्मणतों ' ल ' ची नुसती बाराखडीच घालावी

ल ला लि ली लु लू ले लै

अर्थभट.–' दोले झोले ' असल्या शब्दांनीं अर्थगौरवाची हानि होते.

प्रसादराय.—मी ह्मणतों या पदांत अर्थगौरवाच्या पाठीस कवी फारसे लागले नाहींत. ह्मणून एकंदर रचना तरी बरीच सरळ झाली आहे व म्हणून प्रसाद थोडासा डोकावतो आहे.

' नशीब त्या कवीचें ' इतकेंच मनांत ह्मणून मी पुढें वाचूं लागलों " प्रिये या बाललीला पाहून मनाला किती तरी समाधान होतें! ईश्वरानें मनुष्याकडे ज्या ज्या भूमिका नेमून दिल्या आहेत. त्या चांगल्या बजावतां येण्यास या उत्तम तालमीच आहेत.

साकी

राज्यधुरंधर उत्तम गृहिणी यांच्या शैशव लीला ।
निपुण तयांना करावयाच्या असाति चिमुकल्या शाला ॥

मार्मिक.—'चिमुकल्या' ही खुद्द नरवीर राजेसाहेबांची भाषा बरं का!

गद्यगदाधर.—तें असो, पण हें काय नवीन संकट ! जें गद्यांत ह्मणायचें तेंच पुढें पद्यांत !! एका विटाळ्याचा फरक ! काय आहे काय ?

मार्मि०–खाशी ! भाषणांत तालमी हा शब्द आहे व साकींत 'शाला' आहे म्हणे जें गद्यांत तेंच पद्यांत.

बाबुरावः–

' निष्कारण तें हास्य मनोहर प्रीति खरी निर्व्याजा ।
' कालें जातों विसरुनि अनुभव शिशु न करिति जरि ताजा॥'

**वाच०**—प्रीति शब्दांतील 'प्री' हे जोडाक्षर पुढें आल्या कारणानें

संयोग ऱ्हस्वास गुरुत्व देतो.

'मनोहर' या शब्दांतील 'र' च्या दोन मात्रा झाल्या व त्यामुळें साकी वृत्ताच्या २८ मात्रा असावयाच्या त्या २९ झाल्या व म्हणून ही साकी सदोष आहे.

**शीघ्रकवी**—" संयोग ऱ्हस्वास गुरुत्व देतो."

**वाच०**—वृत्तदर्पणाच्या असल्या क्षुल्लक चुका सुद्धां ज्याला समजत

हिऱ्या शेजारी कोळसा

नाहींत त्या कवीनें 'निर्व्याजा' सारखे प्रचंड संस्कृत शब्द तरी घुसडू नयेत. दुसरी गम्मत ही; याच 'निर्व्याजा-' ला खालीं प्रास लावला आहे 'ताजा' चा. हिऱ्या शेजारीं कोळसा!

**मार्मिक०**—अहो तें 'ताजा' नसेल 'ताज्या' असेल नीट पहा. ताजा ताजा माल गरमागरम चिवडा मसालेदार.

**मी.**—पुढें

**विद्यानंद मोठा आहे हें मला मान्य आहे.**

**मार्मिक०**—अहो तें विद्यानंद सरस्वती असेल नीट वाचा.

**मी**:—( पाहून ) नाहीं हो.

**शीघ्रकवी**—त्या जागीं विद्येपासून होणारा आनंद असें ह्मटलं असतं तर काय या कवींचें गाठोडें बुडालें असतें !

**मी**—पुढें **विद्येमुळें गर्वाचाही संचार होईल सप्तसुरांतील पहिले दोनसूर माहित झालें कीं गची प्राप्ति होते.**

**गद्यगदा०**—खाशी खाशी ! ठीक आहे चालूं या.

**मी.**—पुढें

**'......श्रीगणेशायनमः या धड्याचा उद्देश हाच कीं, श्रीची प्राप्ती झाली कीं, गची बाधा व्हावयाची हें तत्व समजावें...'**

**वाच०**—काय हो 'विद्या' या अर्थी 'श्री' ची योजना केलेली या कवींना कोठें आढळली ?

**अमराचार्य**—'लक्ष्मीः पद्मालया पद्मा कमला श्रीर्हरि प्रिया' 'संपत्तिः श्रीश्चलक्ष्मीश्च' याप्रमाणें अमर आहे. विद्येला श्री हा शब्द लावलेला अमरांत तर नाहीं.

**मार्मि॰**—अमरांत नसेल; पण मेदिनी, हेमाद्रि हे तर प्राणी मेले नाहींत ना ? बरं कोठें नसला म्हणून काय बिघडलें विद्या ही एक तऱ्हेची संपत्तिच आहे. काय समजलेत.

मेदिनी हेमाद्री हे तर प्राणी मेले नाहींतना ?

**मीः**— पुढें "**करितिल विदुषी सुनीति नाशा ॥ ...... थाट माट दाट भाट...... कैक लोक झोक नोक ...... काल जाल हाल चाल...**"

**मार्मि॰**—हें दाट भाट [ भात ] पाहिजे समजलात कां ? पातळ भात नाहीं कामाचा.

दाट भाट

**गद्यगदा॰**—एक खुबी या कवींची मला कळून आली ती अशी कीं, हे नेहमीं कर्माच्या विभक्तीचा प्रत्यय जो 'आ' तो कर्माला कायम ठेवतात व म्हणून रचना वेडीवांकडी व कर्णकटु होऊन सहजच प्रसादाची हानि होते. काय प्रसादराय ?

**प्रसादराय**—बरोबर आहे. याच जागीं पहाना. 'सुनीतिनाशा करितिल' या ऐवजीं सुनीतिनाश करितिल असा प्रयोग जास्त गोड व सरळ झाला असता.

**शीघ्रकवी**—'नेतिल विदुषी नीति लयाला' हा चरण घाला. खोडा तो पहिला.

**प्रसाद॰**—अहो कर्माची कथा काय ? विशेष्याप्रमाणें विशेषणांच्या सुद्धां हे विभक्त्या बदलतात ( वीरतनय नाटक ) **अनंता** अहोरात्र **तारातती** । त्वदाज्ञेसि **नभीं शिरीं** मानिती ॥

'धूलिपूरित शून्या रसा हि सारी' 'तनुलतिका मोहिका' 'स्थिति दीना नीतिमालिका !'

**शीघ्रकवी**—या ऐवजीं 'किति कोमल ही मोहक तनु जेंवि तनुलता' असें घाला.

**मी**—पुढें

**ज्ञान नका तरि निंदूं । निकटिं वसे कधिं दुर्गुण बिंदू ॥ध्रु०॥**
**वर्षों पुरुषीं अमृता गरला । अबलेवरि कां इंदू ॥१॥ भिजावि**
**नरा स्त्री शुष्कचि ठेवी ज्ञानाचा कां सिंधू ॥ २ ॥**

**प्रसाद०**—अमृता वर्षी गरला वर्षी. कर्माला आ हा प्रत्यय लावल्याशिवाय तें कर्म आहे असें लोकांना जसें कळतच नाहीं?

**बापूसा०**—कर्म आमचें ! !

**शीघ्र०**—'सुधा नरावरि विष अबलेवरि सिंचन करि कां इंदू' असें म्हणा.

**मी**—पुढें 'भिजवि नरा स्त्री' येथें मी ऐटींत ताण घेत असतां—

**मार्मि०**—अरे बापरे, ही स्त्री मोठी दांडगी दिसते तर? चुळाचिळा टाकून पुरुषाला भिजवते काय?

भिजावि नरा स्त्री

**वाचस्पति**—पद म्हणतांना चरणाचे विभाग कसे पडतात याकडे लक्ष न देतां नुसतीं विटाळीं भरायचीं त्याचा हा परिणाम.

**प्रसादराय**—त्याचप्रमाणें 'शुष्कचि ठेवी ज्ञानाचा का सिंधु' शुष्क वा? काय प्रसाद आहे या शब्दांत.

**अर्थभट**—पद्यांतील अर्थ मनोवेधक असून तो नीट तऱ्हेनें सांगतां आला नाहीं म्हणून पद्य कसा विरस झाला आहे.

**वाचस्पति**—या अंतऱ्याच्या चरणाबरोबर आस्ताई पुन्हा पुन्हा झटल्यानें एक मोठा दोष माझ्या लक्षांत आला. ( इकडे माझें धाबें दणाणूं लागलें ) साहित्यशास्त्राचा असा एक नियम आहे कीं उपमा, रूपक वगैरे अलंकार जर तुम्हांला पद्यांत आणावयाचे असतील तर

अंतरा व आस्ताई

अस्ताईमध्यें सर्वसाधारण विधान जें करावयाचें असेल तें असावें व त्या विधानाला पुष्टी आणणारीं इतर विधानें तीं अंतऱ्यांत असावीं. उदाहरणार्थ, (शारदा नाटक)-सावळा वर बरा गौर वधुला ॥ नियम देवादिकीं हाचि पारिपाळिला ॥ ही झाली अस्ताई. अंतऱ्याच्या प्रत्येक चरणाबरोबर अस्ताई पुन्हां पुन्हां म्हणावी लागते, ह्मणून अस्ताईमध्यें साधारण विधान जें असेल तें जरूर असलें पाहिजे व त्याच्या पुष्ट्यर्थ "गौर तनु जानकी राम घननीळ तो वीज मेघास ती घालि माळा" इत्यादि विशेष अर्थाचीं विधानें घालतात. आतां आपण प्रस्तुत पद्याकडे वळूं. अंतऱ्यामध्यें विशेष अर्थाचीं विधानें काय आहेत ? चंद्र किंवा समुद्र यांमध्यें पुरुष व स्त्री यांविषयीं भेदभाव कधीं नसतो. याप्रमाणें पाहूं गेलें असतां आस्ताईत काय पाहिजे होतें ? कीं ज्ञानापाशींही असा भेदभाव नाहीं. म्हणजे अलंकारदृष्ट्या हें पद बरोबर झालें असतें. पण तें दिलें सोडून आणि कवी ह्मणतात 'अहो दुर्गुणबिंदू जरी आढळला तरी तुम्ही ज्ञान निंदूं नका' !!!

शीघ्र०--ज्ञानें नका तें निंदूं। स्त्रीपुरुषीं जें भेद धरीना ॥ ॥ ज्ञान० ॥ सुधा नरावरि विष अबलेवरि सिंचन करि कां इंदू ॥ १ ॥ अवगाहन-सुख पुरुषा देउनि स्त्रीतें त्यजि कां सिंधू ॥ स्त्रीपुरुषीं० ॥ ज्ञान० ॥ २ ॥

( मी मूळ पद्य खरडून त्याचे जागीं हें नवीन लिहिलें. )

नंतर पुढचें पद सुरू झालें.

" मग गृहकार्या कोणि पहावें... ...महानसीं कां त्यांनीं लपावें... ... "

अर्थ०...महानस ?

मार्मि०—हा अननस कुठला ?

**अर्थ**०—किंवा असें असेल; महा नसा यस्य सः, मोठ्या फुगलेल्या आहेत शिरा ज्याच्या.

**अमरा**०—अहो असें काय करतां? समानौ रसवत्यां तु पाकस्थानं महानसे ॥ महानस ह्मणजे स्वयंपाकगृह.

**अर्थ**०—कमाल आहे! अमराचार्य तुह्मी येथें आहां ह्मणून ठीक, नाहींतर सारा अंधेर झाला असता.

**मार्मि**०—[ त्रासून ] करीन तर क्लिष्ठच रचना करीन अशी या कवीनें प्रतिज्ञाच केली असावी!

**शीघ्र**०—[ गातो ] **अंतःपुरि कां त्यांनिं लपावें.**

**मी**०—[ त्याच पदांत पुढें ] **" कर तुमचा वर असुनिहि जातीं ॥ धान्य मागुनी घरघर फिरती ॥ "**

**मार्मिक**०—वडान्याच्या जाती, कैकाड्याच्या जाती, घरोघर फिरती, भिक्षा मागती.

**अर्थ**०—घरघर! येथें मात्र कवीनें साध्या भाषेनें बायकांच्या गृहकृत्यांचा उल्लेख करावयाचा आव घातला आहे. परंतु 'जाती, घरघर' इत्यादि क्षुद्र शब्दामुळें कवितेचें स्वारस्य जाऊन रसहीन व शुष्क असा हा चरण झाला आहे.

**मार्मिकराव**—( निराशेनें कपाळावर हात मारून ) आतां मात्र कविता-

आतां मात्र कविता देवीला घरघर लागली — देवीला घर घर लागली!!!

**मी**०—( पुढें वाचूं लागलों. ) **"सेनापती पण बायकाच...अशा सेनेला जय कसा ठेवलेला...इतर शस्त्रांच्या साह्याला नयनबाण कसे टपून बसलेले"...**

**गद्यगदा**०—शाबास! शाबास! खुबीदार आहे चालूं द्या पुढें.

**मी—"एक मात्र तर्तूद ठेवावी लागेल. सैन्याबरोबर सुइणींची एक लहानशी तुकडी ठेवावी लागेल...शत्रु पक्षाकडील एक तीर सुटल्याबरोबर गर्भिणीस तिची गरज लागावयाची"**

हे भाषण संपतें न संपतें तोंच सर्व मंडळी ओकाऱ्या देत उठली! त्या सर्वांना एकदम हें असें काय झालें हें मला मुळींच कळेना. अकस्मात् भयंकर दुर्गंधी सुटावी किंवा प्लेगनें मरून कुजलेल्या उंदरांची वृष्टि व्हावी त्याचप्रमाणें तो सर्व देखावा दिसूं लागला. मार्मिकराव तर मोरीपाशीं जाऊन भडभड ओकलेच. मला वाटलें त्यांना कॉलन्याचा ॲटॅक झाला. घाबरून उठून मी त्यांना विचारलें काय झालें तरी काय? ते विवळत म्हणाले 'अहो तीं सुइणींची तुकडी!'

मार्मिकराव भडभड ओकलेच

मला न समजून मी प्रश्नलों ( प्रश्न केला ) सुइणींची काय?

**मार्मिक०**—अहो तुकडी.

**मी**—बरें मग तिचें काय?

**मार्मिक०**—त्या शेवटल्या भाषणांतील विनोदरसाचा भुरका मारल्या-बरोबर पहा माझी काय अवस्था झाली ती! ओ!!! ( ओकतो )

माझ्या अंतःकरणांत लख्ख प्रकाश पडला.

पुढें कसेंबसें हो हो करून मंडळी स्वस्थानापन्न झाली व पुन्हा गायन सुरू झालें.

**मी**—"आजवरी बहु विदुषी झाल्या ज्ञानाच्या केवळ खाणी। ...गार्गी ही जी विवेकगर्भा तोषवि निजपतिला वचनीं॥

**अरविंदशास्त्री**—जे आहे त्ते गार्गी गर्भी असेंच पाहिजे.

नंतर पुढचेंच पद मीं मोठ्या गंभीर मुद्रेनें सुरू केलें.

"भानु पहा तीव्र करीं। शीर्ष सुसंतप्त करी॥

**मार्मिक०**—सहस्रशीर्षापुरुषः

**शीघ्रकवी**—भानु पहा तीव्र करी। मस्तक संतप्त करी॥

**मार्मिक०**—म्हणजे याचा अर्थ काय? नुसतें 'संतप्त करी' म्हटलें म्हणजे मग आमच्या 'सु' या भारदस्त संस्कृत उपपदाची गंमत ती काय राहिली!

**प्रसाद**०-या कवींच्या तिन्ही नाटकांतून ‘ सु ’ चा इतका सुळसुळाट आहे कीं, बोलूं नका. ‘च’ ‘वै’ ‘तु’ ‘हि’ हीं जशीं पादपूरणार्थक अक्षरें संस्कृतांत आहेत तसाच उपयोग ‘ सु ’ या उपपदाचा कोल्हटकरानीं आपल्या नाटकत्रयांत कांहीं ताळतंत्र न ठेवतां केला आहे. एक मात्रा कमी असली कीं, कोणत्या तरी चरणानध्यें नामाच्या मागें ते ‘ सु ’ चिकटवून देत असतात. उदाहरणार्थ

---

## ‘ सु ’ चा सुळसुळाट.

पृष्ठ **नाटक ‘ वीरतनय ’.**

३ दयाळा सुविश्वास
४ मृदुल सुरक्त गुलावचि ताजें
६ कंप सुगात्रांसि सुटत
१६ करुं प्रचंड सुमंडपा....। रणवाद्यें जीं सुदुंदुमाद्यें
२६ येऊनि सुनिकटिं
५९ तृप्ति न हो सुमहोत्सव
७१ होइल का अनुरक्त तो सुवीर
७६ अशिही सुगुणखनि...। तेंवि करित सुविहार....
७९ स्तब्ध लुब्ध ममदृष्टि सुमंद्रा । झाली देखुनिया राजेंद्रा । .... सुरम्या
८७ जगदीश्वरची या मम जाणें हृदया सहिता सुप्रेमानें ।

**‘ मूकनायक ’**

९ सुहास मुखहे सुकुनी गेलें



१७ मदिरा ही परि सुसाध्य भारी
५३ करुनी सुकृपां न करी विरसा
५६ मज रुचे न सुवीर्यविहीनता
५८ चरित्रनौका सुकर्ण
६३ जयें निर्मिला सुशब्द प्याला । तो मद्यपी पाहिजेच असला ।
९८ त्यां करिति सुजर्जर खेचर ( !! ) चपलादीप अचिरकर ।
१२७ कशी वद आस धरूं सुयशाची
१२७ लोळते तुझ्या पदांबुजांवरी सुसंपदा
१३२ सुरम्य सौधावरी उभ्या ललना
१३८ करी स्वेच्छा सुविहार
१४३ ज्यावरी करिति प्रेमा सुनिर्मल
१४५ नृप सुरम्य किती हा....। खड्ग जेंवि सुतीव्र ।
तेंवि दिसे नासिकाग्र ।

ईशस्तुति—कीर्ति सुनिर्मल

‘ गुप्तमंजूष ’

५ मिळवितील....सुयशा.... सुनीतिनाशा....।
८ शीर्ष सुसंतप्त
१९ तिळ सुसह्य होइल मातें कैसा ।
२५ परतोनि येइ तोंवरी सुरक्षणा करी
४८ कोणती सुरामा

५५ विश्रमार्थ ईशें निज दिधली सुरुचिर मनुजांहि
६३ सुगुण मुदित खरि
१२९ या सुरूप-गौरवा
१५० सुशांत तदीय करा प्रजा
१४० उचितचि सुचरितजनविरहित
१०१ पंजर शाला अस्थींचा या सुरम्य देहाचा

**मार्मि॰**—अरे! बापरे!! अहो ही 'सू' ची लाखोली कविता देवीवर वाहतां कीं काय? ललितबुवा, ही संभावित 'चे वै तु हि' बरं का?

**मी**—पुढें **"अंबर हें प्रभुलोचन। रवितारक सदा भ्रमण। घर्माचें आलोकन। करित तयाच्या उदरीं॥**

हें कडवें संपवून मी मोठ्या आढ्यतेनें सर्वांकडे पाहूं लागलों. कारण मला जरी स्वतःला या पद्यांतील अर्थ बिलकूल कळला नव्हता तरी माझ्या एकदोन विद्वान मित्रांनीं मला बजावलें होतें कीं, या पद्यांत अति उदात्त कल्पना व उत्कृष्ट कवि प्रतिभा भरून राहिली आहे. म्हणून मला वाटलें कीं, येथें तरी ही चांडाळचौकडी माझ्या आवडत्या कवीला नांवाजील; पण रामाचें नांव!!!

**अर्थ॰**—अंबर म्हणजे आकाश हा प्रभूचा डोळा, सूर्य हें त्यांतील बुबुळ व सूर्याचें तेज ही त्या नेत्राची अवलोकनशक्ति याप्रमाणें यांतील रूपक आहे.

**वाच॰**—वरवर पाहतां ही कल्पना मोठी गंभीर व उदात्त दिसते खरी; पण आंत बुडी मारतांच या कल्पना जलतरंगांत यथेच्छ विहार करतां येण्याऐवजीं चिखलांत पाय रुतून बसतात!! कारण अंबर म्हणजे आकाश हें आहे एक व नेत्रांची नैसर्गिक रचना म्हणजे प्रत्येक प्राण्याला डोळे असतात दोन, मग अंबर हें प्रभुलोचन कसें?

**मार्मि०**–म्हणजे काय ? या कवीचा एखादा एकडोळ्या देव असेल; नाहीं कशावरून ? शंकराला नाहींत तीन डोळे ! म्हणे डोळे असतात दोन ! हेंच हेंच तें. बघनें तीं हींच. असल्या ठरीव कल्पना आम्हीं पार झुगारून देणार बस्स !

**अर्थ०**—बरें पुढें, त्या डोळ्यांतील बुबुळ काय ? तर सूर्य.

**मार्मिक०**–बरोबर ! तुमचीं आमचीं बुबुळं असतील काळीं; फार झालें तर घारीं पण या एक डोळ्या देवाचं बुबुळ असं तसं असतं कीं काय ! वा ! तें अगदीं पांढर सफेत सूर्यासारखं ! ! !

एक डोळ्यां देवाचें पांढरें सफेत बुबुळ

**मी**—( जिकिरीस येऊन ) या उपमेंतील सामान्य धर्म शुभ्रवर्णत्व नसला तर वर्तुलत्व असेल.

**मार्मिक०**—वर्तुलत्व हाच जर सामान्य धर्म ठेवावयाचा असेल तर बाय-सिकलचें चाक कां नाहीं घातलें ? छान वाटोळें असतें. ( दुःखोद्वेगानें ) हाय हाय ! ! मघांशीं कविता देवीला घरघर लागलीच होती; आतां तिचे डोळे पांढरे झाले. राम राम ! !

आतां तिचे डोळे पांढरे झाल

**वाचस्पति**—श्रीमद्भागवतकारांनीं परमेश्वराच्या विराट स्वरूपाचें वर्णन करतांना म्हटलें आहे चंद्र व सूर्य हे त्याचे दोन डोळे. आतां ती कल्पना कोणी-कडे आणि ' रवितारक सदा भ्रमण ' ही कल्पना कोणीकडे !

**मी**—पुढें " **निजकिरणीं दिशा दाहि मृगजलमय करुनी ही । मायामय जगती ही । शिकवितसे नीति खरी ॥**

**वाच०**—मृगजलमय काय ! मृगजलसम असें पाहिजे. बाकी ही कल्पना मात्र चांगली आहे. सरळ असून मजेदार आहे.

**बाबु०**—शीर्ष सुसंतप्त असून या मेघनाथाला हा वेदांत बरा सुचला. बरें चला, येथें पहिला प्रवेश संपला नाहीं का !

**मार्मिक०**—सुटलों.

**गद्यगदा०**—पण कायहो, या नाटकाचा काल कोठचा असावा बरें

**मी**—तें कांहीं प्रस्तावनेंत सांगितलें नाहीं बुवा.

ललित०—हें पहा यांत पुढें एक स्वयंवराचा प्रवेश आहे त्यावरून असें वाटतें कीं, स्वयंवरविधि हिंदुस्थानांत ज्या वेळीं प्रचलित होता त्या वेळचें हें नाटक आहे अशी कल्पना बसते.

गद्यगदा०—स्वयंवराविधि दोन वेळ प्रचलित होता. सीता, द्रौपदी, दमयंती यांचा काल किंवा संयोगितेनें पृथ्वीराजाला माळ घातली तो काळ. बरें या नाटकांत स्त्रीशिक्षणासंबंधीं कांहीं असावें नाहीं कां?

अर्पण पत्रिकेवरून ही गोष्ट स्पष्ट होते

मीः—असावें कशाला? अर्पणपत्रिकेवरून ही गोष्ट स्पष्ट होते.

गद्यगदा०—बरें नाटकांतील पात्रें म्हणजे कांहीं विशिष्ट व्यक्ति जरी असल्या तरी त्याबरोबर त्या कालच्या साधारण जनसमूहाचें चित्र नाटककार दाखवीत असतो; मग मी असें विचारतों कीं, स्त्रीशिक्षणासंबंधीं कडाक्याचा वादविवाद करून 'शीर्ष सुसंतप्त' करणारा समाज द्रौपदी, दमयंती यांच्या वेळीं कुठें होता व पृथ्वीराज व संयोगिता यांच्या वेळींही असले वाद कधीं उपस्थित झाले होते? स्त्रीशिक्षणाची अवश्यकता त्या काळीं लोकांना कधीं वाटली होती? स्त्रिया उत्तम सुशिक्षित निघाव्या म्हणून स्त्रियांच्याच मनाला इतकी तळमळ कधीं लागून राहिली होती? कधीं नाहीं. कारण दमयंतीच्या वेळच्या स्त्रिया सुशिक्षित होत्याच; मग त्यांना 'आह्मांला शिक्षण नाहीं.' अशी आरडा ओरड करावयाची काय जरूर? समाजांत जी उणीव नाहीं ती भरून तरी कशी काढायची व तिच्याबद्दल वादविवाद तरी कसे करायचे? स्त्रीशिक्षण चांगलें असें जर लोकांच्या मनांत कवीला भरवून द्यायचें आहे तर त्रेतायुगांतला राजा द्वापार युगांतली राणी आणून त्यांच्या तोंडीं असला वाद घालायचा हा द्राविडी प्राणायाम कशाला? मुंबई, पुणें, कोल्हापूर असलीं स्थळें दाखवून बाळासाहेब, रमाबाई, कृष्णराव, यमुनाताई असली नावें घालून मग असल्या गोष्टींची चर्चा करावी म्हणजे सद्यःस्थितीचें प्रतिबिंब लोकांना बरोबर दिसतें. व्यास वाल्मीकप्रभृति मुनिश्रेष्ठ बसले असतां

त्रेता युगांतला राजा द्वापार युगांतली राणी

शुद्धलेखन कमिटीचे वादविवाद त्यांच्यांत सुरू केले तर तें जितकें हास्यास्पद दिसलें असतें तितकेंच हें दिसणार.

**मी:**—बरें काय हो, नाटक हें जसें भूत किंवा वर्तमान स्थितीचें दर्शक असतें त्याचप्रमाणें भावी स्थितीचेंही दर्शक असूं शकेल.

**गद्यगदा॰**—हो हो, त्याला काय हरकत आहे?

**मी॰**—( पुढें सरसावून ) मग काय! या नाटकांतही तोच प्रकार आहे. हिंदुस्थानच्या भावी समाजसुधारणेचें हें चित्र आहे अशी कल्पना करा ह्मणजे झालें.

**गद्यगदा॰**—ठीक, ठीक; सतरा हजार राजे एकत्र जमवून त्यांच्या नुसत्या चेहऱ्याकडे पाहून वधूनें वराची निवड करावयाची किंवा भोजराजाच्या दंतकथेपैकीं एखादा गचाळ कूट श्लोक जो सोडवील तोच विद्वच्छिरोमणी समजून त्याला माळ घालायची असले रानटी स्वयंवर पुन्हां आमच्यांत सुरू व्हावेत किंवा नवऱ्यांना शंख करीत टाकून बायकांनीं खुशाल शिक्षणाच्या आमिषानें रात्रीं अपरात्रीं उठून चालतें व्हावें आणि हा सर्व प्रकार एका स्वप्नावर व कुडमुड्या ज्योतिष्याच्या थापांवर विश्वास ठेवून करावयाचा. अशा प्रकारची समाजसुधारणा या कवींनां हवी असेल तर त्यांनीं स्वतःच्या विचारशक्तीची राखरांगोळी केली असली पाहिजे असेंच मला वाटतें. अशा घोटाळ्यांत लोकांनां पाडण्यापेक्षां स्पष्टपणे प्रौढविवाह, प्रीतीविवाह, पुनर्विवाह ( कांहीं निराळ्याच तत्त्वांवर ) बालविधवांना उत्तम शिक्षण देऊन नर्सेस किंवा डाक्टरणी करणें असल्या सुधारणा आह्माला पाहिजेत असें ते धीटपणानें कां नाहीं लोकांपुढें मांडीत? तें अधिक श्रेयस्कर झालें असतें. असो; या गोष्टीचा सविस्तर विचार आतांच करणें अप्रस्तुत होईल; याकरितां आतां पुढच्या प्रवेशाला सुरवात करावी.

रानटी स्वयंवर पुन्हां सुरू व्हावे

**ललित॰**—थांबा, या वाचलेल्या प्रवेशाचा विचार करतांना एका गोष्टीबद्दल या कवींचें आपण सर्वांनीं अभिनंदन केलें पाहिजे.

हें ऐकल्याबरोबर पश्चिमेच्या ऐवजीं आज सूर्य पूर्वेस मावळला कीं काय असेंच मला वाटलें.

**ललितबुवाः**—आणि ती गोष्ट ह्मणजे हीच कीं, वंशपरंपरागत वहिवाट सांगणारें जें सूत्रधार-नटीचें ठरीव चऱ्हाट त्याला या कवीनीं अजीबाद अर्धचंद्र दिला व त्या जागीं ईशस्तवन कायम ठेवून नवीनच पण मोहक अशा प्रवेशाची योजना केली आहे. वीरतनय नाटकांत साधेंच मंगलचरण आहे, पण मूकनायक या नाटकांत विशेष खुबीदार रीतीनें प्रथम ईशस्तवन केलें आहे. प्रथमारंभीं राग व ताल कोणता घालायचा हा विचार क्षणभर बाजूला ठेवला तर अशा रीतीनें नाटकाचा प्रारंभ करणें हें खरोखर फार मजेचें दिसतें व सूत्रधाराच्या नेहमींच्या 'प्रिये पडद्यांतील काम झाल्यास इकडे ये पाहूं' या उक्तींतून सुटल्यासारखें वाटतें. व त्याचप्रमाणें नटीचीं पात्रें रंगवून झाल्यावर सुद्धां पुढें येऊन 'आज कोणतें नाटक करायचें' हा तिचा चमत्कारिक प्रश्न किंवा 'पात्रांची सिद्धता कर' अशी सूत्रधाराची आज्ञा मिळून नटी जावयास निघते, तों पात्रें रंगून पुढें येतात व त्यांना पाहून दुसऱ्या वाटेनें या जोडप्यानें पळ काढणें इत्यादि असंबद्ध गोष्टींना पूर्णपणें हाकलून लावून त्या जागीं या कवीनें काढलेली नवीन पद्धत आपल्याला फार पसंत आहे व त्या सुधारणेबद्दल आम्ही कोल्हटकरांचें मनापासून अभिनंदन करितों.

सूत्रधार नटीला अर्धचंद्र

येथें बाबूराव खेरीज सर्वांनीं टाळ्यांचा गजर केला.

**बाबु०**—ही नवीन टूम फार झोकांत दिसते हें खरें, तथापि तिचें सर्व श्रेय या कवीला देणें इष्ट नाहीं. मुंबईच्या गुजराथी व पारशी कंपन्यांतून मंगलाचरणाचे असेच नानाप्रकार असतात. नाट्यकलाप्रवर्तक मंडळीही नाटकाचे आरंभ पुष्कळ नानातऱ्हेच्या मनोरजक प्रवेशांनीं करिते आणि तेंच अनुकरण या कवीनें केलें आहे. आतां अभिनंदन करायचें असेल तर तें किर्लोस्कर संगीत नाटक मंडळीचें करावें; कारण त्यांनीं जसें वीरतनय नाटक शोकपर्यवसायी होतें तें

आनंदपर्यवसायी करण्याचा कवीला हुकूम फर्माविला, त्याचप्रमाणें अशी नांदी काढून टाकून त्या ठिकाणीं सूत्रधार नटीच घाला असा आग्रह त्यांनीं धरला नाहीं.

---

## प्रवेश २ रा.

( **सारांशः**—कैलासनाथ आपले पुत्र शृंगी व भृंगी यांस आपली हकीकत सांगतो कीं, लहानपणीं तो, मेघनाथ राजा व प्रतीप राजा असे तिघे एका विद्यालयांत होते तेथें विद्या श्रेष्ठ कीं वैभव श्रेष्ठ असा वाद निघाला व कैलासनाथानें पूर्व पक्ष स्वीकारल्यावरून त्याला कैदेंत टाकलें व विद्या श्रेष्ठ हें सिद्ध करण्यास सांगितलें. तेथून सुटका करून घेऊन कांहीं वर्षे अज्ञातवासांत घालवून मेघनाथाचें राज्य घेण्यास तो आला व नंदिनीच्या दाईच्या येथें बिन्हाडास राहून वैद्य व ज्योतिषी म्हणून प्रसिद्धि करून घेतली. म्हणून राणीनें तिला पडलेल्या स्वप्नाचा उलगडा पडण्यासाठीं, त्याला बोलावूं पाठविलें. ह्याच प्रवेशांत दाई, तिचा 'मानीव' मुलगा विलास व खरा मुलगा वंचक ह्यांचा संवाद आहे त्यांत विलास नंदिनीवरील आपलें प्रेम व्यक्त करितो. )

नंतर दुसऱ्या प्रवेशांतील कैलासनाथ शृंगी व भृंगी यांच्या भाषणाला सुरवात झाली.

पृष्ठ १३ यांतील विलासाचा प्रवेश येईपर्यंत मंडळी बरीच खूप झाली असें मला वाटलें.

**गद्यगद्रा०**—स्थाशी! स्थाशी! या प्रवेशांतील भाषणें फारच खुबीदार साधलीं आहेत यांत संशय नाहीं.

**मार्मिक०**—शृंगी, ज्याला नाटकाचा नाद फार लागला आहे, त्याच्या स्वभावाचें चित्र फार उत्तम वठत आहे.

**मी-"दाईः-हा पहा माझा मानीव मुलगा इकडेच येत आहे."**

**मार्मिक०**—मानीव म्हणजे काय बोवा?

**मी**—अहो, मानीव = मानलेला.

**मार्मिक०**—असें असें! जसें घोटीव गणपती, लाटीव पोळ्या, तसाच हा मानीव मुलगा.

**मी**–पुढें **' विलासः-चुप बैस वंचका. फार खोटें बोलणारीं माणसें स्वतःलाच खोडून टाकतात तें असें.'**

**गद्यगदाधर**—थांबा, थांबा, हें विलासाचें तर्कज्ञान मात्र अगाध आहे. 'फार खोटें बोलणारीं माणसें आपल्याला खोडून टाकतात.' कां तर वंचक म्हणतो कीं, ही म्हातारी माझ्यावर राग करते यांत ती वावगें कांहीं करीत नाहीं; कारण जर ती निराळी वागूं लागेल तर साठी बुद्धि नाठी ही म्हण खोटी ठरेल. या त्याच्या भाषणांत त्यांनें आपल्याला खोडून तें काय टाकलें?

**मी**—( दुःखावेगानें ) शिव शिव! गद्यगदाधर व्यर्थ तुम्ही आपल्याला मार्मिक म्हणवितां! तुम्ही कॅन्ट, ॲरिस्टॉटल कांहीं वाचलें नाहीं असें दिसतें. निदान तर्कशास्त्रांतील 'सप्त भिन्नभिन्नत्त्वे सति' इत्यादि मोठमोठ्या टीका किंवा अलंकारशास्त्रांतील उद्योत प्रदीप या गृहस्थांची तुम्हाला कांहींच ओळख नाहीं असें दिसतें. तुम्ही जर वर सांगितलेल्या विषयांचें अवलोकन केलें असतें तर खात्रीनें तुमचें डोकें जास्त 'सटल' झालें असतें व विलासाच्या या कोटींतील अर्थ तुमच्या तेव्हांच ध्यानांत आला असता. अहो, मागल्या भाषणांत वंचक म्हणतो 'यांच्या करण्यांत वावगें कांहीं नाहीं. त्या जर निराळ्या वागूं लागल्या ( म्हणजे वावगें वागूं लागल्या ) तर साठी बुद्धि नाठी ही म्हण खोटी ठरेल.' या ठिकाणीं वास्तविक पहातां ही म्हण खरी ठरेल असें हवें होतें, पण वंचक म्हणतो खोटी ठरेल! आहे कीं नाहीं त्याच्या भाषणांत विरोध? आणि तोच विरोध विलास आपल्या भाषणांत व्यक्त करीत आहे!!!

डोकें 'सटल' झालें असतें

**मार्मिक०**—धन्य धन्य आहे या नाटककर्त्याची!! याला म्हणतात खरा

द्राक्षारसपाक. इतका वेळ मी कोल्हटकरीयन रचनेला नारिकेलपाक म्हणत होतों, परंतु आतां आपण यांच्या रचनेला 'खरा द्राक्षारस' असेंच नांव देणार द्राक्षारसपाक म्हणजे वाचतांच ज्याचा बोध होतो तो, परंतु मी म्हणतों या 'बोधाचें' तरी ओझें हवें कशाला ? वाचण्यापूर्वी जी डोक्याची स्थिति तीच वाचल्यावर ! सगळाच लखलखाट !!

सगळाच लखलखाट

**बाबूराव**—अहो ! इतक्यांत काय झालें आहे ? पुढें विलासाच्याच भाषणांत बाह्यसृष्टीची व स्वप्नसृष्टीची मीमांसा करतांना नंदिनीचें व विलासाचें जें रूपैक्य दडपून देऊन तारी गल्लत उडविली आहे तिला तर दुसरी तोडच नाहीं.

**मार्मि॰**-शाबास ! शाबास !! मला असें वाटतें क्लिष्टतादेवी यांच्यावर रुसली.

**अर्थभट**—अहो, तसें झालें असतें तर मी म्हणतों देव पावला असता.

**मार्मिक॰**—रुसली म्हणजे पद्यांतच माझी संभावना करतात, गद्यांत नाहीं म्हणून; आणि ह्या तिचा रुसवा काढण्यासाठीं तर या प्रवेशांतील गद्याची योजना केली आहे. आतां तर गद्यांत व पद्यांत बरोबरी ( equality ) झाली कीं नाहीं ? ( आठवण करीत ) बरें काय हो, हें भाषण म्हणतांना पेटी तबला लावतात कां हो ?

भाषण करतांनां पेटीतबला लावतात काहो ?

**मी**:—( दचकून ) तो कशाला ?

**मार्मिक॰**—आपलें प्रेक्षकांचें रंजन व्हायला. कारण अर्थ तर कळायचा नाहीं, मग पेटी तरी ऐका.

**मी**:—( हताश होऊन पुढें वाचूं लागलों ) " **दाई:-लहान वय असून किती तरी पोक्त विचार ?** "

**गद्यगदाधर**:—खाशी ! हे पोक्त विचार, त्याची सुसंगती व मग अर्थगांभीर्य हीं उकरून काढतां काढतां आमचा तर जीव घाबरा झाला बुवा ! पण या म्हातारीला कसें कांहीं नाहीं झालें ? 'घाम पुसून' 'दम टाकीत' अशी कांहीं तरी स्टेज डायरेक्शन असेल पहा पहा !!

**मार्मिक०**—पैज मारून मी सांगतों कीं, दाईचा पार्ट करणाराला तो काय बोलतो हें बापजन्मींही कळायचें नाहींच; पण त्या काळची जरी खरी दाई घेतली तरी तिला सुद्धां विलासाची स्वप्न-मीमांसा कळली नसली पाहिजे. उगीच नाहीं ती पोक्त विचार म्हणत ! ! ! कांहीं कळलें नाहीं म्हणजे अडाणी माणसें असेंच म्हणतात. काय समजलेत ?

**मीः**—( चरफडत ) नाटक हें केवळ दृश्य काव्यच असावें असें कुठल्या 'भारती जडासुधीं' त सांगितलें आहे हो ? ( 'भारती जडासुधी' हा भरताचार्यांचा कांहींतरी जाडा ग्रंथ असावा असें माझें ठाम मत त्या वेळेस होतें ) साहित्य शास्त्राचें जें अंगभूत श्रव्य काव्य त्याचेही थोडे मासले असल्यास तुमचें काय गांठोडें बुडालें ? या कवीच्या कल्पनांचा रसास्वाद पिढ्यान् पिढ्या लोक घेणार ? मग रचना सोपी घालून कसें चालणार? पदें क्लिष्ट आहेत म्हणून तुह्मीं ह्मणतां पण त्यालाही माझें तेंच उत्तर आहे. अहो, लोकांना काय ? थिएटरांत चाली कानाला गोड लागल्या म्हणजे झालें!!! घरीं गेल्यावर बसावें अर्थ धुंडाळीत !

'भारती जडासुधी' हा कांहीं तरी जाडा ग्रंथ असावा

**मार्मिक०**—अरेच्या!! नाटक कंपन्यांची यांत एक मोठी सोय झाली बरें का. एखादे वेळेस एखादें पद आठवत नसल्यास द्यावें दुसरें एखादें पद ठोकून ! गद्य प्रवेश एखादा कंटाळवाणा वाटला तरी तसेंच ! मात्र तें पद याच कवीचें पाहिजे; नाहीं तर अर्थ बिर्थ कळून रसभंग व्हायचा ! एका 'प्रासादिक' कंपनींत मी अशीच मजा पाहिली. एकां नटाला त्याचें पद कांहीं केल्या आठवेना; खाकरून पाहिलें, हँडकरचिफ् तोंडांत कोंबून पाहिलें, पडद्यावर टिचक्या मारल्या, पेटीवाल्यावर तबलेवाल्यावर डोळे फाडले, पण व्यर्थ ! मग काय ? मूळ ज्या गुजराथी चालीवर तें पद होतें तेंच पद दिलें सटकावून ! आहे कायन् नाहीं काय !!

**सर्वजणः**—अजब !!

**गद्यगदा०**—या कवीनें नाटकें लिहिण्याचें सोडून स्वतंत्र निबंध लिहावे

अशी मी सूचना करितों. म्हणजे प्रेक्षकांचा बचाव होऊन वाचकांवर मात्र काय संकट येईल तें येईल आणि गद्य भाषण अर्थपूर्ण असून शब्दरचना बरीच मार्मिक तऱ्हेनें योजण्याच्या या कवीच्या पद्धतीवरून व नवीन कल्पना महाराष्ट्र वाङ्मयांत आणण्याच्या धाटणीवरून या कवीचे गद्यनिबंध लोकप्रिय होतील असें वाटतें. मोठ्या ग्रंथांत मधून मधून क्लिष्ट रचना जरी आली तरी त्यांत फारसा दोष नाहीं; परंतु नाटकांत जर का हें लचांड आलें तर त्या नटांचे हाल आणि प्रेक्षकांचे हाल; टीकाकारांची मात्र चंगळ!!

**मार्मिक**०--अलबत्त! अहो असे हाल झालेच पाहिजेत. म्हणे रचना सोपी करा. मग आपले क्लिष्ट विचार आपल्याच पात्रांच्या तोंडून 'पोक' कसे म्हणून घेतां येतील? असो; पुढें वाचा.

**मीः**--( पान १६ पद ) **'दुजि न कधि गमली गुणखनि...... तिजविणें असें अपूर्ण पूर्णपणें ची मी।'**

**मार्मिक**०—( बापूरावांस हळूच ) ही चिमी कोण हो?

**मीः**--( त्यांकडे लक्ष न दिल्यासारखें करून ) **'तया माझारी सुख परी गणीं स्वमनीं**

**प्रसाद**०—'तया माझारी' सारख्या भजनी शब्दानें प्रसाद खेंचून आणल्यासारखा वाटतो खरा. बरं येथें दुसरा प्रवेश संपला नाहीं का? ठीक; मी आतां अशी सूचना करितों, कीं हा पोरकट व विनाकारण क्लिष्ट प्रवेश किर्लोसकर मंडळी गाळून टाकते याबद्दल सर्वांनीं तिचे थँक्स मानावे.

भजनी प्रसाद

हें ऐकल्यावर सर्वांनीं 'हियर हियर' असा घोष केला.

---

## प्रवेश ३ ( पान १५ )

**सारांशः**–सौदामिनीस तीन रात्रीं सारखें स्वप्न पडतें कीं, देवी तिला सहा वर्षेपर्यंत अज्ञातवासांत राहून सरस्वतीच्या ओघांत कंठापर्यंत उभें राहून

तपश्चर्या करण्यास सांगते. हें स्वप्न ती कैलासनाथास सांगते व त्याच्या सल्ल्यानें पुरुषवेषानें जाण्याची तयारी करते. नंदिनीचा व तिचा प्रेमळ संवाद. )

**मीः**—( वाचावयास सुरुवात केली. ) **"सौदामिनीः–......एकदां वाटतें महाराजांपाशीं सारें ओकून टाकावें आणि मोकळे व्हावें..."**

**गद्यगदा०**—( तोंड वेडें वांकडें करीत ) ओकून टाकावें! ओकून! मोठासा जरी दोष नाहीं हा, तरी पण...ॲ...ही भाषा कशीशीच लागते.

**मीः**—हा रिकामा शब्दच्छल आहे.

**वाच०**—हें पहा गणपतराव, ही टीका जरी आम्ही शब्दच्छलानें चालविली आहे तरी तिचा उद्देश नुसतीच आम्हांला कालक्रमणा करायची आहे असा नाहीं. तिचा उद्देश हा कीं, श्रीयुत कोल्हटकरांसारखे उच्च शिक्षण मिळालेले तरुण पदवीधर महाराष्ट्र वाङ्मयाची जी सेवा करूं इच्छितात, ( आणि याबद्दल आम्ही सर्व त्यांचे मनापासून अभिनंदन करितों ) ती व्यर्थ न जावी व त्यांचे हातून उत्तम तऱ्हेचे ग्रंथ बाहेर पडावे अशी आमची इच्छा आहे. आणि म्हणूनच त्यांच्या या नाटकांतून त्यांस पुढें सुधारतां येण्यासारखे दोष आम्ही स्पष्ट दाखवितों व गुणांबद्दल आनंद प्रदर्शित करतों. या कवींत मोठा दोष म्हटला तर यांची रचना [ गद्य घ्या किंवा पद्य घ्या ] अतिशय क्लिष्ट व वेडीवांकडी असते आणि म्हणूनच तिच्यांत प्रसादाचा पूर्ण दुष्काळ असतो. निसर्गतःच ज्यांच्या वाणींत प्रसाद आला, असे तुकोबासारखे महात्मे फार विरळा, परंतु बहुतेकजण अत्यंत परिश्रमानें ग्रंथकार किंवा कवीसुद्धां होतात. यांचा जरी वर्ग दुसरा धरला तरी या वर्गांत येण्याला फार उद्योग करावा लागतो हें लक्षांत ठेवा. मोरोपंताच्या खोलीच्या भिंती प्रास अनुप्रास व मोठमोठीं यमकें यांनीं भरलेल्या असत, इतकें त्यांचें तनमन तिकडे लागलें होतें. बेकन, मेकॉले, बर्क, पन्नास पन्नासदां आपले लेख पुन्हां पुन्हा तपाशीत, पुन्हां लिहून काढीत व शेवटपर्यंत त्यांत चुका काढीत तेव्हां कुठे त्यांच्या मनासारखा एखादा ग्रंथ बाहेर पडे. होम-

र्वे भाषांतर पोपनें केलें. त्यांतील इलियड पहिल्या पुस्तकाच्या आरंभाच्या सात आठ ओळी त्यानें कमीतकमी पंचवीसदां तरी खोडून पुन्हां लिहिल्या असतील; तेव्हां कोठें त्याला समाधान झालें. एवंच काय, भाषा जी आहे ती ये म्हटल्यानें येत नाहीं.

भाषा कमवावी लागते

ती परिश्रमानें कमवावी लागते, आणि भाषा कशी कमवावी हें होतकरू लेखकांना नीट कळावें म्हणूनच ही आमची टीका आहे. अमुक भाषण कानाला गोड लागत नाहीं, अमक्या पद्यांत प्रसाद नाहीं इत्यादि मोठमोठ्या गोष्टी लोकांना चटकन सांगतां येतात; पण त्या पद्यांत प्रसाद कां नाहीं याचीं कारणें सूक्ष्म तऱ्हेनें त्या कवीला सांगण्यानें विशेष कार्य होतें. भाषेंतील कांहीं कांहीं शब्दप्रयोग असे असतात कीं, ते कर्णकटु कां लागतात याचीं कारणें जरी शब्दशास्त्रावरून नीटशीं सांगतां आलीं नाहींत, तरी त्याजागीं दुसरा प्रयोग घालतांच तुलनेनें पहिला वाईट लागतो. उदाहरणार्थ मघाचेंच घ्या ' वर्षी पुरुषीं अमृता गरला अबलेवरि कां इंदू । ' हा प्रयोग पाणिनीची जर साक्ष घेतली तर व्याकरणशास्त्र दृष्टीनें अगदीं बरोबर ठरेल; याच जागीं ( शीघ्रकवीकडे वळून ) काय कविराज–

**शीघ्रकवी**—सुधा नरावरि विष अबलेवरि सिंचन करि कां इंदू ।

**वाचस्पति**—हा चरण शास्त्रीनें जास्त गोड, सोपा व सरळ झाला असतां. दुसरें एक उदाहरण ' मूकनायक ' नाटकांत फार चांगलें आहे. " भारती जडा सुधी... ' या पद्यांतील अर्थगांभीर्य व कल्पनेंतील अननुभूत असा नवीनपणा हीं खरोखर वाखाणण्यासारखीं आहेत, परंतु त्या सर्वांना रचनेच्या अलौकिक दुर्घटपणामुळें अगदीं काळोखी फासल्यासारखें झालें आहे. त्यांत कवी म्हणतात, "**मधुमधुर बिंबसम अधर चुंबिला नच दंतें.**

**मार्मिक०**—(स्वगत) तोंडल्याची गोडी कोल्हटकरांसच ठाऊक! ओंठास पक्क बिंबाची उपमा केवळ आरक्त वर्णाच्या सादृश्यावरून देतात! तोंडलें 'मधुर' असतें हा नवीन शोध आहे.

**वाचस्पति**—( दुसरा चरण म्हणतात ) **" मधुमधूनि रसना अधू सुदतिका अदूरगतिका ही होते "**

काय कविराज, हा चरण कसाकाय वाटतो तुम्हाला ?

**शीघ्रकवी**—हं, पहिला चरण बरा आहे; परंतु ही ' अधू सुदतिका ' पाहवत-सुद्धां नाहीं. त्या जागीं हा घाला " वद मधुनि मधुनि कां रसनामाधुरि मंद मंद तरि ही होते " हा झाला तुलनेचा प्रकार दुसरे कित्येक प्रयोग असे असतात कीं, ते दोनदां तीनदां आपल्याशींच उच्चारून त्याच्याशीं थोडा विनोद केला कीं, त्यांत दोष कोणता आहे हें तत्काळ लक्षांत येतें. उदाहरणार्थ ( वीरतनय नाटक )

अधू सुदतिका

" अजवरि हेका । धरुनि अनेकां । समया प्रणया अवगणिलें का "

अरे लेका ?

**मार्मिकराव**—अरे लेका ! ! !

**वाचस्पति**—( हंसत ) याच पदांत पुढें " शलाका, विवेका, तदुद्रेका, विपाका, हाका, आशंका, ". इत्यादि काकांची कावकाव लावली आहे तीमुळें अर्थगांभीर्याची हानि होते. सरळ व सुबोध रीतीनें जो रसपरिपोष व्हायचा तो न होतां प्रासानुप्रासाकडे वाचकांचें लक्ष जातें, शब्दचमत्कार करून ज्या काव्याला शोभा आणतात त्याला अधम काव्य म्हणावें इत्यादि जे साहित्य–दर्पणकारांचे नियम ते सर्व सांगत न बसतां मार्मिकरावांनीं जे दोनच शब्द उच्चारले त्यांत सर्व कांहीं टीका एकदम येऊन कवीला ( जर तो समजूतदार असेल तर ) आपला दोष तेव्हांच कळतो. याचप्रमाणें गद्य भाषणांतील मुद्द्यांचें निरीक्षण करण्यांत यावें. भाषणांतील स्वारस्य कमी न होतां तें भाषण स्त्रीचे तोंडीं आहे कीं पुरुषाच्या, मुख्य पात्राच्या तोंडीं आहे कीं क्षुल्लक पात्राच्या, इत्यादि गोष्टींचा विचार कवीनें केला आहे किंवा नाहीं हें पहावें लागतें. या दृष्टीनें पहातां रा. देवलांपेक्षां श्रीयुत कोल्हटकर यांची योग्यता फारच कमी ठरते. ' कलोक्वियल ' म्हणून ज्याला म्हणतात तिचा कोल्हटकरांना गंध

देखील नाहीं. त्यांची भाषा 'समग्रतः सुसंस्कृत' असते; मग ती स्त्री असो, पुरुष असो कीं दासी असो. तीच देवलांची 'शारदा' पहा. नायकाचीं भाषणें जितकीं प्रौढ व भारदस्त तितकींच नायिकेचीं अगदीं साधीं, सरळ व लीला पूर्ण शोभतील अशीं. बारीक सारीक गोष्टी लक्षांत ठेवून व अमुक भाषण किंवा पद् याचा परिणाम प्रेक्षकांवर फार होतो; पण तो कां होतो याचीं सुद्धां कारणें जो टीकाकार सांगतो तीच खरी टीका. याचें उदाहरण म्हणजे मागें एकदां 'सुधारकांत' 'कविता देवींची स्वतंत्रता' म्हणून एक लेख आला होता. अस्तु; विषयांतर फार झालें. आतां आपण प्रस्तुताकडे वळूं.

समग्रतःसुसंस्कृत भाषा

**बापू०**—पान १५ सौदामिनी म्हणते महाराजापाशीं ही सर्व गोष्ट ओकून टाकावी यावरून हा सारा वाद निघाला.

**शीघ्रकवी**—'शुद्ध अंतःकरणानें महाराजांना सर्व सांगावें' "त्यांना सांगून हृदयांतील खळबळ सर्व काढून टाकावी" "मन मोकळें करून त्यांना सर्व सांगावें" यापैकीं एखादा प्रयोग तेथें घाला. काढून टाका तो ओक.

**मी**—( तसें करून पुढचें पद गाऊं लागलों. )

**मति ही भिमाली कार्लि या । न शके चिंतावया ॥ ध्रु ॥ ज्या समयीं स्थिर हृदय असावें । पावे अतुला भया ॥ १ ॥**

**अर्थभट**—अर्थ बराच सरळ आहे बुवा ! नशीब आमचें.

**मी**—( मनांत ) तुमचें नाहीं, त्या कवीचें !

**अर्थभट**—( डोकें खाजवीत ) पण—'भिमाली' म्हणजे काय हो ?

**बाबू०**—मेली !!

**मार्मि०**—नाहीं नाहीं ? निमाली म्हणजे खुंटली.

**वाच०**—हं हं. म्हणजे खुंटली कुंठित झाली असें होय !

**मार्मिक०**—नाहीं हो, खुटली म्हणजे खुटलीच. वीरतनय नाटकांत नाहीं का ' उपकृति किति असे हि मंजवरती । नच वदवत खुटेच ( येथें मार्मिकरावाला खरोखरच ठसका लागला ) सकल मति ॥ '

खरोखरच ठसका लागला

**शीघ्र०**—या खुटखुटण्यापेक्षां किंवा निमाल्यापेक्षां " मति कुंठली ही कालिं या " किंवा ' मति या क्षणीं कां कुंठली ' असे चरण घालायला कां लाज वाटली समजत नाहीं.

**वाच०**—'**न शके चिंतावया**' मूळ संस्कृत धातु चिन्त् याचा मनन करणें असा जरी अर्थ असला तरी मराठींत रूढार्थ चिन्ता करणें ह्मणजे काळजी असाच होईल.

**शीघ्र०**—या जागीं ' न सुचे कांहीं मला ' हा चरण घाला.

**वाच०**—"पावे '**अतुला** ' भया," अतुल भय पावे असा प्रयोग केला असता तर–

**मार्मिक०**–वा ! लोकांना लवकर समजलें असतें. ! !

कर्मक्रियापदभावः **ललित०**—आकारांतः पुल्लिंगः कर्मक्रियापद्भावः

**शीघ्र०**—( गायन करतात. ) **स्थिति ही अशी कां जाहली । मति या क्षणीं कुंठली । ज्या समयीं मन शांत असावें । भीति अशी वाटली ॥**

**बाबूराव**—पुढें " **कैलासनाथः—ज्याप्रमाणें शांत जलप्रवाहांत भोंवतालच्या डोलणाऱ्या वृक्षांचें प्रतिबिंब दिसतें, त्याप्रमाणें निद्रेच्या शांत वेळीं दिवसाचे सर्व व्यापार कधीं समग्रतः तर कधीं अंशतः, कधीं शुद्ध तर कधीं संकीर्ण स्वरूपांत गोचर होतात. त्यावर सत्याचा आरोप करणें मोह होय. मनीं वसे तें स्वप्नीं दिसे हीं ह्मण आपणांस माहीत आहेच.** "

**गद्गदा०**—शाबास ! हें भाषण खरोखरीच चांगलें साधलें आहे. कैलास-

नाथासारख्या ' विद्यानंदा ' ला ही प्रौढ भाषासरणी फार योग्य आहे व यांत केलेली स्वप्नमीमांसा अगदीं बरोबर आहे.

मी—( सोल्हासोत्फुल्ल होऊन ) ऐका पुढें **"सौदामिनीः—पहांटेची वेळ असेल. अजून रात्रीनें आपला अंधकार आवरला नव्हता तिच्या पायांची धूळ आकाशांत तुरळक दिसत होती. अरुणानें आपलें तांबडें निशाण उदयगिरीवर रोवलें नव्हतें अशा संदिग्ध काळीं जशी काय मी राजवाड्याच्या आरामबागेंत बसलें होतें "**

**सर्वजणः**—( टाळ्या वाजवीत ) हियर हियर. वन्समोअर.

**वाचस्पतिः**—नो मोअर. ( गलबला शांत होतो. ) एवढेंच जर भाषण घेतलें तर हें फारच उत्तम अलंकारिक भाषण आहे व यांत कवीची प्रतिभा जोरदार रूपानें व्यक्त होते. परंतु हें नाटक आहे—एक पात्र दुसऱ्याला आपली हकीकत सांगत आहे. या गोष्टी कवी विसरले वाटतें. ही भाषा एखाद्या कादंबरींतील लांबलचक वर्णनाची झाली, नाटकाची नव्हे. नाटकांत सुद्धां अलंकारिक भाषा वापरावी, नाहीं असें नाहीं; परंतु कोणत्या तऱ्हेचे अलंकार कोठें वापरावे येवढाच काय तो प्रश्न. सौदामिनीची 'चिंतावया न शके' अशी जी 'निमाली मति' ती असल्या तऱ्हेचें अलंकारयुक्त भाषण करण्याला कशी चालते हो ! असल्या तऱ्हेच्या चमत्कारिक स्वप्नानें भांबावून गेलेली स्त्री खुशाल त्या स्वप्नाचें वर्णन कवितामय भाषणांत करील ! बरें अलंकार तरी स्वभावोक्ति आहे का ! नाहीं. उपमा उत्प्रेक्षा खच्चून दडपल्या आहेत. अशा जागीं स्वभावोक्ती अलंकार फारच शोभला असता. भयभीत झालेला मनुष्य आपल्या संकटाची हकीकत सांगतांना उत्प्रेक्षा कधीं करीत बसणार नाहीं. सरळ झाली तशी हकीकत सांगेल त्याप्रमाणें येथें हवें होतें.

**बाबूरावः**—पुढें कैलासनाथ म्हणतो **" या स्त्रीला विद्येचा इतका**

ध्यास कीं विद्यादेवी इला स्वप्नांत दिसते" हा स्वप्नाचा उलगडा ठीक आहे. कारण मनीं वसे तें स्वप्नीं दिसे. पुढें वाचा:

**मीः**-( गात )

**भय शांतवा करुणानिधे कथा स्पष्ट मातें तुह्मी स्वप्नभावा।**

**ललितबुवाः**—आकारान्तः पुल्लिंगः कर्मक्रियापद्भावः नंबर ७३९.

**मीः**-"**सौदामिनीः-नुकतेंच नाथांनीं मला वचन दिलें कीं-**"

**अरविंदशास्त्रीः**-जे आहे त्ते नाथ काय म्हणतात बरें काय?

**अर्थभटः**-नाथ काय म्हणतात म्हणजे? एकनाथबुवा कीं काय?

**मार्मिकरावः**-बरोबर आहे. हरदास नाहीं का म्हणत 'पंतांचें असें वचन आहे कीं' ह्मणजे कोण? मोरोपंत. तसेंच येथें.

**मीः**- ( 'सहस्त्रशा भुजंगा मदंगा' लागल्याप्रमाणें होऊन ) अहो नाथ ह्मणजे एकनाथ नव्हे, सौदामिनीचा नवरा मेघनाथ.

उखाण्या शिवाय नांव **ललितबुवाः**—तर मग इनें उखाण्याशिवाय नवऱ्याचें नांव घेतलें ह्मणायचें!!!

**मीः**—( वेडावून ) होय हो तसेंच बरें! तसेंच! ( सर्व हंसतात. )

**वाच०ः**—असो पुढें.

**मी०**—( वाचतों ) **कैलासनाथः—हें स्वप्न बहुधा या दोघांच्या संभाषणांतील मुख्य शब्द इच्या मनावर उमटून त्यांनीं गुंफलें असावें.**

**गद्यगदा०**—शाशी! येथें तर कवींनीं बहारच केली! मनीं वसे तें स्वप्नीं दिसे या म्हणीचा व या भाषणाचा एकत्र विचार केला तर नवऱ्याला सोडून परागंदा होण्याचा विचार राणीच्या मनांत नेहमीं घोळत होता कीं काय? असें असेल तर मग मात्र कमाल केली म्हणायची.

**बापूरावः**-बरोबर हाच विचार या राणीच्या मनांत घोळत असला पाहिजे कारण पुढल्याच पदांत ती काय ह्मणते पहा.

"विचारही विरहाचा अति दुःसह झाला अजवरि साचा."

मीः—मग यांत काय बिघडलें? नवऱ्याला सोडून जाण्याचा जरी तिच्या मनांत नेहमीं विचार असला तरी हा पति-त्याग शिक्षणाकरितांच ना? भलत्या सलत्या तर कारणाकरितां नाहीं!

वाच०-स्त्रीशिक्षणाचा प्रसार अधिक करणें ही सुधारणा किती जरी अवश्यक असली, किती वंद्य असली, तरी ती सुधारणा चांगली असें जर लोकांच्या मनावर तुह्माला ठसवायचें असेल तर त्याला मार्ग फार निराळे आहेत. नवरा स्त्रीशिक्षणाविरुद्ध असतांही, सौदामिनीला जर आपल्या राज्यांत 'अंगनाशिक्षणार्थ विश्वविद्यालयें' स्थापन करायचीं आहेत तर आपल्या एखाद्या मैत्रिणीला शिक्षणार्थ दूर देशीं पाठवून किंवा तेथेंच पुरुषाच्या वेशांत तिला सुशिक्षित करून तिच्याकडून लोकोत्तर चमत्कार करून दाखवायचे होते. किंवा एकंदर कथानकांतच जर जास्ती मोहकपणा आणायचा असेल तर सौदामिनीनें आपल्या मुलीवर सुद्धां जर हा प्रयोग केला असतां तरी तें फार उत्तम वठलें असतें. आपल्या मुलीनें गुप्त रीतीनें शिक्षण मिळविलें व त्यामुळें अमुक अमुक चमत्कार घडले हें पाहून मेघनाथाला विशेष कौतुक वाटलें असतें व त्यांत स्त्रीशिक्षणाचाही भरपूर गौरव झाला असता व 'सुपरस्टिशस्' स्वप्नाचेंही कांहीं कारण पडलें नसतें. सुशिक्षित समजूतदार अशी जी सौदामिनी तिनें आपल्या स्वतःच्या बुद्धिसामर्थ्यानें एखादें गुप्त कपटनाटक करून नंदिनीच्या शिक्षणानेंच नवऱ्याचें मन वळविलें असतें, तर त्यांत जास्ती खुबी दिसली असती. वाटेल तें घे पण पुन्हां पळून जाऊं नकोस म्हणून म्हणण्याचा मेघनाथावर जो प्रसंग आला तो आला नसता, व संसारसुख पूर्णपणें अनुभवित असलेल्या प्रौढ स्त्रियांनीं नवऱ्यांना सोडून देऊन इतक्या मोठेपणींसुद्धां शिक्षणाची इतकी हाव धरावी हें जें मूर्खपणाचें चित्र तेंही कवीला रंगभूमीवर काढावें लागलें नसतें. कारण नंदिनीचें या वेळीं वय कमींतकमी बारा वर्षांचें धरलें तर सौदामिनीचें निदान तरी अठ्ठावीस तीस वर्षांचें

स्त्रीशिक्षण

वय धरावें लागतें. अल्पवयांत जी उत्कंठा, बुद्धिचांचल्य, शिक्षणलालसा अधिक शोभली असती (निदान स्त्रीजातींत तरी) ती इतक्या तरुण वयांत अगदीं अप्रस्तुत दिसते. विचारशक्ति परिपक्व दशेला आल्याचा हा परिणाम झाला असें ह्मणावें तर एका अपरिचित ज्योतिष्याच्या सांगण्याला मान देऊन केवळ स्वप्नावर भरंवसा ठेवून पतींचा असा विश्वासघात करून एकदम वनाचा रस्ता धरणें ही काय विचाराची पक्वदशा, का हा शिक्षणाचा हव्यास, का नायिकेच्या उदात्त स्वभावाचा परिपोष, का हें स्त्रियांचें मोहक चित्र, का काय ह्मणावें तरी काय याला ?

मी:—(भांबावून गेल्यासारखा होऊन पुढें वाचूं लागतो. पृष्ठ १९)

**" नाथांचा एक क्षणभर वियोग जिला वर्षाप्रमाणें वाटायचा ती मी सहा वर्षें कशी कंठूं ? " " नाथांचा आक्रोश हृदय भेदणार नाहीं काय ? "**

**अरविंद**०—जे आहेत ते हे नाथ महाराज पुन्हां आले ! ! एकनाथ महाराज काय म्हणतात बरं काय ?

**मी**०—(पुढें पद म्हणूं लागलों) **"विरहीं राहुं कशी मी" ... "वियोग पळभरि पतिचा। युग तुल्यचि भासे कान्तमुखाचा ॥**

गद्यापद्या

**मार्मिक**०—हें पुन्हा 'गद्यापद्या' आलें बरें का ?

**शीघ्र**०...खरेंच ! वरचें भाषण खालच्या बिटाळ्यांत भरलें आहे दुसरें काय!

**वाच**०—पण काय हो, वियोग युगासारखा हिला कसा भासतो ? वियोग एक मानसिक स्थिति; युग कालाचा एक भाग असें असतां मानसिक स्थिति = कालाचा एक भाग असें कसें होईल ! पुढें पद्यांत तरी तेंच पळभर वियोग = युग ! काय जुलूम हा ! ! .

**शीघ्र**०—वियोगाचें एक पळ मला युगासारखें वाटेल हें वाक्य घाला तेथें.

'शारदा' नाटकांत श्रीमंत म्हणतात "**पल घडी, घडी दिन भांस-तसे। दिनहि वर्षसा होत असे ॥**" निर्दोष असून साधी व सरळ अशी ही प्रासादिक शब्दरचना कोणीकडे आणि ढोबळ चुकीचें प्रदर्शन करणारा 'वियोग...युगतुल्यचि काळमुखाचा' कोणीकडे?

**मी —** पुढें **कैलासनाथः-'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' (एकीकडे)'पुढील जन्मीं! आशीर्वाद एक आणि कृति अगदीं भिन्न.'**

**मार्मिकरावः**--यापेक्षां 'मी दुष्ट मनुष्य आहें मी असें असें करणार आहे' अशी पाटी का नाहीं कैलासनाथानें आपल्या डोक्यावर लावली!!!

**मीः**—(नंतर मी पुढचें नंदिनीचें व सौदामिनीचें भाषण वाचलें व त्यावर सर्व मंडळी बरीच खुष झाली.)

**गद्यगदाधरः**–२१, २२, २३, या पृष्ठांतील भाषणें खरोखरच फार चांगलीं साधलीं आहेत. नंदिनीचा थोडा अल्लड स्वभाव, लाडें लाडें करण्याची संवय वगैरे गोष्टींचें चित्र फारच मोहक वठलें आहे.

**मीः**—पुढें "**आई कां मजसवें न बससी। नच कां हंससी मजवरि रुससी ॥ ध्रु० ॥ किति तरि शोधिलि मैत्रिणिसंगें। भवनिं परी गे कुठेंच नससी**"

**अर्थभटः**-आपण सुद्धां या पदावर खुष झालों. शाबास! या पद्यरचनेंत साधेपणा असून प्रेमरस पूर्णपणें भरला आहे. नंदिनीचा प्रेमळ स्वभाव यांत फारच गोड तऱ्हेनें व्यक्त केला आहे. व पुढें '**मी असा कमरेला विळखा घालतें तो सोडायची म्हणून नाहीं...'**'**तूं जर माझा मुका घेणार नाहींस, मला जवळ घेणार नाहींस, तर घेईल कोण?**' '**तूं जेव्हां देवाच्या घरीं जाशील तेव्हां मी त्याला सांगेन की, आईला माझ्यापासून दूर करूं नकोस**' वगैरे वाक्यें फारच नामी घातलीं आहेत.

**प्रसादरायः**—अहो अर्थभट तुम्ही केवळ सोप्या अर्थावर भुलला असें दिसतें परंतु पद्यांत काय ह्मणायचें व गद्यांत काय याचा येथें कांहींच ताळतंत्र राहिला नाहीं असें वाटतें. "किति तरि शोधिलि मैत्रिणिसंगें भवानें परी गे कुठेंच नससी" ही कविता गद्य लिहून मग मात्राबरहुकूम विटाळीं भरल्यासारखी दिसते. या पदाची आस्ताई ठीक आहे; पण या वर दिलेल्या अंतऱ्यांत "तुला माजघरांत सोधली, पडवींत सोधली, ओटीवर सोधली, पण ठिकाण नाहीं" या अर्थगांभीर्यापलीकडे कांहींच नाहीं.

**शीघ्र॰**—त्यापेक्षां "प्रेमानें मज जवळें न घेसी । तुजविण घेइल कोण-इतर तरि" असें म्हणा.

**मी**—'कन्या ही अन्याची । विधियुत देया बलिसमची ॥
कितिही पितरीं संगोपिली जरि । शेवटि दूरी लोटितातची ॥'

काय ची ची लावली आहे हो ?

**प्रसाद॰**—बलिसमची ! लोटितातची !! काय ची ची लावली आहे हो ?

सर्वपित्री अवस

**अरविंद॰**—कितिही पितरीं ! जे आहेत ते ही सर्व-पित्री अवस बरं काय ?

**वाच॰**—'विधियुतदेया बलिसमची' । पाठीवरून हात फिरवून लाड करणारी सौदामिनी ती हीच काहो ! विद्येचा जिला पूर्ण अभिमान, स्वतः जी उत्तम शिकलेली, शहाणी सुरती अशी जी सौदामिनी तिच्या मुखांतून कन्यादान म्हणजे बलिदान असे उद्गार निघावे काय आश्चर्य आहे! विवाहासारख्या पवित्र कृत्याला जर हे कवी बलिदानाची उपमा देऊं लागले तर यांची अचाट कल्पनाशक्ति वाटेल तिकडे बहकत चालली आहे असेंच ह्मटलें पाहिजे. आई कितीही प्रेमळ असली तरी माझ्या मुलीचें लग्न करायचें ह्मणजे तिला अमक्या अमक्याला बळी द्यायची असें कधींही म्हणणार नाहीं.

कन्यादान ह्मणजे बलिदान

**मार्मि०**—अहो म्हणतात तर काय झालें! कवीनें हा चरण घातला आहे त्याला कांहीं तरी आधार असला पाहिजे, उगीच घालील काय!

**बापूराव घरवाले**-बिलकूल बरोबर आहे!! सौभद्र नाटकांत "गरिबा-पोटीं येते जरी ते कधिं नच देते बळी" असें नाहीं का सुभद्रा म्हणत!

**वाच०**—कालिदासाचा कण्व म्हणतो.

अर्थो हि कन्या परकीय एव। तामद्य........
प्रत्यर्पितन्यास इवान्तरात्मा॥

"कन्या ही जशी कांहीं दुसऱ्यानें गहाण ठेवलेली वस्तु होती, ती इतके दिवस नीट संभाळून आतां ज्याची त्यास परत केली." ही कण्वाची उक्ति किती मार्मिक, किती यथार्थ व किती सरळ आहे. नाहीं तर "कन्या बलि-सम देया" ही आधुनिक 'नवनवल' कल्पना!!!

**मी**—[ पुढचें पद गाऊं लागलों ] पृष्ठ २३.

**रुदन हेंचि आयुध आमुचें सर्वदा विजयी असे।**

* * * *

**कोण ऐशी जाळी चिंता। स्पर्श मम न जी करि शांता॥**
**शल्य तें तिच्या हृत्प्रांता। कोणतें सलतें असें॥**

**बापू०**—पहिल्या चरणांतील कल्पना व एकंदर शब्द रचना बरीच चां-गली आहे. चाल सुद्धां फार गोड आहे.

**अर्थ०**—अंतऱ्यामधील चरणांचा अर्थ बरोबर जमत नाहीं.

**बापू०**-बरं अन्वय तरी!

**अर्थ०**-'मम स्पर्श जी शांता न करी' म्हणजे ज्या चिंतेला माझा स्पर्श शांत करीत नाहीं, 'ऐशी कोण चिंता जाळी.'

**अर्थ०**-अहाहा! याला म्हणतात द्राक्षारसपाक.

**मार्मिक०**—मी म्हणतों 'सोडावाटर पाक' बूच उघडल्याबरोबर बेधडक सोडावाटर पाक नाकातोंडांत शिरून जीव घाबरा करणारा.

**ललित०**—'शांता चिंता' आकारान्तः स्त्रीलिंगो विशेषण-विशेष्य भावः विशेषण विशेष्य भावः नंबर ७५९.

**अर्थ०**—'शल्य ते तिच्या हृत्शांता' हा हृदयांत कोणीकडेस हो ?

**मार्मि०**—मध्यप्रांताच्या उत्तरेस व नाशकाच्या दक्षिणेस ! ! ।

---

## प्रवेश ४ था.

( **सारांश**:-मेघनाथ निजला असतां सौदामिनी त्याला सोडून जाण्या बद्दल शोक करते व जाते. )

सर्व प्रवेश वाचुन झाल्यावर

**अर्थ०**—हें सौदामिनीचें भाषण व तिच्या तोंडचीं पदें सोपीं व सरळ आहेत.

**गद्यगद्य०**—सौदामिनीच्या तोंडीं जें गद्य आहे त्यांत करुण रस फारच चांगला साधला असून भाषा प्रसादमय आहे. सौदामिनीचें काम करणारा नट जर अभिनयाचे कामीं कुशल असेल तर तो खरोखरच प्रेक्षकांचीं मनें तल्लीन करील. एकदां मात्र या भाषणांत ठेंच लागते '**कर्तव्या या प्रेमोघाला आळा घालून माझी वाट मोकळी कर**'

**मार्मिक०**—कर्तव्या ? मला वाटलें, तजविरीच्या घोंटाळ्यांतला 'भादव्या' कशाला आला येथें ?

**शीघ्र०**—त्यापेक्षां 'कर्तव्यदेवते, या मोहजालांतून माझी सुटका कर' असें घाला.

**मी**—( गाऊं लागलों )

> **"मी कलंक कुलज वधूलागिं जहालें । जगतांत राहिलें ।**
> **आधि न कां मेलें "!**

**मार्मिक०**—( गातो ) आधिं न कां खपलें ! ! !

मी—पुढें "पतिनाशा सजलें। पूर्व विसरलें सगळें ॥"

ललित०—" सजलें, मेलें, सगळें" ही प्रासानुप्रास रचना अगदीं बिलकूल यथाशास्त्र आहे.

बापू०:—ती कशी काय बुवा ?

ललितबुवा—सधनविधन संयोगात् (हें पाणिनींचें सूत्र ऐकून सर्वांच्या

सधनाविधनसंयोग — इतक्या आश्चर्योत्थित भ्रुकुटी झाल्या कीं, त्या गुड्या उभारल्यासारख्या मला वाटल्या ")

मार्मिक०:—खाशी बुवा खाशी! हा ' सधनविधनसंयोग ' कुठून पैदा केलात ?

ललितबुवाः—अहो ही प्रासरचना ! !

' निर्व्याजा—ताजा '; तसेंच.

' शांति धरा नृपराज। शोका टाकुनि व्हा धृतिभाज। खिन्न असे कां आज ॥ प्राक्तन केली ही समजावी हीस न कांहीं इलाज ॥

बापू०:—याला ह्मणतात प्रास! अगदीं निर्विलाज रचना आहे बुवा!

ललितबुवाः—ह्मणून याला म्हणतात ' सधनविधनसंयोगः '

मीः-पुढें " कालसर्पिणी कठोर नाथि उलटलें "

अर्थभटः-हिचा नाथ कठोर होता वाटतें! कारण ' कठोर ' कालसर्पिणीकडे घ्यावें तर या कवीच्या मामूल वहिवाटीप्रमाणें ' कठोरा कालसार्पिणी ' असें झालें असतें.

ललितबुवा-बिलकुल बराबर आहे. आकारांतः स्त्रीलिंगो विशेषण-विशेष्य भावात्।

नंतर " तुजवीणें कुणाला विनवूं दयाघना " या पदावर मंडळी बरीच खुष होऊन गेली.

मार्मिक०-" तव वरद करीं ठेवितें मदीय जीवना "

वरदकर म्हटला म्हणजे तो पालथाच असला पाहिजे; मग पालथ्या हाता-

वर ' जीवन ' ठेवलें आहे, का हात पालथा असतां खालून ' जविन ' चिकटविलें आहे ! ( हंशा )

---

## प्रवेश ५ वा.

(सारांशः-मातृविरहाकुल नांदिनीच्या दुःखाचा विलास वाटेकरी होतो.)

मी-" संचित दुःख नदींतुनि एकहि बिंदु जरी गत हो ।
गतत्त्व लक्षुनि दुःख उपेक्षुनि साधु मानि लाहो ॥ "

अर्थ०.—कां ! गद्यगदाधर ! ह्या तत्वज्ञानाचें तेज तुमच्या बुद्धीवर कितपत फांकलें आहे ?

गद्यं०.– अंधेर गुडुप ! अर्थच कळला नाहीं मला मुळींच. हें ' ग 'तत्व काय तत्व आहे ?

' ग ' तत्त्व

मार्मि०.–अहो ' ग ' ची बाधा होते ना ? तेंच हें तत्त्व आहे.

अर्थ०.—त्याचा मथितार्थ असा आहे कीं, आपल्या नशिबीं जें दुःख आहे त्यांतील अल्पांश जरी भोगून कमी झाला तरी साधु म्हणतात लाभ झाला.

बाबू०–कां बापुसाहेब कसलें ध्यान चाललें आहे ?

बापू०–मीं या संचित नदीच्या कल्पनेंत गुंग होऊन गेलों आहे; आणखी त्यांतील बिंदु गत होण्याच्या कल्पनेनें तर मला अगदीं मारून टाकलें आहे. कायहो शास्त्रीबुवा हा दृष्टांत कोणत्या वेदान्त-वैखरी ग्रंथांत आहे हो ?

अर०–जेहेत्ते कांहीं स्मरत नाहीं बोवा ?

बाबू०–अहो वेदान्त वैखरी ग्रंथच कशाला पाहिजे ? कवीची वैखरी तर आहे की नाहीं ?

गद्य०–असो हे साधु पुढें काय म्हणतात तें ऐकूं.

मी–( वाचतों )–' आजपर्यंत तूं आपलें प्रेम आम्हां दोघांमध्यें विभागिलें होतेंस त्याची आतां मला एकट्यालाच भिक्षा

वाढ. प्रेमाचे विषय जरी कमी झाले आहेत तरी त्याचा सांठा कमी होऊं देऊं नकोस.'

बाबू०–जणूं काय प्रेम कमी जास्त ठेवणें तिच्या हातचेंच आहे !

बापूसाहेब—आणखी त्यांचा आपलपोटेपणा पाहिलात कां ?

मार्मि०—परवां रामा तांबोळ्याचा चुलतभाऊ वारला तेव्हां तो चुलतीचें समाधान करीत होता 'जाऊंदे; मेलीं माणसें कोठें परत येतात ? आतां मलाच आपला मुलगा समज व त्याची इस्टेट मला दे म्हणजे झालें.'

मी—(वाचतों)—'नंदिनीः—इतक्यांतच तुह्मीं माया आवरून घ्यायचा उपदेश केलां ना ? आणि प्रेमाची भिक्षा मागतां ?'

मार्मिक०—शाबास ! खुप मुस्कटांत लगावली !

मी—(वाचतों) 'विलास—नंदिनी क्षमा कर. तुझ्यां एका वाक्यानें माझें सर्व तत्त्वज्ञान खोटें ठरविलें.'

बाबूराव०—अरे अरे अरे ! हे अगदींच नरम आले ! !

खूपच झणाणली मार्मिक०—खरच झणाणली म्हणून ! उगीच नाहीं ! ! !

मी—'चल तर राणी साहेबांनां बरोबरच अश्वस्नान घालूं'.

बाबू०—यंवरे मर्द ! यंवरे वीर ! ! यावर नंदिनी काय म्हणते ?

मी-'नंदिनीः-विलासराज तुह्मींही मला आईप्रमाणेंच सोडून जाणार नाहीं ना ?'

मार्मिक०—अहो तीं खुललीन् काय ! आणखी आली पुन्हां प्रेमांत !

मी-'विलास—ईश्वराची इच्छा असेल तर आपण अनंत कालपर्यंत जीवितयात्रा बरोबर करूं आणि शेवटीं ईशज्योतींतही बरोबरच मिळून जाऊं ?

मार्मि०–हे बायकांच्यापुढें ईशज्योति पाजळणारे विलासराज एक बडे

मुरदाबाशिंग मुरदाडसिंग दिसतात, योग्यता दिसत नाहीं कवडीची,
आणि मारे मोठ्या गप्पा मारतात.

**बाबू०**—हा प्रवेश लिहिण्यांत कवींचा हेतु काय असेल बरें.

**वाचस्पति**—खरेंच कांहीं समजत नाहीं. ह्यांत शोक रसही साधला नाहीं, करुण रसही नाहीं आणि संविधानकालाही ह्याची जरूर भासत नाहीं.

**मी**—विलास व नंदिनी ह्यांची प्रीति दाखवावयाची असेल.

**वाचस्पति**—त्याकरितां पुढें एक प्रवेश आहेच. तथापि तुमचें म्हणणें कबूल केलें तरी प्रवेश अगदींच बेचव व निरर्थक झाला आहे

---

## प्रवेश ६ व ७.

( **सारांश**—राणीच्या एकदोन सांकेतिक गोष्टी सांगून कैलासनाथ राजावर आपला पगडा बसवतो, व त्याच्या डोळ्यांत व पोटांत औषध म्हणून 'रुग्णमार्जार' नांवाचें विष देतो. प्रतीपराजा रानांत शिकारीला येतो. त्याची बायको बाळंतपणांत मेली व झालेल्या पुत्रापासून, एका स्त्रीच्यासाठीं वीस वर्षांच्या आंत राजाच्या जिवाला धोका आहे असें ज्योतिष्यांनीं सांगितल्यावरून राजानें त्याला गुप्तपणें दूरदेशीं पाठविलें होतें. असा तो पुत्रविरहाकुल राजा रानांत हाल होत असलेल्या पुरुषवेषधारी राणीला मानलेला पुत्र म्हणून घेऊन जातो. )

नंतर पुढचे दोन प्रवेश मीं जरा घाईनेंच वाचले. त्यामध्यें प्रथम कैलासनाथाची रुग्णमार्जार-चिकित्सा व नंतर सौदामिनीचा वनवास व त्यांत प्रतीपाची व तिची भेट इतका भाग झाला. 'रुग्णमार्जार' हें नांव ऐकल्याबरोबर मार्भिकरावांनीं आपले कान उभारले, हें पाहून बापूसाहेब घरवाले म्हणतात.

रुग्णमार्जार

**बापूसा०**—पंढत आपण बॉबेला असतांना या घुसमुंगुसाचा पहिलाच प्रयोग पाहिला. त्या वेळेस 'मूषक-मार्जार' हें नांव ऐकलें होतें। स्मरतें तुम्हांला? मग 'रुग्ण-मार्जार' कोण नवीन?

मार्मिक०—अहो बदललें असेल. 'मूषकमार्जारा' वर तुम्हींच टीका केली होतांना, कीं 'मर्कटकुक्कुट' 'मयूर गर्दभ' त्यावरून आतां रुग्णमार्जार हें नांव ठेवलें

वाचस्पतिः—सौदामिनीचें पहिलें पद 'जरी पीडा शरीरासी । न भासे तीव्र आधि जशी' ॥ व पुढेंच "आकाश माझें वितान सारे शय्या भूमि उदार" "मधुर वचनाचा दास भुकेला" वगैरे पदें बरींच निर्दोष असून साधीं व सरळ आहेत. पुढें तिचें व प्रतीपाचें भाषण हींही बरीं साधलीं आहेत. मात्र प्रतीपाशीं बोलतांना सौदामिनी पुरुष-वेषाला न साजेल इतक्या दीनवाण्या मार्गेत बोलते, तें मात्र थोडें विसंगत दिसतें. सौदामिनी नुसती वाट चुकली आहे. व प्रतीप तिच्या साह्याला येऊन तो तिला आपल्या नगराला घेऊन गेला ही गोष्ट इतकी साधी सरळ पण बेचव आहे कीं, ही रंगभूमीवर न दाखवितां विष्कंभक, प्रवेशक यांनीं नुसती सुचविली असती तरी चाललें असतें. रंगभूमीच्या दृष्टीनें पाहतां नाटकाचे दोन भाग

नाटकांतील दृश्य व सूच्यभाग

असतात. दृश्य व सूच्य. कथानकाचा कोणता भाग दाखवावयाचा व कोणता सुचवावयाचा याविषयीं येथें तरी कवींनीं नीट विचार केला नाहीं असें वाटतें. बरें, प्रतीपाला जर आणावयाचेंच होतें, तर त्याची व सौदामिनीची जी नुसतीच अकस्मात गांठ पडली असें दाखविलें आहे तें फारच नीरस दिसतें. कांहीं तरी कारण घडून मग त्यांची गांठ पडली असती तर त्यांत दृश्य भागाला उचित असें कौशल्य दिसून आलें असतें किंवा हा सौदामिनीचा व त्याच्या मागचा कैलासनाथाचा प्रवेश गाळला असता तरी सुद्धा चांगलें झालें असतें; म्हणजे मग पहिला अंक कंटाळवाणा झाला नसता. राणी राजाला सोडून गेली येथेंच खरें म्हटलें तर पहिला अंक संपतो. राणीची पुढची हकीकत दुसऱ्या अंकांत हवी होती. अंक कोठें संपवावा हें मागल्या एका प्रवेशांत शृंगीनें बरोबर मार्मिक रीतीनें सांगितलें असतां खुद्द नाटककाराला तें समजूं नये हें मोठें आश्चर्य आहे.

मीः—असो, एकंदर पहिल्या अंकांत राणी स्वप्नावर भरंवसा ठेवून राजाला सोडून गेली व त्यामुळें कैलासनाथाला आपलें दुष्ट कारस्थान निर्वेधपणें चालविण्याला चांगलीच संधि मिळाली इतका भाग येऊन गेला

वाच०—थांबा, आणखी एक चमत्कार दाखवितों. कवीनीं कैलासनाथाचें जें चित्र काढलें आहे त्याचा थोडा विचार करूं. प्रतिनायक म्हणजे नायकाचा प्रतिस्पर्धी जो असेल त्याचा स्वभाव जितका दुष्ट, जितका पाताळयंत्री असेल, त्या मानानें नायकाच्या कौशल्याची महती वाढत जाते. या नियमानुसार पाहिलें तर हा प्रतिनायक आपोआप घडून येणाऱ्या गोष्टींची मदत न घेतां, आपल्या बुद्धिसामर्थ्यावर सर्व कपटनाटकाची इमारत उभारतो. तो दैवावर हवाला ठेवून न बसतां बुद्धीच्या जोरावर सिद्धि मिळवितो. हा नियम अथेल्लो नाटकांतील अयागो, हरिश्चंद्रांतील विश्वामित्र, सौभद्रांतील कृष्ण, मालतीमाधवांतील कामंदकी ( कृष्ण, कामंदकी व चाणक्य यांची कारस्थानें परनाशाकरितां नसून परहिताकरितां होतीं ) या व्यक्तींच्या चरित्रांचें जर नीट निरिक्षण केलें तर वर सांगितल्या नियमाचें महत्त्व तुह्माला कळून येईल. कृष्णाला तर ' तस्करां हातीं द्विज गोधन हरिलें ' येथून पाया रचावा लागला. फार लांब कशाला ' शारदें'तल्या भद्रेश्वराला सुद्धां भुजंगनाथाच्या घरीं आधीं जोशीबुवाला पाठवून ' तुह्मांला यंदा भार्यायोग आहे ' अशी खात्री करून द्यावी लागली. याप्रमाणें विचार केला असतां कैलासनाथासारख्या सुशिक्षित दुष्टाला सौदामिनीच्या स्वप्नाची संधी कवीनें आणून द्यावी व मग यानें आपलें कारस्थान चालवावें यांत कैलासनाथाच्या पाताळयंत्री स्वभावाला कमीपणा आल्यासारखें होतें. बरें असें स्वप्न पडायला आणि कैलासनाथ रंगभूमीवर यायला एकच गांठ पडते. एवंच काय असल्या योगायोगाचा फायदा घेऊन त्यानें आपलें कारस्थान चालवावें हा केवळ काकतालीय न्याय दिसतो. यांत स्वतःची कांहींच बुद्धि दिसत नाहीं. कैलासनाथानें पुढचीं कार-

प्रतिनायक

स्थानें बरींच घोटाळ्याचीं रचलीं आहेत खरीं, परंतु सर्वांचा प्रारंभ अगदींच नीरस झाला आहे. अस्तु.

**अरविंदः**— इति श्रीमन्महाप्रभुशिक्षितनाटककारकल्पनाशक्तिश्रेष्ठप्रसादवाणीविलास श्री कोल्हटकर कविराजराजितिलकविरचिते गुप्तमंजूषे प्रथमोऽङ्कः ॥

**मार्मिक०**—इतिश्री समीरगच्चीकुचटीकाचोकडीविरचितायां श्रीमद्भरताचार्यप्रासादिकनाट्यकलारुकूकुठारटीकायां प्रथम हप्ता समाप्तः ।



# दुसरा हप्ता.

दुसरे दिवशीं 'यामिनी' 'संधि साधुनी' 'दिवसा' स भेटण्याचे मंगल प्रसंगीं घरवाल्यांचे गच्चीवर स्वस्वस्थानापन्न मंडळी झाल्यावर मीं प्रश्न काढला कीं, असे हप्ते किती व्हावयाचे आहेत व ह्या नाटकाचा क्लास आणखी किती दिवस काढणार?'

**वाचस्पति**—तुमचें कोल्हटकरांविषयीं 'न भूतो न भविष्यति' असें जें मत होतें तें कायम आहे कीं काय?

**मी**—नाहीं तरी मीं त्यांना कालिदास शेक्सपीयरच्या जोडीला कोठें बसवीत होतों! पण पदलालित्य, उदात्त कल्पना व विशेषतः नूतन संविधानकचातुर्य यामध्यें त्यांची पायरी आधुनिक नाटककारांत श्रेष्ठ आहे असें अजूनही माझें मत आहे. कांहीं बाबतींत मला माहीत नसलेले दोष दिसले; पण दोषविरहित कोण आहे?

**वाचस्पति**—तर मग आतां असें करूं कीं, आणखी एक अंक घेऊं. मग बाकीचे अंकांतील ढोबळ गोष्टी तेवढ्या पहात जाऊं व शेवटीं तुह्मीं जें एवढें नांवाजतां त्या नूतन संविधानकचातुर्यासंबंधानें विचार करूं.

---

## अंक २ रा.

### प्रवेश १ ला.

( **सारांश**—सहा वर्षें झालीं. कैलासनाथ आपली करणी सांगतात. राजावर व दरबारावर आपला पगडा बसविला. रुग्णमार्जाराचे योगानें राजाला अंधत्व आणून थोडे दिवसांचा सोबती केला. दाईनें मरतांनां त्याला सांगून ठेविलें

कीं, विलास हा प्रतीपाचा गुप्त पुत्र होय. ह्या रहस्याचा फायदा घेऊन राजाला सांगितलें कीं, शृंगी हा प्रतीपाचा मुलगा आहे व भृंगीस सांगितलें कीं, तूं प्रतीपाचा मुलगा आहेस त्याच्याकडे जाऊन गुप्तपणें त्याला मारून टाक. नंदिनीचें स्वयंवर वीस वर्षांच्या मुदतीच्या शेवटच्या दिवशीं ठरविलें. ह्या नंतर शृंगी भृंगी येतात व आपण राज्यपदारूढ झालों ह्मणजे कसें करणार ह्याबद्दल अकलेचे तारे तोडतात.)

**बाबूराव**—हं, सावधान. आतां आपणास एकाचें व्याख्यान ऊर्फ आत्मवृत्तकथन ऐकावयाचें आहे; करितां पाणी, मेंथाल वगैरे तयार असूं द्या. झोंपबीप यायची नाहीं तर!

ह्यापुढें गद्य वाचण्याचें काम बाबूरावानीं घेतलें व पद्यें तेवढीं मीं म्हणायचें ठरलें.

**बाबू०**—( वाचतात ) एवढीं सहा वर्षें—

**बापूराव**—थांबा! हें व्याख्यान किती लांब आहे? ( पाहून ) अरे बापरे! दोन पानें सबंध आहेत!

**मी**—अहो सहा वर्षें झालीं, त्यांतील हकीकत आतां वाचकांस किंवा श्रोत्यांस परिचित करून द्यावयाची, हें काम आत्मवृत्तरूपानें कथन केल्याशिवाय होणें नाहीं.

आत्मगत भाषणें

**प्रसादराय**—पण आत्मवृत्त कथन करणें हें कानाला स्वाभाविक लागत नाहीं. कसेंसेंच लागतें.

**मी**—नाहीं तर काय मग? दोन पात्रांच्या भाषणाच्या ओघांत आणावें ह्मटलें तर कारस्थानी मनुष्याच्या कारस्थानाची दुसऱ्या कोणास माहिती नसते. शिवाय भरताचार्यप्रणीत शास्त्रानें सुद्धां हें अपरिहार्य आहे.

**मार्मिकराव**—अहो पण तुमचे भरताचार्य माहीत आहेत कोणाला? आणखी त्यांना विचारतो कोण? नटी, सूत्रधार आटपलेच, माणसें स्टेजवर संगीत प्राण सोडूं लागलीं इतकेंच नाहीं तर नाटकाच्या अंकांसंबंधानें निर्बंध होता कीं ३,५,७,१० ह्यापैकीं एखादी संख्या असावी, तोही निर्बंध रुग्ण नाट्यशास्त्राला बेचव लागूं लागला. शोकपर्यवसायी नाटकेंही होतातच. एकं-

माणसें संगीत प्राण सोडूं लागलीं

दर्शेत तुमचे भरताचार्य आतां वृद्ध झाल्यामुळें त्यांना पेन्शन दिलें आहे व त्यांच्या जागीं उक्षतरण-( ऑक्सफर्ड-) निवासी 'ताज्या दमाचे तरणेबांड सनदी नोकर आले आहेत.

**मी**-मग काय हो, ह्या नवीन अमदानींत सॉलिलोकीजना अर्धचंद्र मिळतो असें तुमचें म्हणणें आहे कीं काय ?

**बाबूराव**—अहो प्रत्यक्ष नाहीं मिळाला म्हणून काय झालें ? ह्या अमदानींत नियम मोडण्यांत जो जितका पटाईत तितके त्याला मार्क जास्त.

**मार्मि०**—संस्कृतच्या व्याकरणाच्या पेपरमध्यें पहाना ! अपवादाचेच प्रश्न जास्त.

**बाबूराव**—त्या मानानें येथेंही कवींनीं कांहीं सुधारणा केली असती, तर शिताफी खरी !

**मी**-पण या येथें प्रत्यक्ष कालिदासाला सुद्धां सॉलिलोकी टाळतां आली असती असें मला तर वाटत नाहीं.

**बापूसाहेब**—पण एकंदर साऱ्या नाटकाचें संविधानक ज्यांत येईल अशा सॉलिलोकी तरी घालूं नये. प्रस्तुत भाषण तर इतकें कंटाळवाणें होतें कीं, कांहीं पुसूं नका. त्यांतल्या त्यांत अंकाच्या आरंभी तें घातलें आहे हे उपकारच आहेत. कारण लोक सोडा वगैरे पिऊन येत आहेत तों हें आटपून जावें. अहो, असल्या खुब्या देखील सांभाळाव्या लागतात.

सोडा पिऊन येत आहेत तों आटपून जावें

**मार्मि०**—अहो गणपतराव, नाटकाचें संविधानक तर लोकांस कळावें; पण बापूसाहेबांच्या म्हणण्याप्रमाणें भाषणें ऐकण्याची सक्तमजुरी तर लोकांस भोगावी लागूं नये ह्याला आम्ही युक्ति काढली आहे. पण पेटंट काढण्यापूर्वी तुम्हांला सांगावी कीं नाहीं हा विचार आहे.

**गद्यगदाधर**—आमच्या मंडळींत विश्वासघात करणारा कोणी नाहीं, खुशाल बोला.

**मार्मिक०**—मग माझी सूचना अशी आहे कीं, हस्तपत्रकावर नाटकाचा सारांश लिहून वाटावा व सॉलिलोकीज गाळाव्या.

**ललितबुवा**—पण जे फक्त कॉपऱ्यावरील जाहिराती पाहूनच येतील ते! त्यांचें कसें?

**मार्मिक०**—मग तिकिटांबरोबरच हस्तपत्रकें यावीं. जे हस्तपत्रकें घेणार नाहींत, त्यांना तिकिटेंच देऊं नयेत.

**बाबूराव**—पण हा सारांश कोल्हटकरांनींच काढायचा का दुसऱ्या कोणी? नाहीं! म्हणजे तितकें आपलें समजायला!!

**मी**—चेष्टा नका करूं हो! मी खरेंच विचारतों. तुमच्या ह्याला एक अडचण. आहे नाटकगृहांत हस्तपत्रक वाचण्यासारखा सगळीकडे उजेड. नसतो.

**बापूसाहेब**—ह्यावर आम्हीं एक शक्कल काढली आहे. किर्लोस्कर कंपनींत अंकाचे शेवटीं एक पाटी लावतात; तिजवर पुढील खेपेचा खेळ लिहिलेला असतो 'शनिवार मतिविकार' त्याप्रमाणेंच एक बोर्ड करून त्यावर सॉलिलोक्वी लिहावी व यावी पडद्यापुढें लटकावून!

**बाबूरावः**—पण बरेच प्रेक्षक अक्षरशत्रू असतात; निदान मराठी दोन तीन यत्तांच्या पुढें गेलेले नसतात. त्यांना एक एक अक्षर वाचावें लागतें व एका शब्दाचा अर्थ कळतो तों मागला शब्द विसरून जातो.

**बापूसाहेबः**—तर मग शेवटल्या अंकाच्या आधीं येऊन 'जाहिरातींत लिहिल्याप्रमाणें' इत्यादि जे गृहस्थ व्याख्यान देतात त्यांनींच सगळीं आत्मगत भाषणें एकदम म्हणून दाखवावीं. ज्यांना धीर निघेल त्यांनीं ऐकावीं नाहीं तर उठून जावें; म्हणजे नाटकाच्यामध्यें विरस व्हायला नको.

**मार्मिकरावः**—मग त्या गृहस्थांना तरी पाठ करावीं लागतीलच.

नाहीं तर फोनोग्राफ लावावा

**बापूसा०ः**—[ चवताळून ] नाहींतर फोनोग्राफ लावावा.

**बाबूराव:**—हो, म्हणजे कितीदाही वन्समोर झालें तरी हरकत नाहीं!। ( मग ही सूचना टाळ्यांच्या गजरांत पास झाली. )

**मी:**—( डोकें खाजवून ) ह्या सूचनेला कितपत यश येईल कोणाला ठाऊक ?

**अरविंदशास्त्री:**—( जांभई देत ) माझी अशी सूचना आहे कीं, आपण पुढें वाचावं.

**ललितबुवा**
**अर्थभट**
**रागोपंत** } ( जवळ जवळ एकदम ) माझें या सूचनेला पूर्ण अनुमोदन आहे.

**बाबूराव:**—बरें तर मीं आतां वाचतों.

**'मेघनाथ व प्रतीप यांचा सूड एकदम उगवितां यावा अशा संधीची मी सहा वर्षें वाट पाहिली हें बरें झालें.'**

**वाचस्पति:**—काय हो, हा कैलासनाथ इतका विद्वान व चतुर असून हा काय बावळटपणा करतो कीं, एकाद्या गोष्टीची कांहीं तयारी न करतां केवळ संधीची वाट पहात बसतो. आणखी ती थोडथोडकी नव्हे तर सहा वर्षें! अशी संधी येणार हें त्याला ज्योतिषानें अगोदर कळलें होतें कीं काय ?

**मी:**—हो असेलही; जर विलासप्रतीपासंबंधानें भविष्य आधीं कळलें व खरेंही ठरलें, तर ज्योतिष खोटें कां म्हणायाचें ? निदान कवींचा तर या नाटकांत ज्योतिषावर विशेष भर आहे.

**वाचस्पति:**—तसेंच राणीला जगांतून नाहीशी करण्याचा कांहीं एक प्रयत्न न करतां तिनें स्वर्गीचा रस्ता सुधारला अशी खात्री धरणें कैलासनाथाच्या पात्राला शोभत नाहीं. ( कोणी बोलत नाहींसें पाहून ) बरें सध्यां हा प्रश्न नको पुढें वाचा.

**बापूराव:**—...**'भविष्य खरें असेल तर प्रतीपाला मारून आपल्या कारस्थानाला तो ( विलास ) अंशतः साह्यच होणार आहे.'**

**वाचस्पतिः**—कायहो गणपतराव, कैलासनाथाला केवळ विद्येची महती दाखवावयाची आहे व मेघनाथ जो त्याला ह्मणाला, कीं ' जर विद्या खरोखर श्रेष्ठ असेल तर आम्हां दोघांपैकीं कोणाचेंही राज्य हिरावून घे. ' याची दोघांना प्रतीति आणून द्यायची आहे एवढेंच ना ?

**मीः**—कां, त्याला राज्याची इच्छा नसेल कशावरून ?

**वाच०ः**—तसें असतें तर कवींनीं नाटकाचे शेवटीं राणीचें तोंडून ' वंद्याचि ते जगतीं जन साचे, ऐसे महात्मे ' वगैरे जी स्तुति कराविली आहे व ' विद्येबद्दल अतिशय अभिमान ह्याच त्यांचा अपराध आहे ' म्हणून म्हण- विलें आहे तें उगीचच होईल.

**मीः**—बरें मग पुढें ह्मणणें काय ?

**वाच०ः**—असें आहे तर मेघनाथाला व प्रतीपाला मारणें हें त्याला मुळींच इष्ट नाहीं. त्यांच्या जिवंतपणीं राज्यपद हिसकून घेण्यांतच खरें कौशल्य आहे ?

नुसती बुरजी करण्यांत कौशल्य नाहीं

बुद्धिबळांत घोडमल्ली, हुचमल्ली करण्यांतच कौशल्य आहे. नुसती बुरजी करण्यांत नाहीं. तुम्हीं मुद्राराक्षस वाचलें आहे ना ? त्यांत चाणक्याला मलयकेतु व राक्षस ह्यांचा पराभव नुसत्या लढाईनेंही कदाचित् करतां आला असता. पण आपल्याकडील एकही मनुष्य न मरतां त्यानें मलयकेतूकडील फक्त पांच राजे त्याच्याच हातून मारवुन त्याला अचानक कैद केलें व राक्षसासारख्या पक्क्या चंद्रगुप्तद्वेष्ट्या धुरंधर मुत्सद्याला चंद्रगुप्ताचें साचिव्य पतकरायला लावलें. तें कौशल्य कोणीकडे व येनकेन प्रकारेण राज्यपदच मिळविणारे कैलासनाथ कोणीकडे ?

**मीः**—थांबा. ( असें म्हणून पृष्ठ १५९ वरून वांचतो. ) ' प्रतीपास मार- ण्याचे वेळीं त्याला माझ्या सुडाची आठवण देण्याकरितां मीं हें पत्र भृंगीला धाडलें होतें ; पण ' इत्यादि ह्याचें काय ?

वाच०:—अहो तो पुढला भाग आहे, साधतां आला तर आपला साधला इतकेंच! पण प्रस्तुतच्या वाक्याप्रमाणें विलासानें प्रतीपाला अवचित मारलें तर आठवण केव्हां होणार? तें कांहीं नाहीं महाराज. नाटककारांनीं आधुनिक स्त्रीशिक्षणाचा विषय घेऊन जुन्या राजाराणीचें संविधानक घालण्याचा प्रयत्न केल्यामुळें त्याचें त्यांनाच अनावर होऊन सगळीच गल्लत उडून गेली आहे झालें? ह्यापेक्षां मूकनायक व वीरतनय ह्यांचीं संविधानकें बरीं साधलीं आहेत.

बापूराव:—ह्यासंबंधानें आपण पुढें विचार करूं. सध्यां वाचन पुढें चालूं द्या.

बाबूराव:—[ सबंध प्रवेश वाचतात. पृष्ठ ३७–४४ ]

वाच०—हा प्रवेश फारच नामी वठला आहे बुवा! नाटककर्त्यांच्या विनोद व हास्यरसोत्पादक शक्तीची चांगलीच कसोटी उतरली आहे ह्यांत संशय नाहीं? ह्या बाबतींत मात्र त्यांची सर दुसऱ्या कोणास येणें शक्य नाहीं. [ टाळ्या ]

नाटक कर्त्यांची हास्य रसोत्पादक शक्ति

---

## प्रवेश २ रा.

( सारांश:—विलासनंदिनी यांच्या ईश्वरासमोर आणा शपथा होतात. राजा तेथें येऊन विलासाला राजवाडा बंद करितो. )

बाबू०—( वाचतात ) 'विजेच्या वेगानें आपल्यापाशीं येऊन पोंचलें?'

प्रसाद०—काय हो, विजेचा वेग ही मराठी ह्मण आहे कीं, With the speed of lightening ह्या इंग्रजी ह्मणीचें हें भाषांतर आहे?

मार्मिक०—मेघनाथ प्रतीपाच्या राजधानींत कॉलेजमध्यें होता तेथून त्यानें वीज आणिली असेल.

वाच०—भाषांतर असलें तरी कर्णकटू नसल्यामुळें ही म्हण घालायला कांहीं हरकत नाहीं असें मला वाटतें.

नंतर उत्तम तालसुरांत मी पुढील पद वाचलें.

**हीच रीति जगिं ये दिसोनी । विरहाकुल भेटती प्रतिदिनीं संधि साधुनी दिवस यामिनी ॥ ध्रु० ॥**

**तरुच्या स्कंधीं आश्रय घ्याया । वेगें धावाति लतिका जाया । उदधि कंठ निजभुजिं वेढाया । जाति नद्या सोत्कंठ धावुनी ॥ ॥ हीच० ॥**

**प्रसाद०**—हें पद उत्तम साधलें आहे बोवा. भाषाही बरीच सोपी असून कल्पना तर उत्तम आहे

**रागो०**–राग व चालही सुरेख असल्यामुळें पद एकंदरीनें मनोहर झालें आहे.

हें पद फार छान असल्याबद्दल मीं ऐकिलें होतें, तेव्हां त्यावर येथें काय तारे तुटतात तें ऐकण्यास मी सोत्कंठ होऊन राहिलो होतों; पण जेव्हां स्तुतिच ऐकली तेव्हां 'आजवरी जगिं होइ न पारख आज परी मम झालें सार्थक……नय असे जगतांत अजुनि तरि' हें पद जरा मोठ्यानें पुटपुटलों. इतक्यांत

**अरविंद०**—जेहेत्ते थोडेसें कथन करितों अवधान असावें. पदाचा जेहेत्ते साधारण नियम जो आहे कीं, आस्ताईमध्यें जेहेत्ते सर्वसामान्य विधान करावयाचें व अंतऱ्यांत जेहेत्ते उदाहरणें द्यायचीं, तो नियम जेहेत्ते येथें मोडला आहे. दुसरें जगांतील रीतीमध्यें जेहेत्ते 'दिवस यामिनी संधि साधुनि भेटती' व त्याप्रमाणेंच जेहेत्ते 'विलासनंदिनी संधि साधुनी भेटती.' परंतु लतिकांना व नद्यांना जेहेत्ते संधि साधण्याचें कांहींच कारण नाहीं. ह्या प्रमाणें अर्थपोष जेहेत्ते यथास्थित न झाल्यामुळें दोष उत्पन्न होतो.

**वाच०**—शाबास जेहेत्ते शाबास. तुमचें म्हणणें अगदीं बरोबर आहे. तथापि संधि शब्दावर जी कोटि केली आहे ती पाहून मीं अगदीं खूष झालों.

मग मी पुढें पद वाचूं लागलों:—**जरि हीन कुळीं जनन तरी मनुज नाहिं का ।**

नकुळीं जनन

मार्मि०—काय ! नकुळीं जनन! तरी मनुज नाहीं का !

मी०—( ओरडून ) 'हीन कुळीं' पद पुढें म्हणतों.-'दुःसाध्य असति सद्गुण का दीन बालका ॥ ध्रु० ॥ त्या मांडिवरुनि दूर करी काय मेदिनी। त्या अंधकारिं ठेवित रवि कोणत्या दिनीं। त्या ठायिं भिन्नभाव पवन धरित कां मनीं। निज करुण किरण त्यावरि पसरिति न तारका ॥

मार्मिक०–हा जातिभेदावर कोरडा आला बरं कां!

मी०–नाहीं हो; केवळ असें म्हणूं नका. कारण पुंडरीकानें ज्याप्रमाणें चंद्राला शाप दिला त्याप्रमाणें या वेळीं विलासाची स्थिति झाली आहे. त्याच्या प्रेमाची इतिश्री होण्याला जेव्हां कुलभेद कारण होऊं लागले तेव्हां अर्थात् तो त्यावर उलटला.

मार्मिक०–अहो, आपल्या सुधारणांचें घोडें पुढें ढकलायला असेंच कांहीं तरी शोधून काढावें लागतें.

बापूसा०—तो वाद जाऊंद्या हो. सध्यां पदाच्या अंतरंगाकडे पहा. त्या दृष्टीनें पाहतां मला वाटतें पद उत्तम साधलें आहे. त्यांतील कल्पना कवीनें होईल तितकी चित्ताकर्षक करण्याचा प्रयत्न केला आहे व तो चांगला साधला आहे.

प्रसादराय—आणि शब्दही चांगले पडून अर्थबोध छान होतो.

अर्धभट—कांहो किरण करुण कसे असतात ?

बाबू०–अमावास्येच्या रात्रीं किंवा चांदणें सरल्यावर ' तोयैरल्पैरपि करुणया भीमभानौ निदाघे—' या न्यायानें ते करुण असतात, किंबहुना ते दिसतात त्या वेळीं करुणच असतात.

मार्मिक०—पण येथें करुण शब्दानें विशेष अर्थपोष होत नाहीं.

**अरविंदशास्त्री**-पण जेहेत्ते पद्लालित्यपोष तर होतो आहेना! ( तालांत पुटपुटत ) करुण किरण, पुरुषवरण वाहवा!

**मीः**—( पुढें वाचतो. ) **मनुजांत मात्र अन्याय असे। श्रीमंत रंक यापरि परिसें। जड सृष्टिमध्यें मुळि भेद नसे ॥ ध्रु० ॥ दिनमणिवरि पंकज प्रेम करी । कुरवाळुनि तन्मुख वितत करी। स्वप्रेमा दिनमणि दावितसे ॥ १ ॥ धन केवळ जीजवळी सिकता। विमलांतर ऐशी ती सरिता । रत्नाकर मुखिं मुख घालितसे ॥ २ ॥**

**प्रसाद०ः**– ' परिसें ' काय प्रसाद आहे या शब्दांत!

**बापू०ः**-पंकज ही जड सृष्टि कां हो?

**मीः**-ज्याला स्थलांतर करतां येत नाहीं तो जड सृष्टींतला.

**बापू०ः**–मग नदी जड सृष्टींत येणार नाहीं कारण नद्यांचें पुष्कळ वेळां स्थलांतर होतें. शिवाय एका अर्थी तिचें सारखें स्थलांतर होतच असतें. तसेंच दिनमणीही जड सृष्टींत येणार नाहीं.

**मीः**—ज्यांना मनोवृत्ति नाहींत तीं जड सृष्टि.

**बापू०**—मग कवितेंत कवित्व काय राहिलें! पंकजाचें प्रेम ही मनोवृत्ति नाहीं काय!

**मीः**—जी श्वासोच्छ्वास करीत नाहीं ती जड सृष्टि.

**बापू०**—वनस्पती श्वासोच्छ्वास करतात हें सातव्या यत्तेंतच तुह्माला कळलें असेल.

**मीः**—( त्रिसाळून ) जी प्राणीसृष्टीच्या बाहेर ती जड सृष्टि.

**बापू०**—( हंसून ) बरें जाऊं द्या. एकंदरींत अर्थ लक्षांत आला.

**मीः**—**आत्महृदया शांतवाना। प्रेम जडे हें याच पदांबुजिं। गति या चरणाविना बरी ना ॥ ध्रु० ॥**

**प्रसादरायः**—काय हें ! शांतवाना रूप किती वाईट दिसतें, जशी काय ती आतां विलासाला एखादी युक्ति सांगते आहे ! ' अहो तुह्मी अमुक कराना ' ! आणखी ' गति बरी ना ' काय ? ही केवळ कोंदूणाची कविता दिसते आहे.

**मा०:**—मला वाटतें कीं, ' प्रेम जडे हें याच पदांबुजिं ' याच्यापुढें कवीला नीट शब्द सुचेनात; म्हणून हा चरण टाळतां येईल कीं नाहीं हें कवी पहात होते पण कांहीं जुळेना; तेव्हां त्यांनीं आपल्या मनांतील विचार दिला दडपून कीं, ' गति या चरणाविना बरी ना !

गतिया चरणाविना बरी ना

**मीः**—दैव असे प्रतिकूल कधीं जरि । मद्भुज हे आधार तुह्मां तरी ॥

**अर्थभटः**—अरे बापरे ! हिचे हात तरी केवढे होते ? मला वाटतें ' नगर-परिघप्रांशुबाहुः ' अशापैकीं तिचे हात असावे !

**मार्मिक०**—किंवा कैकेयीच्या हाताप्रमाणें लोखंडी असतील !

**मीः**—( पिसाळून ) अहो पुढला चरण तर ऐकाल ?

**मार्मिक०**—बरें, ह्मणा.

**मीः**-विश्रांतिस्थल गणा तयांना ।

**मार्मिक०**-हो ! मधेंच भूकबीक लागली तर हें एक ' आर्यविश्रांतिगृहच ' आपलें समजा.

**अर्थभटः**—एकून एकच. अहो विश्रांतिस्थळ कसें असतें कीं, प्रतिकूल दैवाचा तेथें कांहीं प्रभाव चालत नाहीं. असे हिचे एकेक भुज होते !

**मार्मिक०**—बोल अष्टभुजा महिषासुरमार्दिनीकी जय !!!

**मीः**-एकंदरींत कवीचा भावार्थ असा कीं, तुह्माला बाहेर कितीही कष्ट झाले तरी घरीं आल्यावर तुमच्या शरीराला व मनाला शांति व विश्रांति यायला मीं सदैव तत्पर असेन.

**प्रसादरायः**—कवीचा भावार्थ उघड आहे हो; पण प्रस्तुत स्थितीत 'विनायकं प्रकुर्वाणो रचयामास वानरम्' अशी स्थिति झाली आहे.

**रागोपंतः**–'तसेंच गणा तयांना' ह्मणून ध्रुपदावर परत येतांना 'आ' गटंगळी खातो ! 'गणा तयांनाऽऽत्महृद्या शांतवाना'

**मीः**—वाः ! ती तर बुद्ध्या खुबी केली आहे.

**प्रसादरायः**—अहो खुबी खरी; पण तिच्यामुळें प्रसादहानि किती झाली आहे.

**बाबूरावः**—वाचतात; **'विलासः—इतक्या गोष्टींत जर ब्रह्मदेवानें स्त्री पुरुषांना इतक्या भिन्न प्रकृतीचें केलें आहे तर वैभवाच्या बाबतींतच तीं समसमान असावींत असा हट्ट धरणें वेडेपणा नाहीं कां?'**

**बापूसा०**–वाहवा ! काय विलासराज मुद्दा काढलाहेत, पण ? कोमलता शौर्य, इत्यादि प्रकृतिगुणांत अंतर पडल्यामुळें वैभवांत अंतर पडल्यास चालेल, तर मग तसेंच सौंदर्यांत, शिक्षणांत, हक्कांत पडलेलें कां चालूं नये ? बुद्ध्यां स्त्रीशिक्षणासाठीं नाटक कां रचावें ? तसेंच इतर गुणांतही अंतर कां ठेवूं नये ? ह्मणजे सात्विक पुरुषास तामसी स्त्री, गोऱ्यास काळी, स्वच्छास ओंगळ, शहाण्यास वेडी असें बुद्ध्या कां करूं नये ? हो, ब्रह्मदेवानेंच उदाहरण घालून दिलें आहे ! निदान असें होत असल्यास विलास राजांच्या मतें त्याला कांहीं हरकत नाहीं ! विलासाच्या तात्पर्यावर आक्षेप घेण्याची माझी इच्छा नाहीं; पण तें सिद्ध करण्याला जी युक्ति लढविली आहे ती केवळ अजब आहे.

**बाबूरावः**—( वाचतात ) **नंदिनी खरेंच–**

**मीः**—( पद ह्मणतों ) **न्यून काढण्या भरुनी विधि घडवी स्त्रीपुरुषा । ना तरि रचना त्याची आढळती बहुदोषा ॥ ध्रु० ॥ स्त्री दावी कोमलता । पुरुषहि शौर्या अमिता । होइ उभय मिळवि-**

तां । मूर्तिमंत विश्वपिता । तेजस्वी दिनमणिविण काय गमे रम्य उषा ॥

**बाबूरावः**—मला वाटतें हें पद विलासाच्या भाषणापुढें त्याच्याच तोंडीं यावयाचें; पण पुनः पुढें विलासाचेंच भाषण आल्यामुळें नंदिनीच्याच अंगावर एकदां 'खरेंच' ह्मणून पद म्हणण्याची कामगिरी ढकलून देण्यांत आली आहे.

इकडे अर्थभटांची अवस्था कठिण झाली होती. ते सपाटून डोकें चोळीत होते व गच्चीवरचा वारा चालू असून सुद्धां अगदीं घामाघूम होऊन इकडून तिकडे फेऱ्या घालीत होते. त्यांच्याकडे आमचें लक्ष गेलें तेव्हां त्यांनां मीं विचारलें 'कायहो झालें तरी काय तुह्माला'?

**अर्थभटः**—मीं आपल्याकडून कमाल केली पण 'होइ उभय मिळवितां मूर्तिमंत विश्वपिता' याचा कांहीं मला अंत लागत नांहीं. आज माझी अब्रू जाण्याचा प्रसंग आहे' असें ह्मणून ते फिरून खेपा घालूं लागले. मीं पत्रद्वारा अर्थ मागविण्यासंबंधीं कांहीं ह्मणत होतों इतक्यांत ते म्हणाले. 'सांपडला! सांपडला!!' तेव्हां आम्हीं सर्व म्हणालों 'काय काय? सांगा पाहूं!'

सांपडला! सांपडला!!

**अर्थभट**—अहो विश्वपिता ह्मणजे शंकर! होइ उभय मिळवितां म्हणजे, अर्धनारी नटेश्वर! अर्धा स्त्री, अर्धा पुरुष. 'अर्धांगीकृत नारि सदाशिव'

**बापू०**-शंकर पार्वती दोघें विधीनेंच घडविलीं कां हो! 'विधिघडवी स्त्रीपुरुषां' काय कल्पना आणि काय स्फूर्ति! ह्या तिन्ही कल्पनांनीं आस्ताईतल्या विधानाची काय पुष्टि होते हो!!

**वाच०**—बरें आतां अंतरंग पाहूं. येथें पुन्हां मघाचीच रड. वस्तुस्थिति काय आहे कीं, विलास वैभवानें कमी व नंदिनी जास्त. पण उदाहरणांमध्यें उलट प्रकार! स्त्री कोमलता पुरुष शौर्य. पुढलें उदाहरण तर स्पष्ट आहे. 'तेजस्वी दिनमणिविण काय गमे रम्य उषा' म्हणजे दिनमणि तेजस्वी व उषा निस्तेज!

म्हणजे काय कीं, कवी 'दिनमणि' 'उषा' 'तेजस्वी' 'रम्य' इत्यादि शब्दांवरच गार करूं पाहतातसे दिसतात. पण हें अगदींच नीरस लागतें. उच्च उदात्त किंवा कविप्रिय कल्पना नुसत्या घालून उपयोगी नाहीं तर त्या वस्तुस्थितीला बरोबर लागू पडून सहृदय मार्मिकाच्या मनांत चमत्कृति उत्पन्न करतील अशा असल्या पाहिजेत. तसेंच नेहमीं अर्थांतरन्यासावरच भर न देतां 'जगदीशा तात असशि' ह्यांतील रूपकाप्रमाणें इतरही बरेच अलंकार मधून मधून आल्यास कवित्व विशेष मनोहर होईल.

बापू०—( वाचतात ) ......' **वि०—ज्याला सधन लोकांकडून अर्धचंद्र मिळतो अशा पतीसह चंद्रमौळी घरांत तुझ्यासारख्या चंद्रमुखीनें कसें रहावें' नं०:–'ह्मणूनच तर रहाणें आवडेल' वि०:—'असें ह्मणणें ह्मणजे ओढून चंद्रबळ आणणेंच आहे.'**

गद्यगद्य०—ही चंद्र शब्दावरील कोटि फारच उत्तम साधली असून मला अतिशय आवडली.

मग मीं पद वाचलें '**प्रिया घोर कुशंका। आणिली मनीं कां ॥ध्रु०॥ कोणती सुरामा विमल अशा प्रेमा। लावि कलंका ॥'**

मा—'सुरामा' बरं का, नाहींतर म्हणाल एखादी वेंकी विंकीं! आपलें सोडवून घेतलेलें असावें कीं, जर कोणी कलंक लावलाच तर ती सुरामा नाहीं म्हटलें म्हणजे झालें! शिवाय नायिकेच्या तोंडून प्रत्यक्ष बजावलें कीं मी सुरामा आहे म्हणून!

बापूसा०–तशीच-ही नुसती शंका नाहीं, कुशंका नाहीं तर 'घोर कुशंका' कीं कोणाचा खून बीन करणार आहे कीं काय!

मी—कां बरें! ही आपला वचनभंग करील ही कल्पना घोर म्हणतां येणार नाहीं कां!

**बापू**०—खरेंच ! चांमुंडा देवीच्या भक्तांच्या सुद्धां कल्पना इतक्या घोर नसतील !

मग मीं विलासाचें पद वाचूं लागलों.

**भ्रांति हो स्वांति या मरणहि मज पुरवत सतत वसति तुजविण करण्याहुनि निर्जनी मेदिनी काननीं ॥**

**मा**०—ह्यांना भ्रांति होऊन वान्ति होते म्हणून मेदिनीवर मरून पुरून घ्यायची इच्छा आहे वाटतें !

**बापू**०—असें नव्हे. त्याला रानांत वसाहत करावयाची होती; पण त्याच्या स्वांति भ्रांति झालेली ! तेव्हां बायकोवांचून वसति करण्यापेक्षां मेलेलें पुरवलें.

**अर्थभट**—तसेंही नव्हे. तिच्यावांचून मेदिनी निर्जन कानन होणार, तेव्हां त्यांत रहाण्यापेक्षां मरण पतकरलें.

**मा**०—मग बराच सुगम अर्थ आहे, मला वाटलें दोन तीन तरी साली काढाव्या लागतील.

**बाबू**०—पुढच्या पदापर्यंत थांबा ! अजून काय पाहिलें आहेत ? पण आधीं हें पद तर संपूं द्या.

मग मीं पद सर्व वाचलें; पण तें संपायच्या आधींच मार्मिकराव आपल्याशीं

कशासाठीं पोटासाठीं

सुरावर पुटपुटत होते. ' कशासाठीं पोटासाठीं खंडाळ्याच्या घाटासाठीं भप् भप् भप् भप् ' कांहीं मंडळी हताश होऊन मागें रेलली होती व गदागदाधर तर डुकल्या घेत होते. तें पाहून बाबूरावांनीं तेंच गद्याप्रमाणें अर्थबोध होण्यासारखें थांबून वाचलें तें असें ' **विभव न मम करिं अणुभरिं; तन मन तव करिं अर्पित; मुळिं नच अवगणिं; धन न मजजवळिं; तदितर अभिमत वद मज अघटित त्यजुं असु, रणिं पडूं, हरिमुखि वदना धरूं.** '

**मा**०—बस्स ! इतकेंच ?

**बाबू**०—हा चरण इतकाच.

मा०–असे चरण तरी किती आहेत ?

वा०—आणखी दोन चार शब्द घेऊन मग ह्मल तुमचे संपले.

बापू०—विलासराज काय ह्मणताहेत त्यजुं असुं !

मा०—जीव देऊं ?

ललित०–किंवा विपें गाळूं ?

बाबू०—रणिं पडूं ?

मा०—रुसो-जपानमध्यें गोळी खाऊं ?

बापू०—हरिमुखिं वदनाधरूं !

का सर्कस काढूं ?

मा०—का सर्कस काढूं ?

मी—ती कशी ?

मा०–सिंहाच्या तोंडात तोंड (वदन) कोठें घालतात ?

वाच०—आणखी हें सगळें अघटित बर कां ?

प्रसाद०–इतकेंच नाहीं तर हीं सर्व नंदिनीला अभिमत अशा अघटिताचीं उदाहरणें आहेत.

गद्य०–इतका नेभळा नायक करूं म्हटल्यास व्हायचा नाहीं. विलासाचीं साधीं गद्य भाषणें सुद्धां अगदीं बायकी आहेत. मला वाटतें त्याचें सर्व शिक्षण नांदिनी बरोबर झालें; हें दाखविण्याकरिता त्याला बायक्या नायक केला आहे.

नेभळा नायक

कारण या कवीला जोरदार नायक करतां आला नसता असें नाहीं. उदाहरणार्थ विक्रान्त पहा, पहिल्यापासून शेवटपर्यंत जोरांत आहे. अशाच एका प्रसंगीं तो काय ह्मणतो पहा ' मतंगजाची धुंदी हरूं मीं । भुजंगमा करूं तव अनुगामी । व्याघ्रमुखीं कर ठेवूं क्षामीं ( येथें सुद्धां सर्कस आहेच ) तसेंच पुढें ' भुजबल गौरव दर्पाक्रान्ता । नाममात्र कंपित सामंत सार्वभौम नृपवर विक्रान्ता घालूं कां चरणीं । ' हें भुजबल झालें, नितकें नसलें तर विक्रान्ताप्रमाणें मनोबल तरी ! विक्रान्त म्हणतो ' कृपणातें बनवूं मीं दाता । कृतघ्न करूं उपकारी काय ? '

**मार्मिक०**—ह्मणूनच मला वाटतें मघांच्या पदांत त्याला सरिता व उषा ह्यांची उपमा दिली आहे व नंदिनीला रत्नाकर व दिनमणी ह्यांची दिली आहे.

**वाच०**—यासंबंधानें पुढें विचार करूं. सध्या पुढें वाचा.

**मीं—' तूं कथीं...संप्रती '**

तेराशें प्रती आश्रमा प्रती **मार्मिक०**—( पुटपुटतात ) ' तेराशें प्रती आश्रमाप्रती.'

**बाबू०**—( वाचतात ) **' मला तुमचें नुसतें प्रेम मिळालें ह्मणजे झालें '**

**मा०**—जीवबीव नको !

**बाबूराव—...राजविलास नको, माझा हा एकटा विलास मला मिळाला ह्मणजे माझें कांहीं ह्मणणें नाहीं !**

**गद्यग०**—पहा ! कोटि करण्याच्या घाईमध्यें हें भाषण कोणाच्या तोंडीं आपण घालतों आहों हें कवि अजीबात विसरले. हा एकवचनी प्रयोग कानाला किती वाईट लागतो ! ' माझे सर्व विलास आपणच आहांत ' ' तुह्मीच नाहीं मग विलास कोठून येणार ' अशा अर्थाचें एखादें वाक्य घातलें असतें तर तें ह्मणून त्याच्या लज्जाविर्भावाचा अभिनय केला असतां जी बहार होणार आहे ती तर नाहींच, उलट ह्या भाषणानें दांडगेपणा मात्र दिसतो.

**मार्मि०**—( पुटपुटतात )' प्राणसखा जिवलगा फुलाचा झेला.'

**बापू०**—असा लज्जाविर्भावाचा अभिनय करणें ह्मणजे रचलेलें नाटक फुकट घालविणें होय. पृ. ९८ वर राजा कैलासनाथाला ह्मणतो कीं, त्याच्या प्रियेनें जातांना त्याजकडून वचन घेतलें ( हें पूर्वीं नाटकांत आणायला फुरसत झाली नाहीं ) कीं नंदिनीला चांगलें पुरुषासारखें शिक्षण द्यायचें ! त्यावरून कवीचे स्त्रीशिक्षणाविषयीं काय विचार आहेत तें कळून येतें. तुह्मी ५।२५ शतकें सुधारणेच्या मार्गे आहांत गदाधरपंत !

**वाच०**-बाकी एका गोष्टीसंबंधानें कवि अगदीं अरसिक दिसतात. स्त्रीशि-क्षणासंबंधानें कांहींही मतभेद असो, पण स्त्रियांना नैसर्गिक असे जे कोमल

भाव, ज्यासंबंधानें 'स्त्री दावी कोमलता' 'अबलांचें सुकुमार जरी मन। संकटिं शांति करी तरी धारण' इत्यादि शब्दांनीं निदर्शन केलें आहे त्यांच्या मनोहरत्वाचें खरें मर्म कवींना कळलेलें दिसत नाहीं व कुलवधूंच्या मर्यादायुक्त सविनय ईषत्स्मितशोभित भाषणासंबंधानें तर त्यांचें अगदीं उलट मत असलेलें दिसतें. भाषणासंबंधानें पाहिलें तर ह्यांच्या नाटकांतल्या सगळ्या बायका बेफाम दिसतात. सगळ्यांना कवींचा हुकूम झालेला आहे कीं, काळवेळाकडे न पाहतां सांपडेल तेथें कोटि करावयाची. नाहीं ह्मणायला दासींचे तोंडीं मात्र 'मेल्याला' वगैरे शब्द येतात, तेही एखादे वेळेस ! कालिदासादि संस्कृत कवी बिचारे जुन्या तऱ्हेचे, ते होतां होईल तों आलिंगनाचे प्रसंग आणीत नसत; अगदींच अवश्य (उर्वशी शापमुक्त झाली, मालती अघोरघंटाच्या तडाक्यांत असतांना इ०) तेथेंच ते तसें करीत. पण त्यावेळेस खरी प्रीति नव्हतीच. कारण त्या सर्व बायका बायकांप्रमाणें शिकलेल्या ! त्यांची बिचाऱ्यांची प्रीति ह्मणजे प्रियकराचे सुखापुढें आपलें सुख कःपदार्थ मानणें ही होय. पण अलीकडे प्रत्येक सुशिक्षित व त्याची स्त्री ही वल्लभ रमणी झाल्याकारणानें खऱ्या प्रीतीचा पश्चिमेकडून उदय झाला आहे. ह्या प्रीतीची व्याख्या कवींनीं सुनंदेच्या तोंडून पृ. ५६ वर वदविली आहे कीं, 'वल्लभ नेहमीं जवळ असावा अशी जी इच्छा तिचे नांव प्रीति.' ही जुन्या लोकांना कदाचित् स्वार्थपर दिसणार आहे पण सध्याच्या समसमान हक्काच्या काळांत पूर्वींची व्याख्या स्वीकारणें ह्मणजे पुरुषांनीं स्त्रियांच्या हक्कांची जाणून बुजून पायमल्ली करणें होय! अलीकडचे प्रेमाची तऱ्हा कांहीं निराळीच आहे! 'वीरतनयां'त वीरसेन मालिनीनें त्याला वरण्याचें कबूल केल्याबरोबर सपाट्यास बिला आलिंगन देतो, व काकुळतीस येऊन म्हणतो. 'मुख उचलोनी दोनि करीं करि परिवृत मज मीड सोड जोडिं पाणि' हात जोडतों पण तूं एकदां मला आलिंगन दे. नंतर एकमेकांच्या गळ्यांत हात घालून बोलतात, मालिनी म्हणते 'जगदीश्वरची या मम जाणे! हृदया सहिता सुप्रेमानें.'

सगळ्या बायका बेफाम दिसतात

खऱ्या प्रीतीचा पश्चिमेकडून उदय

मार्मिक०—सुप्रेम बरें का ! नाहीं तर ह्मणाल जुनें सुपर्स्टिशस प्रेम असेल !

बाबू०—जगदीश्वरा तूंच जाणतोस हें अनिर्वाच्य प्रेम पांच मिनिटांत कसें जडलें तें !

वाच०—तसेंच वेत्रिकेला प्रतोदाची ओळख पटल्याबरोबर सपाट्यास आलिंगन

टाळ्या कशा पडतील ?

मार्मिक०—नाहीं तर थिएटरांत टाळ्या कशा पडतील ?

वाच०—नाहीं ह्मणायला चुंबनाचा प्रकार त्यांनीं अजून आणला नाहीं.

मार्मिक०—ह्याबद्दल ह्यांच्यावर व्होट ऑफ सेन्शर आणलें पाहिजे. कारण हा प्रकार विलायतेंत चालू असून येथें अजून आला नाहीं ह्यामुळें कर्तव्यहानि झाली आहे.

वाच०—विक्रांतमहाराज काय ह्मणतात ! पृ. १५८ 'आम्हीं पुरुष आतां कांहीं दिवसांनीं अगदीं बायकांप्रमाणें बनणार असा रंग दिसत आहे; तर आतां बायकांनींच आमच्या शौर्याची, धैर्याची आणि अभिमानाची उणीव भरून काढली पाहिजे.'

मार्मिक०—मला वाटतें म्हणूनच कवींनीं स्त्रीशिक्षणाचा एवढा खटाटोप मांडला आहे !

ललित०—कायहो कटाक्षवीक्षणाचीही कांहीं रुचि कवींना दिसत नाहीं.

कटाक्षवीक्षण

त्यावर ह्यांचें रूपक उपमा वगैरे 'अविरलमिव दाम्ना पौन्डरीकेण नद्धः' इत्यादिप्रमाणें केलेलीं दिसत नाहींत.

मार्मिक०—कायहो तुम्हीं चमत्कारिक तरी ! विलायतेंत ह्यांचें महात्म्य कोठें आहे. !

मीः—( औपहासिक स्वरानें ) जरा गरीबाचें ऐकाल का ? वीरतनय पृ. ८६ पहा 'अपांगदृष्ट्या पांग फेडि या नयनांचे धवलांगि मम क्षणीं.'

बाबूरावः—याचा आपण जरा मार्मिक विचार केलात तर आपणास दिसून येईल कीं, येथें अर्थचमत्कारापेक्षां शब्द चमत्कारावरच कवींची जास्त

दृष्टि आहे, व पुढच्या धवळांगि या शब्दानें तर त्या अर्थालंकाराचें सर्वस्व हरण झालें आहे. तथापि एका उदाहरणामुळें ललितबुवांचा मुद्दा कांहीं समाधि घेत नाहीं.

**बापू०**—आतां मला वाटतें पुढें वाचावें.

पुढें पद आलें. तें पुष्कळांच्या तोंडीं झालेलें तेव्हां मीं मोठ्या जोरानें घोकून ह्मटलें तें—

**'प्रणय तरंगांसवें विवश वाहतों जवें। जलरवें नैकवे गतिमुळें न पाहवे ॥ ध्रु० ॥ योगबळें जणुं यति। बाह्य उपाधीं-प्रति। प्रणयिजन निवारिती। खेद मुळिं त्या न शिवे ॥१**

**प्रसाद०**—काय प्रासादिक शब्दरचना हो! 'खेद मुळीं न त्या शिवे।'

**मार्मिक०**—कां शारदेंत नाहीं वाटतें 'कोण तुजशिवाय' ( चांभाराच्या जोडा शिवाय ओरडण्याच्या चालीवर ) जोडा शिवय् ॥

**बापू०**—मेघनाथाचा एवढा बांध पडला तरी प्रणयतरंग इतका जोरांत आहे कांहो!

**मीः**—ह्याचेंच उत्तर अंतऱ्यांत दिलें आहे.

**बापू०**—काय! काय! अंतऱ्यांत! अंतऱ्याचा अर्थ सांगा पाहूं!

**मीः**—अर्थ होय! अं...हो, सांगतों. ( दोनचारदां वाचून पाहिलें पण नीट लागेचना. )

**मीः**—थोडक्यांत सांगाहो, त्याच्यावर टीका नाहीं केली तरी चालेल.

**वाच०**-तुम्ही अन्वयच सांगा!

**मीः**—( मोठा प्रयत्न करून ) जणु यति योगबळें बाह्य उपाधीं प्रति विवश वाहतो, तया ( अध्याहृत ) प्रणयिजन निवारिती. ( तथापि ) खेद त्या मुळिं न शिवे.

**मार्मिक०**—प्रणयिजन ह्मणजे कायहो!

**मीः**-अहो आप्त इष्ट!!

**अर्थ०**-असा अर्थ नाहीं गणपतराव. खरा अर्थ असा आहे कीं, जणु यति योगबळें बाह्य उपाधीं प्रति निवारिती ( तसें ) प्रणयिजन ह्मणजे वल्लभ व प्रिया हीं बाह्य उपाधीं प्रति निवारिती । खेद त्या मुळिं न शिवे.

**बापू०**—मग ह्याचा अस्ताईशीं काय संबंध ?

**अर्थ०**—बाह्य उपाधींबद्दल बेफिकीरपणा.

**बाबू०**—पण अस्ताईत तर त्यांचा इलाज चालत नाहीं असें म्हटलें आहे आणि येथें निवारिती ह्मटलें आहे !

**अर्थ०**-हें पहा. अस्ताईशीं संबंध अन् बिबंध असल्या भानगडींत पडूं लागलों तर गणपतरावासारखे शब्दांचे व अर्थांचे धिंडवडे करावे लागतील.

**बापू०**-पण एकंदर पदांत कवींचा काय दाखविण्याचा हेतू आहे तेंच कळत नाहीं.

**मीः**—कीं, 'तुझ्या बापाच्या उपाधींबद्दल काळजी करण्यास नको.'

**अर्थ०**-जेहेत्ते एकदां ह्मणतात 'विवश' एकदां 'निवारिती,' आणखी एकदां जेहेत्ते 'खेद होत नाहीं,'

**बापू०**—एकंदरींत ह्या पदांत चालीशिवाय बाकी आनंद आहे !

**मी**—कां यतीची उपमा काय वाईट आहे ?

**वाच०**-ती जरा बरी आहे; पण त्यांतील साधारण धर्मापासून म्हणण्यासारखी कांहीं चमत्कृति उत्पन्न होत नाहीं. इतकेंच नाहीं तर 'खेद मुळिं न त्या शिवे' हें प्रणयिजनांना लागूंच पडत नाहीं असें मला वाटतें.

**रागो०**-'नैकवे' ह्या अडनेड रूपानें फायदा न होतां एक मात्रा कमीच पडते.

**बाबू०**—[ वाचतात ] **आतां आवडीनें लाविलेल्या वृक्षलतांचे विलास डोळ्यांनीं पाहून आपला प्रेमानंद द्विगुणित करूं.**

**बापू०**—मागें वियानंद आले होते त्यांचेच कोणी तरी हे प्रेमानंद दिसतात !

हे शिष्यस्वामि कां गुरुस्वामि

**मा०**—मग हे शिष्यस्वामी कां गुरुस्वामी ?

गद्य०—काय ही भाषा! डोळ्यांनीं पाहून काय! प्रेमानंद द्विगुणित करूं काय!

मा०—मीं सागतों कवींचें मूळचें वाक्य काय होतें तें. 'प्रिया आतां आवडीनें लाविलेल्या वृक्षलतांच्या स्वागतपर कुसुमपरिमलाचा नाकानें वास घेऊन होणारा जो उल्हासानंद त्यांत त्यांच्या फलरसपाकमाधुरीपासून होणारा सुरसानंद मिळवूं परंतु त्यांना मधुर गायनासाठीं कंठ नसल्यानें कानानें ऐकूं न येणारा जो सुस्वरानंद तो वजा करूं. मग त्यांचे विलास डोळ्यांनीं पाहून होणारा प्रेमानंद द्विगुणित करूं व या मंजुल शीतल वायुला अंगानें स्पर्श करून होणारा जो विवेकानंद त्याचा त्यांना भाग देऊं.' असें मूळ होतें; पण खिळेजोडकाचा ऐच्छिक विषय गणित नसल्यानें त्या बेट्याला आला कंटाळा, व मूळ होतें त्यातील एकच वाक्य राहिलें.

बाबू०—जाऊंद्या हो 'त्यासि न कांहीं इलाज. शोका टाकुनि व्हा धृतिभाज्.' मी आतां पुढें वाचतों. **'विलास-नंदिनि प्रथम एकदां ईश्वरासमोर आणा शपथा वाहून टाकूं.'**

मा०—ह्मणजे रजिस्टर डीड झालें!'

बाबू०—**'ह्मणजे असमाधानाला जागा राहणार नाहीं.'**

बापू०—नाहीं तर असमाधान काय होणार होतें!

गद्य०—अहो कोणीं जर वचनभंग केला तर शपथ त्यानें मोडली, मीं नाहीं, म्हणून दुसऱ्याला जें समाधान व्हावयाचें तें होणार नाहीं.

मार्मि०—मीं म्हणतों असमाधान याचा वाईट अर्थ मुळींच नाहीं. कारण असमाधान याचा खेदाच्या पक्षीं अर्थ घेतल्यास आधींच जें ठरलेलें आहे 'खेद मुळिं न त्या शिवे' त्याला हरताळ लागेल.

मीं—( पद म्हणतों ) **' अससी गगननयन पवन-श्रवण सद्वन करिसी '**

वाच०—वाः कल्पना छान आहे.

**अरविंद०**—जेहेत्ते श्र पुढें आसल्यामुळें न दीर्घ होतो. कारण दोन्ही संस्कृत शब्दाचा समास जेहेत्ते आहे. 'संयोग ऱ्हस्वास गुरुत्व देतो' वृ. द. अतएव मात्राभंगः ।

**मीं**—वाचतों **'जरि तूं विभुवर होशी तरि ही अणुवरि वससी'**

**वा०**—वाः छान ! छान !

**मीः**—**'तवचि मनन मात्रिं भुवन जनन मरण सकल हनन येइ घडुन तुजसि करुणहृदय नमन करुनि विनवितों.'**

जारणमारण प्रयोग

**मार्मिक०**—आटपला का तुमचा जारणमारण प्रयोग ?

**बापूरावः**—मघांच्या पुरणवरणाची येथें कांहींच डाळ शिजायची नाहीं !

**गद्य०ः**—कायहो, ही दोघांनीं एकदम म्हणण्याची चाल कायहो ?

**मीं**—कां बरं ? 'मालतीमाधवांत' माधव व अघोरघंट तोच श्लोक परस्पराला उद्देशून एकदम म्हणतात.

**वाच०**—तेथें खरें पाहिलें तर कवीनें शब्दचमत्काराकडे विशेष लक्ष दिलें आहे. दृश्य काव्य ह्या दृष्टीनें नाहीं तरी हें शोभत नाहींच. येथें हें शोभलें असतें पण तें 'शांताकारं' सारखें नित्यपाठांतलें असतें तर असो. एकच कल्पना दोघांच्या मनांत येऊन त्याच शब्दांनीं त्याच चालीवर तेंच पद दोघांनीं रचून म्हणणें अशक्य आहे.

**बापू०**—मला आणखी एक सूचना कर्तव्य आहे. हें पद आकाशांतल्या बापाला उद्देशून घातलें आहे त्यापेक्षां एखादें शिवालय दाखवून शंकरापुढें शपथा घेतल्या असत्या तर प्रसंग विशेष खुलला असता.

**मार्मि०**—अब्रह्मण्यम् ! अब्रह्मण्यम् । अहो नंदिनीला पुरुषासारखें शिक्षण मिळालें आहेना ? मग आतां तिला जुना काडवाती बोटवातीचा धर्म कोठें राहिला आहे ? अहो, सुधारणांत सुधारणा ! क्या अजब बात है !

**वाच०**:—एकंदरींत कवींना परमेश्वराच्या सगुण स्वरूपाची प्रार्थना व वर्णन करण्यांत कमीपणा वाटतो असें दिसतें. नाहीं ह्मणायला अगदीं प्रथम लोकाश्रयाचा अदमास येण्यापूर्वी रचलेलें जें वीरतनय, त्यांत मात्र 'जनित हेरंब' व 'त्रिमुख' ह्यांचें स्मरण केलें आहे, पण त्याची लाज वाटूनच कीं काय लागलींच शूरसेनाचें तोंडीं 'तुह्मी अन्यथा ती' हें निर्गुणेशस्तवन आहे.

निर्गुणेश स्तवन

**मीः**—मीं दोन चार ठिकाणें अशीं दाखवितों कीं ज्यांत ईश्वराचें सगुणत्व गृहीत धरलेलें आहे. उ. वीरतनय पृ. ५८ 'अनाथ देई कालिं या । तुझ्याच हातिं बालका।'

**अरविंदशास्त्रीः**—जेहेत्ते अगदींच पोकळ! प्रार्थनासमाजाच्या पद्संग्रहांत सुद्धां 'तवचरणिं लीन' इत्यादि जेहेत्ते प्रयोग येतात.

**मीः**—'तदुपरि धरिं कर महान्' ( वी. त. पृ. ७९. )

**माः**—त्याचाच बाप तो!

**मीः**—( वी. त. पृ. ८७. ) 'हे देवा चक्रगदापाणे.

**शीघ्रकविः**—हें केवल शब्दानुप्रासासाठीं आणलें आहे. त्याची पदांत कांहींच शोभा नाहीं. हें जरा पाहिलें असतां उघड आहे.

**मीः**—( पृ. १२१ वी. त. ) 'पद्पंकजिं;' तें जाऊं या. पण वीरतनयांतलि ईशस्तुति पहा! 'तुज ध्यातो श्रीरामा' इत्यादि.

**वाच०**:—हां यांत मात्र सगुण स्वरुपाचीं पुष्कळ विशेषणें आहेत पण तुह्मी जरा खोल नजर देऊन पहा, त्यांत अर्थगौरव आणण्याचा, असा प्रयत्न मुळींच नाहीं. इतके शब्दचमत्काराला उपयोगी पडण्याजोगे असे अनुस्वारयुक्त व इतर शब्द सगुणस्वरूपाच्याच विशेषणांत सांपडण्याजोगे असल्यामुळें तसे त्यांना डिक्शनरींतून शोधून घ्यावे लागले. शिवाय हें त्यांचें पहिलेंच नाटक बक्षिसाकरितां असल्यामुळें हेंही एक त्याला कारण आहे. तथापि

त्यांतही त्यांनीं आपल्या निर्गुण शून्याकार अविकार दैवाचें प्रथम स्तवन केलें आहे ' धन्य तुझी रचना. ' पण पुढल्या नाटकांत त्यांनीं लोकांची भीड मुळींच ठेवली नाहीं.

मीः—बरें दुसऱ्या नाटकांत दाखवतों. मूकनायक. पृ. १०४ रोहिणीः—आई जगदंबे, तूं विश्वाची या जननी...... मंगलमूर्ती ध्याउनी तुझी या चित्तीं. '

जरा आठवण ठेवली

वाच०:-आहे बुवा; येथें मात्र कबूल. येथें मात्र कवींनीं ईशस्तुति आपण कोणाच्या तोंडीं घालतों आहो याची जरा आठवण ठेवली!

मा०:—उघडच आहे! रोहिणीला कोठें पुरुषासारखें शिक्षण मिळालें आहे?

वाच०:-हीं सर्व उदाहरणें तुह्मीं शोधशोधून काढलीं तरी इतकींच निघालीं; पण निर्गुण परमेश्वराचीं पदें ह्याहून किती तरी काढून दाखवितों.

मीः-मग सुशिक्षित लोकांनीं निर्गुण परमेश्वराची स्तुति करूं नये तर कां जाखाईजोखाईच्या किंवा सोटया झसोबाच्या भक्तांनीं करावी?

वाच०—पदांचा अभिनय करणारे कवी, कीं नाटकांतील पात्रें?

मीः-अर्थात् पात्रें

प्रार्थना समाजिस्ट पात्रें

वाच०—मग त्या पात्रांपैकीं प्रार्थनासमाजिस्ट पात्रें किती आहेत?

मी—कांहीं लक्षांत नाहीं बोवा! पत्र लिहून विचारीन पाहिजे तर कवींना.

वाच०-(हंसून) नाटकांत कांहीं दिग्दर्शन आहे का? स्टेजवर तोंडीं माहिती यायला कांहीं कवी येत नाहींत!

मी०—पण पात्रें निर्गुण परमेश्वरभक्त आहेत असें समजलें तर काय हरकत आहे?

वाच०—ठीक; आतां तुम्हींच विचार करून पहा कीं, ज्या काळीं ज्योति-

त्यांचें बंड होतें व तलवार हेंच शस्त्र होतें अशा वेळीं राजेराण्या सुद्धां निर्गुण-स्वरूपवादी घातल्यानें शोभा येईल कां रोहिणीच्या तोंडीं जसें जगदंबेचें पद अगदीं योग्य दिसतें तसें घातल्यानें शोभा येईल ? नाटक हें दृश्य काव्य आहे, त्यांत रसपरिपोष होण्याला ज्यांत लोकांना गोडी नाहीं व जे पात्रांच्या तोंडीं अगदीं अस्वाभाविक दिसतील असे प्रयोग घालणें अगदीं अप्रशस्त आहे. समजा हेंच नाटक मराठी लोकांकरितां एखाद्या मुसलमान किंवा खिस्ती सुसिक्षित मनुष्यानें लिहिलें, पण त्याच पात्रांच्या तोंडीं महमद पैगंबराच्या किंवा आकाशांतील बापाच्या स्तुतिपर पदें घातलीं तर कसें दिसेल ? समजा उद्यां रोहिणीच्या पात्रानें जगदंबेची प्रार्थना करण्याऐवजीं 'प्रभु मज तारण दे पतिताला' हें म्हणायला सुरवात केली तर कसें दिसेल ?

प्रभु मज तारण दे पतिताला

**बापू०**—फार कशाला, शारदा नाटकांत पहा व गुप्तमंजूषमध्यें पहा. शारदेंत समवयस्क मुली श्रीशंकराचे देवळांत जमून 'शंभो शिवहर' हें पद म्हणतात व गुप्तमंजूषांत सर्वजणी 'जगदीशा तात असासि कलिकाला' ह्या अव्हंबरानें सुरवात करितात. ह्यापैकीं स्वाभाविक मनोहर व जास्ती परिणामकारक कोणतें आहे ? असो; पुढें वाचा.

**बाबूरावः**—(वाचतात) **"विलासः—'प्रिये तुझा उदार स्वभाव पाहून महाराजांचा अनुदारपणा मी विसरून गेलों"**

**मीः**—(पद म्हणतों) **'उगम संकूचित महानदीचा। तेंवी तव जनकवृत्ति संकुचित।'**

**मार्मिक०**—'संकुचित' हा नवीन व संकुचित प्रयोग घालण्यापेक्षा ज्याचें तो भाषांतर आहे असा नॅरोमाइंडेड हा इंग्रजी प्रयोग घालायला ह्यांना संकुचितत्व उर्फ संकोच कां वाटला ?

**ललित०**—हा पाहिला नायकाचा उदात्त स्वभाव ! जरा उलट गेल्याबरोबर नंदिनीसमक्ष विलासराज तिच्या बापाला शिव्या यायला लागले. कोणता

सुज्ञ मनुष्य एम. ए. एलएल. बी. झाला असला तरी आपल्या बापाला असले शब्द लावलेले ऐकून घेईल ! पण नांदिनी बिचारी भोळी, आणखी तिच्या बापाला टोला देतांना तिला स्वतःला महानदीची उपमा दिली तेव्हां ती खुलली न् काय !

अरविं०--जेहेत्ते फार फार तर तिच्या बापाला गद्यामध्यें अनुदार म्हटलें आहे तेवढेंच जेहेत्ते बरस्त आहे.

---

## प्रवेश ३ रा.

( सारांश--नंदिनीची विरहावस्था. तिच्या समाचाराला आलेल्या वंचकाची विलासाच्या विरहावस्थेबद्दल कुचेष्टा. )

बापू०--( वाचतात ) ' कुचेष्टिताः--कोण आहे तें ? कोण ? सुमंतकन्या सुनंदाबाई, सेनापतिकन्या असिलताबाई; न्यायाधीशकन्या तुलिकाबाई ! राजवैद्यकन्या सुभद्राबाई ! ज्योतिषीबुवांच्या लाडक्या ताराबाई ? '

हें संपतें न संपतें तों मार्मिकरावांनीं मंत्र म्हणायला सुरुवात केली. ' सुमंतकन्यां सुनंदादां चाणक्यगोत्रां स्वधानमस्तर्पयामि स्वधानमस्तर्पयामि । न्यायाधीशकन्यां तुलिकादां रामशास्त्रीगोत्रां स्वधानमस्तर्पयामि स्वधानमस्तर्पयामि । राजवैद्यकन्यां सुभद्रादां वाग्भटगोत्रां स्व. तर्प. स्व. तर्प. । सेनापतिकन्यां असिलतादां शिकंदरगोत्रां स्वधानमस्तर्प. स्व. तर्प. । ज्योतिषीकन्यां तारादां भास्कराचार्यगोत्रां स्व. तर्प. स्व. तर्प.

शिकंदर गोत्रां स्वधानमस्तर्पयामी

आम्ही त्यांना हो हो, पुरे, म्हणतों आहों पण ते लवकर थांबलेच नाहींत. ते थांबले तों एकाच्या अंगात आलें कीं दुसऱ्याच्या येतें त्याप्रमाणें गदगदाधर भूगोल म्हणूं लागले. ' इंग्लंडची राजधानी लंडन, फ्रान्सची राजधानी पारीस स्पेनची रा. माद्रिड, पोर्तुगलची रा. लिस्बन, बेल्जमची रा. अँटवर्प हॉलंडची रा. ब्रुसेल्स, डेन्मार्कची रा. कोपनहेगन, स्वीडन...... '

हो हो हो करतां करतां हे येथें थांबले. इतक्यांत बाबूराव 'नासिकात्र्यंबकच्या भिक्षुकांच्या वह्यांमधील पान ' म्हणून म्हणूं लागले 'गोमा सोमाजी, आजे धोंडभट, पणजे केरू शास्त्री, त्यांचे वडील नथूभट, त्यांचे भिकंभट '

एवढा गहजब होण्याचें कारण मला समजेना व तें मीं त्यांना विचारलें तेव्हां,

**वाच०**-ही काय तऱ्हा हो, कीं आपली साहेब लोकांच्या लेव्हीला का दरबारला याद् लागते त्याप्रमाणें एखाद्या पात्रानें इतर पात्रांची एका मागून एक गोत्रावळीसकट यादची याद् द्यायची ?

**मी**—मग पुढल्या भाषणांतील शब्द प्रत्येकीचे तिच्या बापाच्या धंद्याप्रमाणें येतात ती खुबी कशी कळणार ?

**वाच०**—वाटल्यास त्यांच्या भाषणांत सहज कळवावें किंवा कुचेष्टिता एकटीच त्यांना येतांना पाहून आपल्याशीं त्यांचे गुण वर्णन करते आहे असें दाखवावें.

**मी**—मग कोणत्या पात्राचें नांव काय हें कसें कळणार ?

**वाच०**—नाहीं तरी काय लोकांच्या सांगून लक्षांत राहणार आहे ? नाहीं ह्मणायला असिलतेच्या हातांत एक तलवार व ताराबाईच्या एक षष्टांश यंत्र किंवा वैद्याच्या मुलीच्या हातांत आतंकनिग्रहाची बाटली दिल्यास न कळे.

**मी**:—मग ह्याला करावें कसें ?

**वाच०**—मग मार्मिक श्रोत्यांनासुद्धां मोठ्या कष्टानें समजतील अशा कोड्या दृश्य काव्यांत घालूंच नयेत. बरें पुढें पाचा.

**मी०**-(पद ह्मणतों पृ. ५५) **स्थिति सोडुनियां मरणसम सुदृति झडकरि परत जगतिं.**'

**मार्मिक०**—मग गयांतच कां नाहीं म्हटलें, अशी मेल्यासारखी काय पडली आहेस ?

**मी**—( पुढलें पद ह्मणतों पृ. ५६ ) **तरुणीसही सखे नुचिता जनीं ॥ ध्रु० ॥ ...तो अनुभूति नेणि** '

प्रसाद०—नुचिता नेणि नैकवे नादरी ह्या रूपांनीं काय प्रसाद येतो हो ?

अर्थभट-शेवटली ओळ पुन्हां ह्मणा पाहूं ?

मी-'बालि झोंप योग्य ती । तरुणिं जागृति स्थिति । स्वप्न वयोवर्तिं । तो अनुभूति नेणि ।

अर्थ०—बक्षीस ! बक्षीस ! बक्षीस !! ह्या शेवटल्या ओळींचा संदर्भ व अर्थ सांगेल त्यास ५००० रुपयांचें बक्षीस ! आपण तर हरलों बोवा ! !

५००० रुपयांचें बक्षीस

बाबू०—( वाचतात ) सुनंदाः—मी आपल्या गाण्यांत विलास शब्द आणतें

मी-(गातों) 'त्याजि सखी पर्यंका राजविलासा भोSSSS' थुः थुः थुः

मी पेटींत भोSSSS करायला फोनोग्राफच्या नळ्यासारखें आपलें तोंड उघडलें असतां अर्थभटांनीं तंबाखूची सबंध पुडीची पुडी माझ्या तोंडांत उडवली त्यामुळें पुढचें 'जागि या' मधेंच गळाठलें.

तंबाखूची पुडी तोंडांत उडविली

अर्थ०—काय ! तुमचें तोंड का ? मग माफ करा हं ! मीं जरा वयोवत् असल्यामुळें स्वप्नांत होतों. आणखी मला वाटलें कीं, तुमचें पसरलेलें तोंड ही पोष्टाची पेटी आहे व मी त्यांत पत्र टाकतों आहे.

मार्मि०—ही भोंकाड पसरण्याची चाल कुठली बुवा ? हें पद कुत्र्याला ह्मणावयाचें आहे कां मनुष्याला !

मीः—( तोंड पुशीत ) कां मुंबईस गुजराथी नाटकें पाहिलीं नाहीं वाटतें ? उदाहरणार्थ कामलतेंतलें एक पद म्हणतों ऐका.' वरमाळ माळा झाली। शरमाण बाळा चाली। हौस हयानी पूरण करवा, व्हाSSSSSलि व्हाली ॥'

कां गोड लागतें कीं नाहीं ?

शीघ्र०—गोड कसलें आलें आहे डोंबलाचें ! मीं तर ह्याला कवित्वाचा खून ह्मणतों. पांच सहा मात्रा जरी कमी असल्या तरी यावीं अवग्रह चिन्हें

दडपून अन् घ्यावी तान न काय ! येथें " भोगि उठोनीया " इतकें मावलें असतें, त्याबद्दल भोऽऽऽऽऽऽगि या असें घातलें आहे; त्यांत काय प्रेम आहे ! येथें वर हा भोंगाणा फार वाईट लागतो.

लाल०—विलास शब्दावर कोटिनंबर तीनशें तीन.

मी—पातों पृ. ५७

**जनक जरि त्या निषेध करी। रमण हृदयांत संचारी। गृहाचें द्वार सुबद्ध जरी। खुलें हें हृत्कपाट तरी॥**

अर०—वा कल्पना तर जेहेत्ते फार गोड आहे !

गद्य०—कां हो, संचारी हें कोणत्या क्रियापदाचें रूप आहे !

मी—संचरणें ह्याचें.

गद्य०—मग आचरणें ह्याचें काय होईल !

मी—( झटकन ) आचारी. ( सर्व हसतात. )

मार्मिक०—( पुटपुटतात ). 'रमण हृदयांत आचारी.'

मी—( निराश होऊन पुढें म्हणतो. )

**स्त्रियेच्या मानसीं प्रीति जयी तुंबे तटप्रांतीं। तदा वाहे अकुंठगति। अनायासें तटासि चुरी॥**

प्रसा०—चुरी ? अहाहा ! काय गोड शब्द आहे पण ! आणखी काय तर तटासि चुरी. तटाचा प्रवाहानें अनायासें चुरा होतो कां !

मार्मि०—जसे पाय चुरतात तसेंच कांहीं असेल !

बापू०—आणखी 'तदा वाहे अकुंठगति अनायासें तटासि चुरी' ह्याचा अलंकार सोडून तात्त्विक अर्थ काय हो !

मार्मिक०—विलायती पोरी भेटनाग्रीनला जात असत तसें तर प्रेटनाग्रीन कांहीं नाहीं !

बाबू०—असें असेल कीं, माझ्या बापानें हट्ट धरला तर मी पळून जाईन.

**अर्थ०**—असें नाहीं. तर विचार करण्याची मनाई हाच तट. इथेंच प्रीति तुंबली होती.

**शीघ्र०**—कवींनीं अलंकारांची तर मारे अगदीं गर्दी उडवून दिली आहे. त्या बेट्या विकंठानें सुद्धां इतकी बहार केली नसेल. प्रथम हृदय म्हणजे संचार करण्याजोगी जागा; लागलीच तें हृत्कपाट झालें. नंतर स्त्रीचें मन म्हणजे एक जलाशय आहे! ह्या सर्व तुंबून राहिलेल्या उपमा एकमेकाला गचांड्या मारीत कवींच्या हृत्कपाटाचा तट चुरून बाहेर पडत आहेत. असो पुढें वाचा.

तुंबून राहिलेल्या उपमा

**बाबू०**—'विलासराजांचा नौकर आपली भेट घेण्याकरितां आला आहे.

**वाच०**:—हा नौकर कसा काय ठरला व दाईचे चिरंजीव विलासराज कसे झाले कोणासें ठाऊक !

**मीः**—कां ! एक राजपुत्र एक दासीपुत्र !

**वाच०**—राजपुत्र कशावरून ?

**मीः**—कां बरें ! दाईनें आपल्या भाषणांत सांगितलें नाहीं कां ?

**वाच०**—कोणाला सांगितलें !

**मीः**—साऱ्या प्रेक्षकांना व वाचकांना सांगितलें नाहीं कां !

**वाच०**—पण नाटकांतलीं पात्रें कोणत्या वर्गांत येतात ! प्रेक्षक कीं वाचक ? नाटकांतील जग हें वर्तमान जगापेक्षां निराळें असतें व तें कवीच्या आधारावर असतें. पात्रानें आत्मगत भाषण कितीही कंठशोष करून केलें तरी त्या जगाला कांहीं कळत नाहीं. तेव्हां नाटकगत जगाला विलास हा दाईचा मुलगा आहे, हेंच माहीत असणार.

इतकी ढोबळ चूक कवीच्या हातून होईल हें मला शक्यच वाटेना. डोकें खाजिवतां खाजिवतां मला एक कल्पना सुचली. मी म्हटलें 'पण विलासालाच फक्त नंदिनीबरोबर राजपुत्रासारखें शिक्षण प्राप्त झालें होतें.'

वाच०:—ह्मणून भावाचा नोकर होईल कीं काय ?

मी:—पण विलासाचा स्वभावच तसा दिलदार व वागणूक डालदार असली तर ?

मार्मि०:—आणखी सूरत बूटइष्टाकणीदार असली तर ?

वाच०:—म्हणून का वंचक भावाच्या हातचा मार खाईल ? त्याला अहोजाहो म्हणेल ? त्यांतून वयामध्यें १०।१५ वर्षांचें अंतर असतें तर असो; पण पहिल्या मुलाखतीचे वेळेस विलास १४ वर्षांचा व वंचक त्याच्या भाषणावरून त्याच्या बरोबरीचाच असावा असें दिसतें.

मी:—पण दाईनेंच त्याला अहोजाहो म्हणायला शिकविलें असेल तर ? शिवाय विलासाचें कसें झालें तरी राजबीज !

वाच०:—कसलें घेऊन बसला राजबीज ! मेघनाथानें धुडकावून लावलेंच कीं नाहीं ? आणखी दाईनें कांहीं म्हटलें म्हणून लोकें येथल्यासारखी भावाला नोकर उगीच म्हणतील ! तें कांहीं नाहीं ! काय झालें तें मीं सांगतों. नायकाच्या पात्राला एक कोट्या करणारा नोकर पाहिजे अशी आली कवीच्या मेंदूला नोटीस; पण पगार देण्याला ऐपत नाहीं हेंहीं कळलें. तेव्हां मेंदूतून शक्कल निघाली कीं, भावाला द्या नोकर म्हणून घेपून अन् काय ! दिलें झालें दडपून ! पण त्यामुळें दोष किती उत्पन्न झाला हें नाहीं लक्षांत आलें.

मी:—( घाईनें ) पण लक्ष्मण नव्हता का रामाची सेवा करीत ?

रामचंद्र लक्ष्मणाची कणीक तिंबीत नव्हते

वाच०—पण रामचंद्र त्याची कणीक तिंबीत नव्हते ! व लोकही लक्ष्मणाला हा रामाचा चाकर असें ह्मणत नव्हते.

पुढें मीं पद म्हणतों:—

**कुशलि बहु नांदतो नाथ माझा । विरहिं कीं पोळतो नाथ माझा ॥ ध्रु० ॥ अबलांचें सुकुमार जरी मन । संकटिं शांति क-**

री तरि धारण । पुरुषांचें परि होय विदारण । यासि असे अप-वाद तो ॥ १ ॥

अर०-जेहेत्ते विदारण होणें, फाटणें हे शब्द हृदयाला लागतात, मनाला जेहेत्ते ते लागूं शकत नाहींत.

बापू०:-क्लिष्टतेच्या मानानें पाहिलें तर पद बरें साधलें आहे.

प्रसाद०:-शब्दही बरेच गोड आहेत.

रागो०-आणि चालही सुरेख आहे.

बाबू०:-( वाचतां वाचतां पृ. ६० ) कुचेष्टिता-एवढें खरें कीं तूं ही बगलेंतली मारलीस.

गद्यग०:-ही बायकांच्या तोंडची भाषा बरें कां! कोटि करायला सांपडली म्हणजे झालें, मग सुशोभित विशोभित कांहीं तेथें पाह्यचें नाहीं!

मार्मि०:-आणखी बगलेंतली गोष्ट मारीत असतात! थाप नाहीं!! एवढें खरें कीं, कवींनीं मराठी भाषा. बगलेंत मारून ही रचना बगलेंतली मारली!

गद्यग०-मी खात्रीनें सांगतों कीं, मागील पानावरील विलासाचा पुष्टपणा व हत्ती डेंटाची गोष्ट, हें सगळें ही बगलेची कोटि ऐकविण्याकरितां कवींनीं लोकांच्या बोकांडीस बसविलें आहे. नाहीं तर इतकीं परस्परविरोधी व विशो-भित भाषणें कशाला हवीं होतीं? आतांपर्यंतच्या भाषणांवरून वंचक हा चतुर व हुशार मनुष्य दिसतो; पण आतां त्याला इकडे जंगी जंगी कोट्या करीत अस-तांना सुद्धां अगदीं बावळट करून टाकलें आहे. असो; पुढें वाचा.

बाबू०:-( वाचतात. ) वंचकः-( एकीकडे ) अरे! अरे यांची मला दया येते. याचें दुःख कमी करण्याकरितां तोंड काढली पाहि-जे. ( उघड )......बाईसाहेब माझे धनी दुःख करतात तें आ-पणासाठीं नाहीं, तर शांता नावाची एक सुंदर कुमारिका आहे तिच्यासाठीं!

गद्यग०:—पहा, त्याला दया येते आहे पण उपाय मात्र अडाण्यासारखा योजतो आहे. मला वाटतें कवींनीं ह्याला विदूषक बनविल्यावर जास्त लक्ष मुळींच दिलें नाहीं. जेथें बावळटपणा बरा दिसेल तेथें बावळट केला आहे, चातुर्य हवें असेल तेथें चतुर केला आहे व हें सर्व संभाळून घ्यायला सपाटून खोटें बोलणें त्याच्या अंगीं लावून दिलें आहे झालें. विलायतेंत पूर्वी राजाच्या जवळ फूल्स म्हणून विदूषक असत; पण ते जात्या फार चतुर असून विनोद करण्यासाठीं त्यांना फार मोकळीक होती; पण नंदिनी व विलास, वंचकाबद्दल जसें 'खोटें बोलण्याला तरी शहाणपणा लागतो' (पृ. ६४) व 'याच्या-सारख्या मंद बुद्धीच्या मनुष्याला' (पृ. ६) असे जे शब्द लावताहेत तसे ते त्यांना मूर्ख समजत नसत. ( उदाहरणार्थ Touchstone in 'As you Like It' the Fool in 'King Lear,' the Court Jester in Scotts 'Quentin Durward' &c ). एकंदरींत वंचकाचे पात्रा-संबंधानें कवींनीं फार घोटाळा केला आहे. असो; चालूं द्या पुढें.

बाबू०—( वाचतात ) शांतीचें रूप विचाराल तर फारच सुंदर आहे; केवळ अप्सरा! तिच्यामध्यें एकच काय ती खोड आहे, ती अंगानें जराशी काळी आहे फार काळी नाहीं हो! येवढेंच की, तिला कोळशाची उटी लावावी तेव्हां चंदनाची उटी लाविल्याचा भास होतो... ... तिच्या डोळ्यांतील बुबुळांमध्यें मैत्री इतकी आहे की, ती नेहमी एकमेकांस चिकटून राहतात......हिचे बहुतेक दांत पडले आहेत; पण एक तर ओंठ जाड असल्यामुळें हें व्यंग सहज लपून जातें. व तिच्या समोरचा एकच दांत इतका मोठा आहे की, बाकीच्या एकतीस दातांचा त्यानें वचपा काढला आहे. जसा कांहीं हस्तिदंतच! हें हस्तिदंती काम डोळ्यांनीं दिसावें म्हणून नाकाला बसकें व्हावें लागलें आहे! व तें पाहण्याक-

शांतीचें रूप

रितां हनुवटीही कौतुकानें लांब झाली आहे.... ...तसेंच ती कुबडी आहे पण नम्रपणा बायकांत अवगुण आहे असें कोणी ह्मणावें ? आतां इतकें सौंदर्य अंगीं आल्यावर अनेक देवींनीं त्या अंगावर राहण्याकरितां कोनाडे करून ठेविले तर त्यांत तिच्याकडे काय दोष ?"

**वाच०**—वाहवा ! हें वर्णन फारच उत्कृष्ट साधलें असून यांत विनोदपर भाषणाची कमाल झाली आहे. ह्यावरून वंचकाला चतुर कोण ह्मणणार नाहीं ?

**बाबू०**–( वाचतात ) [ पृ. ६३ ] **वंचकः–तो रुप्याचा डबा बरा दिसतो आहे; आपली मर्जी असेल तर तोही मला चालेल.**

**गद्य०**—वंचकाला आणखी एक गुण द्या; लोभीपणा ! हा केवळ थोडीशी कुचेष्टा दाखविण्याकरितां त्याचे माथीं मारला आहे. मिळून वंचक ह्मणजे अठरा धान्यांचें कडबुळें झालें आहे झालें !

अठरा धान्यांचें कडबुळें

**बाबू०**—[ वाचतात पृ. ६४ ] **नंदिनीः—सुनंदे तुला पुरुषांचा अजून अनुभव नाहीं ह्मणून असें ह्मणतेस.**

**बापू०**—ऐका ! सुनंदेला पुरुषांचा अनुभव नाहीं व हिला मात्र पुरता आला आहे !

**मार्मिक०**—कां ! तिला पुरुषांसारखें शिक्षण मिळालें आहे हें विसरलांत वाटतें.

**बापू०**—ह्मणून पुरुषांचा अनुभव काय आला ?

**मी**—प्रत्यक्ष नाहीं तरी नाटकें कादंबऱ्यांतून तिला पुरुषांच्या स्वभावाचा अनुभव आलाच असेल.

**वाच०**–अनुभवाचा परिणाम काय ? तर वंचकाच्या असंभाव्य परस्परविरोधी व उघड उघड खोट्या बोलण्यावर विश्वास ठेवून लहानपणापासून बरोबर वाढलेल्या मनुष्याचा गैरवि-

पुरुषांचा अनुभव

ध्यास धरणें ! मग हें पुरुषवजा स्त्रीशिक्षण अथवा पुरुष वजा पुरुष शिक्षण चांगलेंच म्हणावयाचें ! बरें ह्यांचा अनुभव तरी काय आहे पाहूं !

मी-( गातों ) ' मधुकरी । रत जरी । मधुकरीं । बहु परी ॥... ती प्रती त्यजोनि भृंग । पंकजांत होइं दंग । जी तदीय अर्ध अंग । तीस नादरी ॥

बापू०–नादरी कशावरून हो ? कोणी आपला पोट भरण्याचा उद्योग करूं नये वाटतें ? दिवसरात्र आपल्या स्त्रीचा आदर करावा ? तसेंच मधुकरीचें 'बहुपरी रत ' त्व कोठें दिसून येतें ? व ती पंकजांत जाऊं शकत नाहीं कीं काय ?

वाच०–मला वाटतें ह्या पदाकरितां नंदिनीच्या ह्या मनोहर अनुभवाला मधेंच ओढलें आहे, दुसरें कांहीं नाहीं.

मी–भुंगा रात्रीं कमळांत अडकून पडतो त्यावर ही कल्पना असेल.

वाच०—वाः ! काय मनोहर कल्पना हो ! विबुधजनचित्तचातकस्वातिवर्षावाप्रमाणें आल्हादकारक आहे.

मार्मिक०—कसली कल्पना घेऊन बसलांत कपाळाची ! पदांतील अनुप्रास तर पहा ! जिकडे तिकडे रीरीरी अन् गगग रंगून राहिले आहेत.

प्रसाद०–' तीस नादरी ' हा प्रयोग अगदीं वाईट लागतो.

मार्मि०–अहो नंदिनीच्या शाळेंत ' तीस नादार ' विद्यार्थी ' मधुकरी ' मागून शिकत होते त्याबद्दल हें पद आहे.

शीघ्र०—तेथें ' तिज न आदरी ' असें घाला.

---

## प्रवेश ४ था.

(सारांश—विलासाचा विरह शोक; त्याच्या समाधानाकरितां वंचक त्याला थाप देतो कीं, नंदिनीची प्रीति शृंगीवर आहे. )

**बाबू०**–[ विलासाचें आत्मगत भाषण वाचतात ]:–**जिचें मंजुल भाषण सुरू होतांच सपाट्याच्या वाऱ्यानें सुद्धां मर्यादेनें वहावयाला लागावें, फोंफावणाऱ्या प्रवाहानें आपली गति विसरून जावें, त्या सुंदरीची भेट झाल्यावर थोडासा विलंब लाविल्याबद्दल बिचाऱ्या वंचकास कां बरें दोष लावावा ?......या वेळीं नंदिनी वंचकापाशीं मला देण्याकरितां एखादी आवडीची भेट देत असेल. ती भेट कोणती असेल बरें ? विरहतापामुळें रात्रीं गळ्यांत घातलेला आणि सकाळीं कोमेजून गेलेला पुष्पहार ?**

**वाच०**—वाहवा! येथपर्यंत वर्णन सुरेख आहे. पण यांत एखादें पद यायला पाहिजे होतें म्हणजे छान शोभलें असतें. जेथें जरूर तेथें पदें घालीत नाहींत व 'किती तरि शोधिलि मैत्रिणि संगें भवानीं परीगे कुठेंच नससी ' असलीं पदें करितात.

जरूर तेथें पद नाहीं

**बाबू**—( वाचतात ) **किंवा स्वतः कशिदा काढलेला रुमाल ?**

**मार्मि०**–तरी म्हटलेंच, आधुनिक स्त्रीशिक्षण अजून कसें नाहीं आलें.

**बापू०**–पुरुषासारख्या शिक्षणांत कशिदा शिकवितात काहो ?

**मार्मि०**–विलासासारख्या बायक्या पुरुषांना शिकवीत असतील.

**बाबू०**–( वाचतात ) **मला तर तो कोमेजून गेलेला हारच अधिक आवडेल कारण त्याची म्लानता तिच्या प्रेमाची निरंतर साक्ष देत जाईल.**

**गद्यग०**—म्हणजे ? तिचें प्रेम म्लान झालें कीं काय ?

**मी**–तसें नाहीं हो; तिच्या प्रेमाच्या विरहतापामुळें म्लान झालेला.

**गद्यग०**–नाहीं तर म्लान झाला नसता वाटतें ?

**वाच०**—गणपतराव या वाक्याचा अर्थ तसा होत नाहीं; तेथें मलताच अर्थ होत आहे.

**बापू०**-( वाचतात ) **पण रसिकास तो जास्त आवडेल; इतकेंच नाही तर त्या हाराप्रमाणेंच त्या सुंदरीच्या वक्षस्थळावर पडून कोमेजून जाण्यांतच तो धन्यता मानील.**

**वाच०**—अहाहा! काय पण रसिक! असे रसिक मिळाल्यावर कवित्वनिवेदनाची भानगडच राहणार नाहीं! असे कोण रसिक आहेत कीं, जे सुंदरीच्या वक्षःस्थळावर पडल्यानंतर कोमेजून जाण्यांत धन्यता मानतील? कवींना ह्मणावयाचें होतें कीं, सुंदरीचें मुळींच दर्शन न होण्यापेक्षां तिच्या वक्षःस्थळावर पडून मग कोमेजून गेलों तरी हरकत नाहीं.

**मी०**—उगीच बारीक सारीक अर्थभेद काय काढीत बसतां!

**वाच०**—बारीक सारीक! अहो, येथें तर अगदींच अर्थाचा अनर्थ झाला आहे. एकदां एक राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष प्रास्ताविक भाषणांत इंग्रजींत म्हणाले कीं, हा मान मिळाल्यानंतर लागलीच जरी मरण आलें तरी हरकत नाहीं ( ह्मणजे जन्माचें सार्थक झालें ). त्याचेंच एकानें असें भाषांतर केलें कीं, हा मान मिळाल्यानंतर लागलीच मला मरण येईल तर बरें होईल! तशापैकींच हें आहे.

**मार्मिक०**—एक पुरुषासारखें शिक्षण मिळालेल्या प्रतिव्रता होत्या. त्यांना आपल्या यजमानांना लिहावयाचें होतें कीं, 'आपण गेल्यापासून मला दाही दिशा शून्य भासूं लागल्या आहेत.' पण एक शब्द बेटा चुकून त्याच्या जागीं त्याच्या समानार्थक दुसरा शब्द पडला व त्यांनीं लिहिलें, 'आपण गेल्यापासून मला दाही दिशा मोकळ्या भासूं लागल्या आहेत.'

दाही दिशा शून्य = दाही दिशा मोकळ्या

**वाच०**—ह्मणून म्हणतों शब्द वापरतांना फार काळजी घेतली पाहिजे.

**शीघ्र०**—पण मीं ह्मणतों कोमेजून जाण्याचें कारणच नाहीं. हार कोमेजला तो त्याच्याच्यानें विरहताप दूर झाला नाहीं ह्मणून कोमेजला, पण हे वल्लभदास रमणीच्या वक्षःस्थलावर पडल्यावर कोमेजण्याचें कारण तरी काय?

वाच०—तसें नाहीं. कोमेजलें तरी पुरवलें; पण घटकाभर तरी तिच्या वक्षःस्थलावर पडण्यास मिळावें. तथापि एकंदरींत शब्दयोजना अगदींच चुकली आहे. असो, चालूंद्या पुढें.

मी०—( पद अगदीं घोळून घोळून म्हणतों. )

**सुंदर रमणी दर्शनमात्रें प्रिय वाटे वैरीही ॥ वाटे आलिंगावा हृदयीं गाढ अशा बाहूंहीं ॥ ध्रु० ॥ देवपणा ये नंदीलागी शंकरसन्मुखतेनें ॥ तृणाहि महाचल मस्तकिं राहे तुंग ह्मणुनि गर्वानें ॥ द्वारस्थाही नृपदासाशीं जन वागति बहु मानें ॥ परिसाच्या संगानें लोहा कांचनताही येई ॥**

मला खात्री होती कीं, ह्या पदावर मंडळी गार होतील ह्मणून. पद संपल्यावर मी त्यांजकडे अशा मुद्रेनें पाहिलें कीं, तशी मुद्रा शुंभसेनाला सुद्धां ' सुखी दुजा कुणीं । न अधिक मजहुनि । ' हें ह्मणतांना साधली नसेल! इतक्यांत बाबूराव हलकेच म्हणतात, " कांहो ' वैरीही ' ह्यांतलें ' ही ' कशासाठीं घातलें आहे?"

मी०—त्याचें कारण साधे लोक, प्रिय वाटतीलच; पण वैरी सुद्धां प्रिय वाटतील.

वाच०—ह्यालाच पुढें दृष्टांत आहे तेव्हां वैरीपणा कायम पाहिजेच!

मी०—होय खरी गोष्ट आहे.

वाच०—आतां यापुढें बिंबप्रतिबिंबभाव कसा साधला आहे पाहूं.

( मग त्यांनीं कागद पेन्सिल घेऊन लिहिलें )

| | |
|---|---|
| रमणी | वैरी |
| शंकर | नंदी |
| महाचल | तृण |
| नृप | द्वारस्थदास |
| परिस | लोह. |

ह्यावरून पहा कसा सगळाच गोंधळ करून दिला आहे तो. बरें पुढें प्रत्येकांत क्रिया काय आहे ती पहा! वैरी प्रिय वाटे; नंदीला देवपणा ये; तृण ग-

र्थानें राहे; दासाशीं बहुमानानें वागती; लोहा कांचनता येई. म्हणजे पुढच्या दृष्टांतांत योग्यताधिक्य आहे. पण आस्ताईतल्या वाक्यांत प्रेमोत्पत्ति आहे. ' रमणीदर्शनमात्रें वैरी आलिंगावा वाटे' याला दृष्टांत 'महाचलमस्तकीं तृण गर्वानें राहे,' वाः काय कल्पना व काय रचना!! तसेंच प्रथम दर्शनमात्रें, व दृष्टांतात सम्मुखतेनें, मस्तकिं राहण्यानें, दास्यानें आणि संगानें! कां दृष्टांत अगदीं तंतोतंत उतरले आहेत कीं नाहीं?

शीघ्रकवी–( गातात ) थोर जनांच्या सहवासें ये अल्प नरा महती ती। लघु कितिही जरि जगतीं असले मान्यचि ते बहु होती ॥ ध्रु० ॥ देवपणा ये नंदीलागीं शंकरसन्मुखतेनें ! क्षुद्र तृणांकुर गिरिवरि डोले तुंग म्हणुनि गर्वानें। कांचनताही लोहा येई परिसाच्या संगानें ॥ नृपभुवनींच्या श्वानाशींही जन वागति बहुमानें ॥ सुंदररमणीदर्शनमात्रें सेवकतागुण जाती ॥ १ ॥

मी—( निराशेनें ) ह्या पदाला सुद्धां तुम्हीं नांवें ठेवायला लागला मग काय म्हणावें!

वाच०—तसें नाहीं; यांची कल्पना चांगली आहे व येथें प्रेमातिशय व्यक्त करण्याच्या प्रसंगीं तर ती फारच शोभते; पण नुसती कल्पना काय उपयोगी! अर्धीकच्ची होती तशी घातली विटाळ्यांत आणि दिली ठोकून! बरोबर बसली न बसली पाहतो कोण? असो; वाचा पुढें.

अर्धी कच्ची घातली विटाळ्यांत व दिली ठोकून

मी—( पद म्हणतों ) धन्य खरा तूं वाटसि आतां मद्रमणीच्या शुभदर्शनें ॥

मार्मि०—हे मद्रमणी कोण? कोणी मद्रपुरस्थ मणी असतील!

मी–( लक्ष न देतां पुढें गातों ) पाहूं दे तुज या नयनांनीं फेडि तयांचें पारणें ॥ ध्रु० ॥ स्फटिकगृहीं जणुं स्थापिली नयनीं मूर्ति

तिची पाहूं दे ॥ पुनीत तीच्या श्वासामोदें तनुतें भेटविं खेद ने ॥ १ ॥

**वाच०**—शाबास! ह्यांतील कल्पना किती मनोहर आहे व ह्या प्रसंगीं किती शोभते! पण नयनाला स्फटिक गृहाची उपमा कांहीं शोभत नाही.

**बापू०**—वंचकाचे डोळे घारे असले तर!

**मार्मि०**—मग खालीं एक नाटक कंपन्यांना सूचना द्यायची होती कीं वंचकानें आपले डोळे पांढरे करावे ह्मणून!

**ललितबुवा०**—हा पहा आणखी एक सधन-विधन-संयोग 'दर्शनें' 'पारणें', 'खेद ने'

**रागोपंत०**—काय हो ह्याची चाल काय दिली आहे.

**मी**—'पुष्पपराग सुगंधित शतिल'

**प्रसादराय**—ही चाल किती गोड आहे! मूळच्या पद्यांतले शब्द पहा व ह्यांतले पहा. 'पुष्पपराग सुगंधित शीतल अति मंद चरे वन वायु हा!' हें किती गोड लागतें. नाहीं तर येथील पहा 'धन्य खरा तूं वाटसि आतां मद्र-मणीच्या शुभदर्शनें.'

**मार्मि०**—भलतेंच! इतके सोपे शब्द घातल्यावर मग संस्कृत शिकल्याचा व आपट्यांच्या डिक्शनरीचा फायदा काय!

**बाबू०**—(पुढें वाचतात पृ. ६६) **विलासः—'त्यांतून याच्या सारख्या मंद बुद्धीच्या मनुष्याला हें सगळें रचून कसें सांगतां येईल.**

**वाच०**—ऐका! वंचकासारखा फस्टक्लांत कोट्या करणारा माणूस मंद बुद्धीचा आणि ही त्याची पारख त्याच्या लहानपणापासून बरोबर वागलेल्या सहोदरानें उर्फ धन्यानें केली! आतां येथें मंद बुद्धि वंचकाची म्हणायची, कीं विलासाची म्हणायची, कीं कवींचीच म्हणायची.!

यानंतर सर्व प्रवेश होईपर्यंत कोणाची कांहीं टीका झाली नाहीं; पण प्रवेश संपल्यावर

**वाच०**—हा व मागील प्रवेश दोन्ही मला निरर्थक दिसतात. ह्यांतील मुख्य भाग ह्मणजे नंदिनीच्या सख्यांच्या व वंचकाच्या कोट्या, वंचकानें दोघांचा केलेला गैरसमज व नंदिनी व विलास यांची विरहावस्था. पैकीं नंदिनीच्या सख्या उगीच ओढून ताणून आणल्या आहेत. त्यांच्यावांचून खुशाल चाललें असतें, इतकेंच नाहीं तर त्यांच्यामुळें थोडीबहुत अडचणच झाली आहे. इतक्यांपाशीं नंदिनीला आपलें हितगुजही मोकळ्या मनानें सांगतां येत नाहीं व त्यांनाही हिचें समाधान करतां येत नाहीं."

**मार्मि०**—त्यांना सुशिक्षण मिळालें नसेल!

**वाच०**—बरें त्या विरहावस्थेचें वर्णन म्हणजे तिचा आत्मगत शोक तरी कांहीं सरस किंवा हृदयद्रावक असायचा होता! येथील विप्रलंभ शृंगार ह्मणजे एक पद 'रुचे निद्रा सुखाची ती' व दोन चार वाक्यें एवढाच. पुढें शोकाची जागा मत्सरानें घेतली. ह्यांत कवींनीं काय साधलें कोणास ठाऊक! या मत्सराचा चांगला किंवा वाईट कांहींच परिणाम संविधानकावर घडत नाहीं कीं कांहीं घोटाळा होत नाहीं. पुढें एकदां गैरसमज दूर करण्याचा मात्र त्रास! मूक नायकांतील सरोजिनीचा विरहशोक पहा 'अवचित गेलें किंकरकरिं' 'होय संसार तरु' व त्यापेक्षां 'उगिच कां कांता गांजितां दासी दीना.' तसेंच वीर तनयांत शालिनीचा 'निशिदिनिं मना' 'मम मानसीं नसेच कांहीं' 'या जगताच्या ठायीं। न सौख्य उरलें पाहीं' इत्यादि. पण वीरतनय व मूकनायक नाटकांत व ह्या नाटकांत हा फरक आहे कीं, तेथील शोकरस शुद्ध व निर्मळ असल्यामुळें त्याचा इष्ट परिणाम श्रोत्यांच्या मनावर घडतो; पण ह्या नाटकांत शोकरस व हास्यरस ह्यांचें अजब मिश्रण केल्यामुळें भाकरीशीं लाडू तोंडीं लावल्याप्रमाणें धड ह्याचीही चव नाहीं आणि धड त्याचीही नाहीं असें झालें. खरें म्हटलें तर हा वंचक उगीच लुडबुड करतो आहे. ह्याचें नाटकांत यत्किंचितही काम नाहीं.

भाकरीशीं लाडू तोंडीं लावणें

नायक व नायिका यांना शोक करायला, हितगुज सांगायला वगैरे एखादी सखी व मित्र लागतात, त्याप्रमाणें कुचेष्टिता व वंचक आहेत म्हणावें तर तेंही जुळत नाहीं. कुचेष्टिता फक्त तर्पण करणें व डब्यांत विंचू घालणें एवढ्यापुरती आणली आहे व वंचक तर विलासाच्या शोकरसांत आपला आचरटपणा व हास्यरस आणून सर्व घाण करून टाकतो. एवंच हे दोन प्रवेश अगदीं असून नसल्यासारखे आहेत. असो, वाचा पुढें.

---

## प्रवेश ५ वा.

( सारांशः—सौदामिनी विद्या आटपून परत येण्यास निघते व मी स्त्री आहे इतकेंच प्रतीपास सांगते. भृंगी प्रतीपाकडे मी युवराज म्हणून येतो व दाई मेली म्हणून आलों असें सांगतो. प्रतीप नांदिनीच्या स्वयंवरास जाण्याची तयारी करतो. )

बाबू०:—[ वाचतात ] हें बालरविबिंब किती सुंदर दिसत आहे ! मध्यान्ह काळीं याजकडून जो प्रताप होणार आहे त्याची थोडीशी छटा याच्या आतांच्या रम्य पण उज्वल किरणांत दिसून येत आहे. हे सूर्यनारायणा

मीः-( पद म्हणतों. ) नमन मम तुज असो प्रखरकर भास्करा ॥ ॥ ध्रु० ॥ तीव्रकरभीत तव । तारका वारि लव । शोभविति बनुनि दंव नवकुसुमविस्तरा ॥ नमन० ॥ ब्रह्मांडभरण तुज । समजुनी कोश निज । जगतिचें आखिल द्विज । स्तुति करिति निर्भरा ॥ नमन ० ॥ भेटवी मधुकरी । मधुकरा सत्वरी । तेंवि ही किंकरी त्वरित जीवेश्वरा ॥ नमन० ॥

हें पद माझ्या नित्य म्हणण्यांतलें असल्याकारणानें मी तें उत्तम रीतीनें म्हटलें व त्यावर मंडळीही खुष झाल्यासारखी दिसली

प्रसा०—वाः पद फारच गोड लागतें.

बाबू०:-कोश म्हणजे काय हो !

अमरा०:-( अमर म्हणतात. ) ' स्यात्कोशश्च हिरण्यंच ', तसेंच ' कोशोऽस्त्री कुड्मले खड्गपिधाने ! ह्यावरूनच कांहीं अर्थ लागत असल्यास पहा.

प्रसाद०:—एक बारीक गोष्ट म्हणजे ह्या पद्यांत सर्व संस्कृत शब्द असून एक ' बनुनि ' शब्द पर्शियन आल्यामुळें जरी तो कर्णकटु लागत नाहीं तरी निराळा दिसतो.

बापू०:—हे जीवेश्वर कोण ?

मार्मि०-ऑंकारेश्वराचे भाऊ !

अर०—जीवेश्वर म्हणजे यम जो आहे तो; ' जीवितेशवसतिं जगाम सा । ' रघु सर्ग ११.

मार्मि०—म्हणून जीवेश्वराला भेटण्यासाठीं ऑंकारेश्वरावर जायचें !

अर्थ०—जीवितेश म्हणजे वल्लभ असा रघुंत तेथेंच दुसरा अर्थ आहे.

ललि०—' निर्भरा स्तुति ' आकारान्तः स्त्रीलिंगी विशेषण विशेष्य भावः ।

बापू०—कायहो दंव आणि प्रखरकर ह्यांचें एका समयीं अस्तित्व कसें काय शोभतें हो.

मी०—वा ! त्याचें मधार्शीच स्पष्टीकरण आहे कीं, मध्यान्ह कालीं होणाऱ्या प्रतापाची ही छटा आहे म्हणून.

शीघ्र०—काय कल्पना मनोहर हो ! कीं, सकाळचे शांत किरणांचें बालरविबिंब पाहिल्याबरोबर त्याच्या मध्यान्हीच्या प्रतापाची आठवण व्हावी ! त्यांतून एखाद्याच्या फसवेगिरीलाही उपमा देण्याची असली तर असो. किंवा एखाद्या प्रसिद्ध पुरुषाच्या अप्रसिद्ध पूर्वभागाविषयीं लिहिणें असलें तरी असो. तसें येथें कांहींच नाहीं. त्यामुळें उत्प्रेक्षा अगदीं अस्थानीं झाली आहे.

वाच०—तथापि स्थळ काळ एक बाजूस ठेवल्यास उत्प्रेक्षा फारच नामी आहे ह्यांत संशय नाहीं.

**ललित०**—अहो तगळें खरें, पण पदाचा अर्थ समजल्या शिवाय सगळी टीका व्यर्थ आहे.

**अर्थ०**—पहिल्या चरणाचा अर्थ असा कीं, तारका हेच कोणी वारिलव ते सूर्यांच्या तीव्र करांना भिऊन पृथ्वीवर आले व दंव हें नांव घेऊन झाडांच्या आश्रयास राहिले.

**बापू०**—मी ह्मणतों कीं, भीतीनें तान्यांचें पाणी होतें असा कवींचा भावार्थ असावा. कारण ही कल्पना जास्त मनोहर आहे.

**अर्थ०**—भावार्थ असेल पण शब्दार्थ तसा नाहीं. कारण 'भित' हें विशेषण 'वारिलव' याकडेच जातें. 'तारका' कडे जात नाहीं. ह्मणून 'तारका' हेच कोणी 'वारिलव' असेंच घेणें चांगलें.

भावार्थ असेल पण शब्दार्थ नाहीं

**बापू०**—माझी अशी सूचना आहे कीं, हें पद चांगलें ठरल्याबद्दल गणपतरावांचें अभिनंदन करावें.

**मी**–( विनयानें ) कशाला ! कशाला !

**मार्मि०**–माझा ह्या सूचनेला टेंकू आहे.

( सूचना टाळ्यांच्या गजरांत पास झाली )

मग मीं प्रतीपाचें पुरुषवेषधारी सौदामिनीला उद्देशून ह्मटलेलें पुढील पद ह्मटलें. ' **दृष्टि असे बाष्पाकुल झाली ॥ ध्रु० ॥ हे नरवर्या कां ही चर्या । नित्य सहास विवर्ण जहाली ॥ १ ॥**

**मार्मि०**—आणखी एक शब्द कमी पडला ! दर्या ह्या शब्द वर्याला अशीच कोठें तरी चरणधुर्याची जागा दिली असती तर अमितवीर्या सूर्याची सपर्या करून त्यानें. आपली दिनचर्या कशी तरी चालविली असती ! बोला मंगळमूर्ती मोर्या !

अमितवीर्या सूर्याची सपर्या

**प्रसादराय०**—काय प्रसाद आहे ह्या शब्दांत ! नरवर्या, चर्या, अहाहा ह्याचें नांव प्रसाद !!!

बापूसा०—कहि राजानें सुदामाला आपल्या पुत्राप्रमाणें वाळगलें होतेंना!

मी—हो मग?

बापू०—मग त्यानें त्याला नरवर्या म्हणणें कसें काय शोभतें.

वाच०—अहो कसलें शोभणें आणि कसचें काय! मुख्य प्रश्न एवढाच कीं, 'तुझी चर्या अशी उतरल्यासारखी कां दिसते!' मग चर्या ह्याशीं अनुप्रासयुक्त शब्द पाहूं जातां नरवर्या दिसला त्याबरोबर दिला दडपून अन् काय! इथें विचारायला येतो कोण!

बाबू०—मीं एक विचारतों. सहास चेहेरा म्हणजे लाल किंवा हिरवा निळा काहीं असतो कीं काय! कारण लागलीच त्यानीं सहास त्यांच्या उलट विवर्ण असें घातलें आहे.

अरविंद०–आपण जेहेत्ते संस्कृत ग्रंथांतून हास्याचा रंग पांढरा अशी जेहेत्ते कल्पना केलेली पाहिली आहे.

वाच०—सहास ह्मणजे आनंदी व विवर्ण ह्मणजे दुःखी. एकंदरींत विवर्ण शब्द बरोबर नाहीं. असो पुढें वाचा.

मी.—('विधिला सुख सहावेंना' हें पद ह्मणतों.)

ललित०—येथें फिरून अस्ताईत काय मजकूर व अंतऱ्यांत काय आहे तें पहा.

वाच०—जाऊंद्या हो, तें पद अगदींच नीरस आहे; टीका करण्याजोगें नाहीं तें. पुढें चालूंद्या.

मी०—(पद ह्मणतों) **पूर्व उपकृतीसी कैसें फेडुं मी.** ॥ ध्रु० ॥ **भाराक्रान्तचि मानस माझें स्वीकारुनि अधिका तें कैसा चिरडुं मीं** ॥ १ ॥

प्रसाद०—ह्या पद्यां आणखी एक महाप्रासादिक शब्द 'चिरडूं;' किती कर्णमनोहर लागतो पण!

मार्मि०—अहो तें 'कैसाचि रडूं मी' असेल! म्हणजे मीं रडूं कसा! रडल्याशिवाय माझें चालत नाहीं.

**ललित**०—हें फिरून गद्या पद्या आलें पहा. गद्यांत तेंच पद्यांत.

**वाच**०—शिवाय पद्यांत कल्पना काय आहे, 'भाराखालीं चिरडण्याची! किती यथायोग्य व समर्पक कल्पना ! !

**मार्मि**०—त्याला बेट्याला थैंक्स माहीत नसतील. त्यांच्या पाटथांच्या पाच्या प्रतीपावर झोंकून दिल्या असल्या म्हणजे तोही त्याखालीं चेंगरून रक्त, मांस, चरबी बाहेर आली असती !

**मी**०—शिव ! शिव ! काय कल्पना !

**मार्मि**०—तुमच्या कवींची कल्पना जास्त व्यक्त केली, इतकेंच.

**बापू**०—पुरें आतां पुढें वाचा.

**बाबू**०—( वाचतात पृ. ७९ ) **प्रतीपः-तूं तर मला विस्मयानें वेडा करून सोडणार.**

**गद्य**०—काय स्वाभाविक उद्गार हो पण. जशीं कांहीं ह्यापूर्वी विस्मयाचीं दहा पांच कारणें झालींच होतीं व हें म्हणजे सर्वांचा कळस. आणखी आनंदानें किंवा दुःखानें वेडा झाल्याची कल्पना माहीत आहे; पण विस्मयानें कधीं कोण वेडें होत असेल तें असो.

विस्मयानें वेडा

**मी**०-( पद म्हणतों पृ.७९ )-**चंद्रकला तूं केतु गमे तो राहुं कसा तत्संगें ।**

**बापू**०-केतूच्या संगतीला राहु येत नाहीं ही शंका येथें येण्याचें कारण?

**अर्थभट**-तसा नाहीं त्याचा अर्थ, ' मीं तत्संगें कसा राहुं. '

**बापू**०-अस्सें ! काय अचानक फसलों हो मी !

**वाच**०-कवींनीं येथें काळजी घेण्यास पाहिजे होती, कारण प्रथम ऐकणाराची तरी येथें खास चूक होण्याचा संभव आहे. बाकी पद चांगलें आहे. असो वाचा पुढें.

**मी**.—( पद म्हणतों. पृ. ८०.) **जी असुखखरदाहिं । अपुल्या सुगुणिं मोहिं । शोकाचिया डोहिं । सोडोनि दुरी होइ ॥ ध्रु० ॥**

ह्यांतील पहिला चरण ऐकल्याबरोबर अर्थभट नाक शिकरायला ह्मणून पलिकडल्या खोलींत निघाले. आह्मीं त्यांना ' ह्याचा अर्थ सांगा ' ह्मणून म्हणतों तों ते पळालेच व पांच मिनिटें परत आले नाहींत. तथापि आमचें त्यांच्यावांचून अडलें होतें. तेव्हां ते आल्याबरोबर आम्हीं, पहिल्या चरणाचा अर्थ विचारला, तेव्हां

अर्थ०—मला अमुकच अर्थ होतो म्हणून खात्री होत नाहीं पण प्रयत्न करतों. एकदां वाटतें, ' असुखखरदाही जी ' एकदां वाटतें ' असुखखरदा ही जी ' पण न्हस्व 'हिं' असें शेवटीं रूप असल्यामुळें 'असुखखरदाहिं सुगुणि ' असें घ्यावेंसें वाटतें. म्हणजे असुखखरदाह हा बहुव्रीहि समास करावा लागतो, ' असुखस्य खरदाहः येन '. हा कितपत व्याकरणशुद्ध आहे कोणास ठाऊक; पण याशिवाय अर्थच बसत नाहीं. म्हणजे सुगुणांनीं असुखाचा. प्रखरदाह होतो.

नशीब त्या भाषेचें

मार्मि.—राम ! राम ! नशीब त्या भाषेचें ! त्या सगुणीचा मात्र प्रखरदाह होतो ! !

मी.—( पुढें वाचतों. ) ' जगतांतुनि · सुगंध । आलोक आनंद मत्सकलसुखकंद । मावळुनि कीं जाई ॥ १ ॥

वाच.—येथें तर विकंठाची हटकून आठवण होते. तो म्हणतो. ' निबिड अशा या भवार्णवांतुनि । पोहुनि जाया शकट वारुणी । किंवा चढण्यातें सुरभुवनीं । नौका आहे वाटे मन्मनिं' । मावळून काय जातें तर ज्यांना प्रकाशकर सूर्याची उपमा देतां येईल असे पदार्थ; ते कोणते तर 'सुगंध' 'आलोक' ! म्हणजे काय कोणास ठाऊक ! (अमराचार्य पुटपुटतात ' आलोको दर्शनद्योतौ ) आणि सर्वांत बहार म्हणजे सुखकंद मावळतो ! ध्या ! उपमांत उपमा ! यापुढें म्हटलें म्हणजे आमच्या कडबुल्या कवींनीं केलेल्या स्रग्धरा वृत्तांतील श्लोकांतला चरणच म्हणणें योग्य आहे.

इकडुन तिकडुन आणलेली बुद्धि दे चक्रपाणी

' ऐशा काव्या कराया, इकडुन् तिकडुन् आणलेली, बुद्धि दे चक्रपाणी.

**सर्वजण**.—हा कोणचा श्लोक आम्हांला एकदां उतरून द्याच.

**वाचस्पति**—[ खालीं लिहिल्याप्रमाणें मात्रांसहित श्लोक लिहितात ]

पिंडीचा देव मोठा । तिथें एक मोठं देऊळ होतं । मोडका नंदि पुढचा ॥
देवूळाच्या ऑवूतिभोंवूती । कांहि बोरि कांहि बाभूळी । त्यामधें दाट चिंचा ॥
देवूळाच्या पाठिमागें । तिथें एक मोठी विहिर होती । तीमधें स्वच्छ पाणी ॥
ऐशा काव्या करायां । इकूडुन् तिकडून् आणलेली । बुद्धि दे चक्रपाणी ॥ १ ॥

इतिश्री समीरगच्चीकुचटीकाचौकडीविरचितायां श्रीमद्भरताचार्यमासादिक नाट्य-कलारूकुठारटीकायां द्वितीय हमा समाप्तः ।



# तिसरा हप्ता.

दुसरे दिवशीं 'जगतिंचा सूत्रधर सविता सगसंध्या हें सुमकुंकुम कीर्ण करोनि' जों 'परते' तों आम्हीं बापूसाहेबांच्या 'सुरम्य सौधावरी' अधिरूढ झालों. सर्वजण स्वस्वस्थानापन्न झाल्यावर वाचस्पति म्हणतात,

'कां गणपतराव तुमच्या मतांत कांहीं फेरबदल झाला कीं नाहीं.'

मीः—कांहीं म्हणण्यासारखा नाहीं. अजून कांहीं चांगलीं चांगलीं पदें पुढें यावयचींच आहेत. व संविधानकाची मजा तर अझून पुढेंच आहे.

वाच०—बरें तर पूर्वी ठरल्याप्रमाणें सर्व एकदां वाचून टाकूं. पण आतां होतां होईल तों बारीकसारीक गोष्टींकडे लक्ष्य न देतां ढोबळ मुद्देच घेऊं.

---

## अंक ३ रा.

### प्रवेश १ ला.

[ सारांशः—सुदाम उर्फ पुरुषवेशधारी सौदामिनी इचें स्वतःचे नगरांत परत आल्यावर आत्मगत भाषण. दाईकडे जाण्याचा विचार करते. ]

मीः—'हे काला अगम्य तव ही करणी

* * * * *

प्रलयची गमाति तव मानदंडसे साचें'

प्रसाद०—ही काय बोवा 'चीची' परवापासून लावली आहे 'दूरचि लोटितातची बलिसमची' हें तुम्हांला आठवत असेलच!

शीघ्र०-आमच्या कडबुळ्या कवीच्या एका पदांत असा चरण आहे.

(चालः—याचा बदन शशि.)

कचीं बचीं ओढितीं कराचीची। बोटेंची।- ढितीं कराचीची॥

प्रसाद०—शाबास! हा खरा प्रसाद.

बापू०—मानदंड म्हणजे कायहो.

अमरा०—आमच्या अमरांत कांहीं हा शब्द नाहीं.

अरविंद०—'स्थितः पृथिव्या इव मानदण्डः' असें कुमार संभवांत जेहेत्ते हिमालयासंबंधानें म्हटलें आहे. मानदण्ड म्हणजे जेहेत्ते मोजण्याची काठी; गज, वार इत्यादि.

बापू०—(आपट्याचा कोश पाहून) येथें सुद्धां Measuring rod असाच अर्थ आहे व हाच उतारा आहे.

बापू०—मग प्रलय हा मोजण्याची काठी कशी होईल?

गद्यगदा०—अहो एका प्रलयापासून दुसऱ्या प्रलयापर्यंत एक वारभर काळ झाला.

बापू०—मग प्रलय हे गजाचीं टोकें होतील.

मार्मिक०—तुम्हीं सगळे अगदींच भृंगी कसे झालांत बोवा? अहो ही अजहल्लक्षणा आहे अजहल्लक्षणा! 'गंगायां घोषः' म्हणजे नदींत झोंपडी असा अर्थ घ्यायचा नाहीं तर नदीच्या काठावर झोंपडी असें समजायचें! तसेंच इथें।

अजहल्लक्षण

हें ऐकून वाचस्पति, बापूसाहेब, शास्त्रीबोवा व बापूराव वाहवा! शाबास!! म्हणून ओरडले. बाकीच्यांना मला वाटतें अजहल्लक्षणेची आमच्या इतकीच माहिती होती पण आपलें अज्ञान दिसूं नये म्हणून तेही वाहवा! म्हणून ओरडले.

मीः—पुढें 'प्रतिरंध्र वमे तव विलाप अगणित कोटि.'

बापू०—प्रतिरंध्र ह्याचा अर्थ काय?

उदात्त, त्या अर्थी अर्थ कळणें अशक्य

**अरविंद०-** ही कांहीं तरी जेहेत्ते उदात्त कल्पना दिसते. त्याअर्थी जेहेत्ते अर्थ कळणें शक्य नाहीं !

**अर्थभटः-**प्रतिबिंब म्हणजे मला वाटतें अतिसूक्ष्म भागांत सुद्धां.

**बाबू०-**मग रंध्रें कोणचीं व इतर भाग कोणचे !

**मीः—**( रागावून ) इतका खोल विचार केला म्हणजे कोणचीच उपमा तुमच्यापुढें टिकणार नाहीं.

**बाबू०-**अहो पण सादृश्याला कांहींतरी आधार पाहिजे ना ! काळाचें शरीर कोणचें व रंध्रें कोणचीं हें नीट कळल्याशिवाय चमत्कृति उत्पन्न व्हावी कशी !

**बापू०—**तें कांहीं नाहीं; अतिसूक्ष्मप्रमाणवत्व हाच साधारण धर्म, हीच चमत्कृति आणि हाच अलंकार ! खरें कीं नाहीं गणपतराव !

**मीः—**अलबत् ! हेंच खरें. ( सारे हंसतात )

**वाच०—**एकंदरींत ह्या पदांतील कल्पना उदात्त आहे पण तिचा परिपोष नीट रीतीनें न झाल्यामुळें ती अगदीं कुरूप झाली आहे. जरा काळजी घेतली असती तर हें पद चांगल्यापैकीं ठरलें असतें.

## प्रवेश २ रा.

( **सारांशः—**विलासाला पैशाची तूट पडल्यामुळें दाईनें सांगितलेली पेटी उकरून काढली तिच्यावरून तो राजपुत्र आहे असें त्याला कळलें. पण त्याला वाटलें कीं, त्याचा बाप मेघनाथ व नंदिनी बहीण होते; असें वाटून कष्टी होतो. इतक्यांत सौदामिनी येऊन उतरण्यास जागा मागते. ती त्याला अशी सल्ला देते कीं, रंगस्थळीं जाऊन नंदिनीची याचना करणाऱ्या लोकांमध्यें उभें रहावें, जर राजानें उभें राहूं दिलें तर संशयाची आपोआप निवृत्ती होईल. )

**बाबू०—**( आत्मगत भाषण 'वंचका इकडे ये पाहूं' येथपर्यंत वाचतात )

**मार्मि०—**ह्या आत्मगत भाषणें नको झाली होतां नाहीं ! ह्या एकापुढें एक दोन, जंगी जंगी !

**बापू०**—अंकाच्या प्रारंभीं आहेत हें बरें आहे !

**मार्मि०**—चुकतां तुम्हीं बापूसाहेब. लोक येतात संगीताकरितां; या सॉलिलोक्यांत तीन पदें घातलीं आहेत. तेव्हां संगीतप्रिय लोकांनीं अंकाच्या सुरवातीच्या आधीं आलेंच पाहिजे व सॉलिलोक्वीचें दिव्य भोगलेंच पाहिजे.

**बापू०**—तरी पण त्या वेळेस अगदीं एकट्यालाच स्टेजच्या तोंडीं दिलें नाहीं पेटीवाला व तबलेवाला यांनाहीं वांटा दिला आहे.

**बाबू०**—काय हो, विलास म्हणतात ' **दाईनें मरतांना कांहीं दिवसांची सामुग्री स्वाधीन करून पुढें तूट पडल्यावर उशागतीची जागा. खणावी असें सांगून ठेवलें होतें** ' त्यावरून विलासराज स्वतः कांहींच मिळवीत नव्हते असें दिसतें. एवढे वीस वर्षांचे घोडे झाले तोंपर्यंत काय करीत होते !

**मीः**—अहो दाईला मिळत असेना !

**बाबू०**—ती मेल्यावर !

नायकाला फॅमिली पेन्शन फंड

**मी**—राजवाड्यांतून कांहीं चालूं असेल !

**मार्मि०**—हो फॅमिली पेन्शन फंडांतून मिळत असतील !

**बाबू०**—पण राजानें हांकूनच दिला होता.

**मार्मिक०**—दोनचार ऑफिसांत अर्ज टाकले होते; अजून उत्तर आलें नव्हतें.

**मीः**—( आठवून ) अहो खरेंच ! दाई मेल्यावर तिनें पुरेशी सामुग्री ठेविलीच होती; असें काय ! व पुढची व्यवस्थाही सांगून ठेवलीच होती.

**बाबू०**—म्हणून नायकानें कांहीं उद्योग करायला नको कीं काय !

**मार्मिक०**—अहाहाहा ! कधीं नाटकें वाचलीं आहेत काय बाबूराव ! नायक कधीं पोटापाण्याचा उद्योग करीत असतो वाटतें !

**बाबू०**—आणखी वंचकाला वारंवार तेच प्रश्न विचारून शोक करण्याचा उद्योग थोडा आहे वाटतें ! त्यांतून फुरसत मिळेल तेव्हां इतर उद्योग.

मार्मिक०--शिवाय सामाजिक प्रश्नांकडे वेळ खर्च झाल्याकारणानें औद्योगिक प्रश्नांचा विचार बाजूस राहिला असेल.

वाच०—असो ह्या औद्योगिक परिषदेची बैठक संपवून आतां पुढें वाचा.

मीः०—(पद वाचतीं पृ. ८४) ......या कलहीं आत्मा मम कां न अजुनि मावळे. !

मार्मिक०—शिवाजी महाराज आले वाटतें.

मीः—(चटकन ) कुठे ! कुठे !

मार्मिक०—मग मावळे कोणीकडे आले.

आत्मा मावळे मी०—अहो आत्मा मावळे.

मार्मिकः—म्हणजे काय !

अर्थ०—म्हणजे जीव जातो.

मार्मिक०–तें कसें बुवा !

मीः—म्हणजे देहावर आत्मा उगवला होता.

मार्मिक०—झाडें उगवतात तसा.

मीः—नाहीं हो ! पृथ्वीवर जसा सूर्य उगवतो तसा.

मार्मिक०--हं हं ! आलें लक्षांत ! म्हणजे देहाच्या एका बाजूला आत्म्याचा उदय व्हावयाचा व दुसऱ्या बाजूस तो मावळायचा. ( सर्व हंसतात. )

मीः—तुमचा आत्मा मात्र पायांत उगवलेला दिसतो आहे; मावळतांना डोक्यांत शिरला तर कोणास ठाऊक !

गद्यगद्य०—शाबास ! कुस्ती मारली कीं जय ! !

मीं अगदीं खुष होऊन पुढें वाचणार तों.

शीघ्र०--ह्या कवींचा आत्मा शब्द फार आवडता दिसतो आहे. उदाहरणार्थ (वी. त. पृ. ९ ) निघोनी जाइना आत्माहि आलोकीं ( गु. मं. पृ. ३१; प्रतीप म्हणतो ) अव्याकुलचित्तें सोडावें मग आत्म्यातें.

बापू०—खरेंच ही आत्म्याला सोडणारी व्यक्ति कोण बुवा?

मीः—( पाहून ) अहो प्रदीप.

बापू०—म्हणजे प्रदीपाचा देह कीं नाहीं?

मी०—( जरा गोंधळून ) हो असाच अर्थ होतो आहे खरा.

बापू०—बरें शूरसेन काय म्हणतात ( वी. त. पृ. ५७ ) 'स्वदेह सोडि मीं आतां' म्हणजे येथें ही व्यक्ति देहापेक्षां भिन्न आहे. तसेंच 'विमलदेहीं शुद्ध आत्मा' तेव्हां आतां देह कोण आत्मा कोण व व्यक्ति कोण याबद्दल कवींचा काय वेदांत आहे.

बाबू०—जाऊंद्याहो! फार शीण दिलात डोक्याला तर तुमचा आत्मा माव-ळून जाईल!! मी आतां पुढें वाचतों.

( पृ. ८५ ) सौदा०—......दाई येईपर्यंत ह्याचें बोलणें ऐकूं

गद्यगदा०—वाः काय सुशिक्षणाचा परिणाम हो! दुसऱ्याचें, निदान वि-लास वंचक ह्यांच्यासारख्या २०।२० वर्षांच्या संभावित गृहस्थांचें संभाषण आडून ऐकण्यांत हलकेपणा आहे ही कल्पना कांहीं तिच्या मनांत आली नाहीं. वसंतसेनेसारख्या गणिकेइतकी सुद्धां नीतितत्त्वांची ओळख सौदामिनीच्या अंगीं कवींनीं ठेवूं नयें हें तिचें दुर्दैव होय.

गणिकेइतकी सुद्धां नीतितत्वांची ओळख नाहीं

वाच०—असो; पुढें.

बापू०—वाचतात ( पृ. ९० शेवटली ओळ ) '**आपण मला पुरो-भार्गी मात्र समजूं नये.**

गद्य०—वाहवा हा मात्र आपण अगदीं अजब शब्द ऐकला बुवा! इंग्रजी Presumptuous ह्याचें भाषांतर 'पुरोभार्गी' ह्या शब्दाबद्दल येत्या ग्रंथकारां-च्या संमेलनांत ह्यांना पदक द्यायला पाहिजे. 'विलायतच्या प्रवासांत' सुद्धां अशा प्रसंगीं असा शब्द सांपडेल कीं नाहीं शंकाच आहे.

बापू०—एन् बी. रानड्यांकडे शिफारस करा कोशाकरितां!

मी—( पद पृ. ९२ )……काननीं वनीं संचरूं

बापूसा०—हे तटवासींचे बांधव आले बरें का! 'रानोरान' बद्दल 'काननीं वनीं'

मार्मि०—तरीच आमचा बचड्या परवां गुप्तमंजूष पाहून आला व दुसऱ्या दिवशीं मला म्हणत होता कीं, 'गवळी दूध घालतांना माप आननीं मुखीं भरीत नाहीं.'

ललित०—आणखी कां हो, 'रमण हृदयांत संचारी' येथल्या प्रमाणें येथें 'संचारूं' नको का!

मी०—( चिडून ) 'कांगारू' कां घोलानात.

कांगारू ( सर्वहसतात )

वाच०—असो पुढें वाचा.

मी—न धरिं मनीं खिन्नता…

शीघ्र०—घ्या कविता देवीला आणखी एक सूट! एक एक बंधनें सुटत चाललीं आहेत ही मोठी आनंदाची गोष्ट आहे.

पुष्कळजण.—ती काय! ती काय सूट!!

शीघ्र०—जरी गद्यांत तुम्हीं एखाद्या माणसाला बहुवचनानें संबोधित असलां तरी कवितेंत अडचण पडल्यास खुशाल एकवचनाचा उपयोग करावा; जसें 'न धरिं मनीं खिन्नता'

मी—अहो त्याला कसें करतां! निरंकुशाः कवयः।

वाच०—खरें आहे. आमच्या दादूभटांची धाकटी मुलगी तोंडाला येतील तशा ओव्या रचून म्हणत असते ती जर मला उद्यां म्हणूं लागली कीं मीं कवयित्री आहे तर माझी छाती नाहीं तिच्या विरुद्ध एक ब्र काढण्याची! कारण 'निरंकुशाः कवयः'

**शीघ्र०**—कांहीं वर्षांपूर्वी मासिक मनोरंजनांत इंग्रजी सॉनेट्सच्या धर्तीवर एक चतुर्दशपदी कविता आली होती. तिला प्रास यमक तर नाहींच पण ओ-ळींत अक्षरें जास्त झाल्यास शब्दांची सुद्धां निर्दयपणें कापाकापी केली होती.

**मार्मि०**—वाः ते तर खरे कवि, 'निरंकुशाः कवयः'चा अर्थ तुम्हांस माहीत नाहीं वाटतें !

अंकुश मानित नाहींत तेच कवि

**शीघ्र०**—तो काय !

**मार्मि०**—जे अंकुश बिलकुल मानीत नाहींत तेच कवी, बाकी सर्व लोक अरसिक; त्यांना काव्याचें खरें मर्मच कळत नाहीं.

**ललित०**—ही व्याख्या घेतली तर प्रस्तुत कवींचा नंबर पहिला लागावयाचा नाहीं, तरी बराच वर लागेल. उदाहरणार्थ व्याकरणाचे नियम घेऊं.

व्याकरणांत निरंकुशत्व

विशेषण विशेष्य भाव ('जगीं विशालीं') व कर्म क्रियापद्भाव (करितिल विदुषी सुनीति नाशा) आपण पाहिलेच आहेत तसाच दुसरा एक विपरीत कर्मक्रियापद्भाव पहा, ह्मणजे जेथें मराठींत द्वितीयेचा प्रत्यय अवश्य आहे तेथें तो गाळणें (गु. मं. १६१) सुखविति जे मनुज वृंद (वी. त. पृ. १२९) यश थकवि सुकवि (गु. मं. पृ. १०९) 'पुढति करी जों या भुज सर्पाला। वेढूं पाहे तनु चंदन हा' (मु. ना. ८५) 'उगिच कां कान्ता गांजितां दासी दीना' इत्यादि. मात्राभंगाचें एकच उदाहरण 'जलरवें नैकवे' हें माझ्या लक्ष्यांत आहे, त्या दिशेनें कवींनीं निरंकुशत्वाचा प्रयत्न केलेला दिसत नाहीं.

**प्रसाद०**—दुसरें भोगीं या स्वक-पटाविपाका। (तसेंच धी. त. ११० तुल्य न तुज कुणी.

**शीघ्र०**—'नच तुल्य तुज कुणी.' पण यतिभंगाचे दृष्टीनें त्यांचा प्रयत्न अचाट आहे; उदाहरणार्थ

## वीरतनय

पृष्ठ

९ सुखाशा का–। हिं मातें ना–। हि या लोकीं ॥

यतिभंगांत निरंकुशत्व निघोनी जा–। इना आत्मा। हि आलोकीं॥ धृ० ॥

प्रिया कान्ता–। नना कान्ता। त्यजोनी कीं ॥

मला गेली। जगत्कान्ता–। रिं एकाकी ॥ १ ॥

४ नयनपरी आ–। नंदाश्रुजलें।

चंद्रमणीसम मुख पा–। हुनियां ते स्त्रवती।

५० खुली तरवार। करा सरदा–। र रिपूतें आ–। जिभक्षाया ॥

५४ पदः—( चाल 'कितिही नीच दशा' )........कर हे

स्फुरती आ–। युध धरण्यातें.

७० चंद्र बिंब, बिंबित का–। सारिं निर्मलीं

७६ निरखोनी विदेही मुनिही मतिही–। न होई.

१०४ ( झंपा ) खड्ग सं–। निध सदा नम्र असतां

( शी. क. खड्ग हें सर्वदा सज्ज असतां )

भीसि कां होसि का–। तर मनीं व्यग्र कां

मम हि वि–। क्रम नसे काय ठावा

( शी. क. विक्रम न थोर मम काय ठावा )

१०८ सोडवितो तुज या पंका–। तुनि तव प्रणयी आतां कां

## मूकनायक.

७ दावी प्रतोद तो दयित अ—। से कुण्यास्थळीं
२१ सिद्धि असे ई—। शेच्छे वरती.
३९ जाळि नरा खदि—। रांगारसमा
४१ श्रोतृवृंद योग्याचि प्रति—। बंध करिति ना कधी
उत्कटतम होति नरां—। चे विचार ते जधीं
५५ मीन निज बघु—। नी नयनसम—। ची न ( ? ) धरुनि
कु—। लीनता
१०५ पंचारति घे—। ऊनि उभ्या या
११४ सकल अंगा। प्रखर अंगा—। राचि ज्वाला। वेष्टि हे
११६ जणुं पिशाचसंघ एक—। वटुनि स्थित वसे
२१७ घनता परि त्याची दा—। वीती अवलोका
१२३ मनोर—। थसदन। विधुसम। वदनच—। कोरी (या)?।
कृतजन
१२८ बहु बिराजशी—। ल शची जशी। ....
लोळते तुझ्या पदां—। बुजावरी सुसंपदा

आपल्या नाटकांतलीं उदाहरणें तर असतलिच लक्षांत.

## गुप्तमंजूष.

४६ निज करुण किरण त्यावरि पस–। रिति न तारका।

५६ मोऽऽऽऽऽगीं या।

६६ वाटे आलिं–। गावा हृदयीं। परिसाच्या सं–। गानें लोहा।

१४६ अहो पाषा–। णराजींनों। पडोनी शी–। र्षेहें फोडा।
कराया शा–। सना भ्याडा।

१४६ शिरीं सौदा–। मिनी पडुनी। पडा तों मा–। थिं कडकडुनी।

इत्यादि.

व सर्वांपेक्षा मजेदार उदाहरण म्हणजे.

( चाल–नंदनवन देवींनें. )

१०२ औषध वदनीं। घालायासि पु–। ढें सर–। सावें मीं।
ओष्ट शिरूं तों बघती माझे हे चुं–। बनकामी।
नाडि परीक्षा–। या जों स्पर्शे

[ मार्मि०–( वैदूसारखा आवाज काढून ) नाडिपरक्षा वैद. ]

वेढूं पाहे तनुचंदन हा नकरि वि–लंबाला.

**मार्मिक**०–मला वाटतें ही नाडि परीक्षा बाजूस पडली ती गेली वैदूकडे, व बाकी स्पर्श परीक्षा म्हणजे थर्ममिटर राहिला म्हणून असे दोन भाग पाडले ‘नाडिपरीक्षा–या जों स्पर्शे.

**मीः**––हीं यतिभंगाचीं उदाहरणें दाखविलींत पण नाटकांत विशेष कडू लागत नाहींत.

वाच०—कांहीं तर निःसंशय कडू लागतात. पण इतर ठिकाणीं गाणारे अलीकडल्या शब्दाच्या शेवटीं यति ओढून आणण्याचा प्रयत्न करितात. यतीचेच ठिकाणीं वाक्य संपत नसल्यास व तान घेण्याच्या भानगडींत न पडल्यास हा प्रयत्न कांहीं अंशीं साधतो पण कवीच्या एका लहानशा चुकीसाठीं नटांचे जन्मभर हाल होतात.

नटांचें हाल; दंड भरिति खर

मार्मिकराव०—मग कवींनीं ह्मटलेंच आहे 'सुजजेर खेचर...दंड भरिति खर'

शीघ्र०—आमच्या ओळखीचा एक कवी आहे त्याचें नांव कडबुळ्याकवी. त्यानें 'सुखाशा कांहीं' ह्या पदाच्या चालीवर एक पद केलें आहे.

कडबुळ्या कवीचें पद

तुला पाहू–। न वेडावू–। न मीं जाइ सुं–।
दरी तूं सौं–। दर्याची खा–। ण आहेस कुं–॥ धृ ॥
दरदनी म–। म वदनीं चुं–। बनें बहु शिं–।
पडुनियां गुं–। ग करि मम तुं–। ग मन जें सुनू ॥ १ ॥

(सर्वांच्या मुरकुंड्या वळतात व पदाला तेरांदा वन्समोअर होतें तेराव्य खेपेस मात्र वाचस्पति म्हणतात' नो मोअर चालूं द्या')

बाबू०:—ही चुंबनें शिंपडायची कल्पना फारच बहारदार आहे बुवा.

शीघ्र०—तुह्मांला अजून अपरिचितच आहे वाटतें बी. त. पृ. १०८ 'त्वन्मुखपाद्मिं चुंबन-सेका करितों सोडुनि आशंका' येथील चुंबनसेका ह्याचा अर्थ काय ?

बाबू०—खरेंच ! ह्या संस्कृत शब्दांमुळें कल्पनाच मनांत येत नाहीं. पुढें पद आलें तें मीं नाजुक रीतीनें ह्मणूं लागलों.

**मीं गरलमुखी फणा**

मार्मि०—फणा ! कोणा राक्षसाचे केसबीस विंचरायाचे आहेत कीं काय ?

गद्यग०—फणा ह्मणजे कायहो गणपतराव ?

मी—फणा म्हणजे, का ! (जरा खांकरून) फणा; फणा म्हणजे असेंच कांहीं आहे. मीं आजपर्यंत 'गरलमुखी पणाच' म्हणत होतों. (विचार करीत सावकाश) गरलमुखी फणा; गरल म्हणजे काय ?

अर्थ०—गरल म्हणजे विष

मी—सरेंच ! फणा ह्मणजे नाहीं का ठाऊक ? अहो फणा म्हणजे साप ! (सर्व हंसतात)

अमराचा०—धिक् ! धिक् ! स्फटायां तु फणा द्वयोः । फणा म्हणजे नागाची फडी.

बापू०—मला वाटतें फणा हा नागीण ह्या अर्थी उपयोगांत आणला असावा कारण पुढें म्हटलें आहे' 'श्वासमात्रें दुरुनि करित परम विकल सकल जंनां'

ललितबुवा—(मध्येंच म्हणतात) सधनविधनसंयोगः फणा—जनां.

अर०—पण फणा याचा असा अर्थ जेहेत्ते होत नाहीं.

बापू०—(पाहून) आपट्यांच्या डिक्शनरींत सुद्धां असा अर्थ नाहीं-

मार्मि०—होत नाहीं म्हणणें फार धाडसाचें आहे.कदाचित् अमर, आपटे सर्व चुकले असतील त्याचा काय नेम.

अमर आपटे चुकले असतील

(पुढें म्हणतों) निर्मियला पतिसि रोग । या तरुणा मरण भोग । कन्येला प्रियवियोग । पातल्या क्षणा ॥ १ ॥

अरविंद०—कायहो ! जेहेत्ते फणेशीं तुलना करण्यास हिचे अंगीं जेहेत्ते जरी असमंत तथापि कांहींतरी जेहेत्ते प्रत्यक्षरणें अनर्थकरित्व असावयास पाहिजे.

वाच०—म्हणजे नागिणीच्या श्वासाच्या जोडीला हिच्यामध्यें काय आहे असेंच ना ! हिचे श्वास म्हणजे काय ? कारण रोग मरणभोग व प्रियवियोग ह्यांचा तिच्याशीं कांहीं संबंध नाहीं. फक्त ह्या संबंधानें तिच्या कानावर आलें इतकेंच.

मी—बरं बरें ! तिच्या जाण्यामुळें तर हें सर्व झालें.

**वाच॰**—अशी तुमची खात्री आहे का ! आणि तसेंही धरलें तर 'पातल्या क्षणा' ह्याचा अर्थ काय !

**मी**—श्वासमात्रे हें उगीच आहे. दुरून सुद्धां माझा इतका परिणाम झाला कीं, आल्याबरोबर त्यांच्या दुःखाचा कडेलोट व्हावा.

**वाचः**—असो पुळुगुळीत कां होईना पण कांहीं तरी समर्थन केलेंत तुम्हीं. पण तुमचें खरें धरल्यावर कवितेंतलें सर्व स्वारस्य निघून गेलें. एकतर सादृश्य व समान धर्म हीं नीरस आहेत व शिवाय रचनाही स्पष्ट नाहीं. एकंदरींत एक कल्पना घेऊन पटली नाहीं तरी गडबडगुंडा करून दिली आहे घालून झालें. असो पुढें वाचा.

---

## प्रवेश ३ रा व ४ था.

[ **सारांशः**—कैलासनाथानें प्रतीमाला ठार मारतांना त्याला सुडाची आठवण दे म्हणून भृंगीला पत्र पाठविलें त्याबद्दल त्याचें स्वगत भाषण. सौदामिनी राजवैद्याला ओळख देऊन बैराग्याच्या वेषानें राजास भेटण्याचें ठरविते. )

**बाबूः**—( वाचतात ) **राजवैद्यः—माझी तेथपर्यंत गति मात्र होईल. अजून मला राजवाडा बंद नाहीं.**

**वापूसा॰ः**—कायहो राजवैद्याला कैलासनाथाचे रुग्णमार्जार माहीत नाहीं तथापि माहीत असण्याचा संभव आहे.

**गद्यगद्गाः**—वाः माहीत असण्याचा संभव असता तर राणीच्या विद्येची थोरवी व कैलासनाथाची धूर्तता कोठें राहिली.

**बापूः**—मग एवढे कैलासनाथ धूर्त होते तर त्यांना एवढें कळूं नये कीं राजवैद्याला संशय आल्यास त्याची तो परीक्षा करूं शकेल ! मग त्यांनें राजवैद्याला राजवाडा बंद कसा केला नाहीं !

गद्यग०:--अंः त्याला माहीत होतें कीं हे राजवैद्य आपले असेच आहेत व नाटक कर्त्यांच्या कामापुरतेच ते जगामध्यें वास करितात.

पुढें पद्य आलें तें मीं म्हणूं लागलों.

**'मुक्तता करीतें पतिची मी त्वरित या घटिकेतें'**

**प्रसादराय**.:—'करीतें' हें रूप अगदीं 'वीषा' सारखें लागतें बुवा!

**शीघ्रकविः**--'पातल्याक्षणा' 'या घटिकेते' असले प्रयोग कवीचे आवडते दिसतात. वीं. त पृ. १३८ पहा.

'पळभरि लव अवगणिनचि मनीं न। तिळहि व्हा न...'

'पर्वा रति न करि' 'पळभर तिळभर मजन गुमान'

गु. मं. पृ. ४९ 'खेद मुळिं न त्यां शिवे'

वीं. त पृ. ७९ 'नुरे संदेह लेशहि तो उरेना अल्पही किंतु'

गु. मं. १२० 'अनीति अनुसरतो जो नर तो शासन त्या क्षणिं भोगी'

**मीः**—मग! ही तर सगळ्याच कवींची तऱ्हा आहे.

**शी० क**.:--आहे कबूल! पण अतिशयोक्ति तरी शोभेल अशी करावी. त्यामुळें कांहीं तरी रसपोष झाला पाहिजे. रति पळ, लव, तिळ एकापुढें एक ठोकलेले अगदींच वाईट दिसतात. तसच मी सांगितलेल्या बहुतेक ठिकाणीं इतक्या अतिशयोक्तीची जरूर नाहीं.

रति पळ लव तिळ लेशक्षण

**वाच०**:--असो मोठासा मुद्दा नाहीं. पुढें.

**मीः**--(म्हणतों) **पसरुनी मुखाला। नाथ निकटिं आला।**

**मार्मि**.—(साश्चर्य) कशाला, हिला गिळायला कीं काय?

**मी.—परतवीन त्या कालातें॥ १॥**

**मार्मि**.--आणखी त्या नाथाला काळ म्हणते आहे! वाहवा!

**अर्थभट.**--तसें नव्हे. ' जो ' अध्याहृत घ्यावयाचें. ' जो ( काल ) नाथ निकटिं–म्हणजे नाथांजवळ-आला त्या कालातें '

**मी.**–( निःश्वास टाकून ) बरें झालें अर्थभट तुम्हीं होता म्हणून! नाहीं तर ह्या मंडळींनीं मेघनाथाला काळभैरव करून सोडला असता.

( पुढें म्हणतों ) **मृत्युहुनि करालें**

**मार्मि.**—अहो ' करालें ' नाहीं ' कारलें ' असेल!

**मी.**—( पाहून ) नाहीं हो ' करालेंच ' आहे.

**मार्मि.**—करालें म्हणजे काय! जसें ' पळणें ' ह्याचें ' पळालें ', तसें ' करणें ' ह्याचें ' करालें ' होतें कीं काय?

**अरविंदशास्त्री.**—जेहेत्ते ' करालें ' ही ' कराल ' ह्याची तृतीया आहे. ' करालें खलें. '

**ललित बुवा.**—विशेषण विशेष्य भाव नं. १४३७.

**लघन.**—एकंदरींत कराल ह्याचा अर्थ काय

**अमरा.**—' करालो दन्तुरे-तुङ्गे । ' दांत असलेलें किंवा उंच

**बाबूराव.**—' कराल दाढा ' म्हणून वाचलेलें आठवतें. पण इथें कोणचा अर्थ घ्यायचा!

**बापू.**--पुढें ' करालें खलें जाल केलें ' असें आहे त्यावरून पहा.

**मार्मि०.**—मग दंताड्याच अर्थ बरा; म्हणजे एखादे कापड घेऊन कुरतडून जाळें करायला बरें.

**प्रसादराय०.**--नाहीं तरी कवींना मोठमोठे संस्कृत शब्द घालायची फार हौस त्यामुळें अर्थबोधही न होतां प्रसादहानि मात्र होते व एखादे वेळेस ' फणा ' सारख्या चुकाही होतात. ह्याचीं मीं पृष्ठवारीनें उदाहरणें काढली आहेत त्यांचा अर्थ साधारण मराठी कवितेच्या वाचकांच्या बापाला सुद्धां समजायचा नाहीं.

## गुप्तमंजूष.

कठिण शब्दांची यादी

( पृष्ट ) १ उडु ३ निर्व्याजा ५ विवशा, महानस ३१ स्वांत ३४ त्रपा, क्षपा ५७ हृत्कपाट ७२ कोश ८० असुखखरदाहिं, आलोक ८२ खर्व ९४ फणा ९७ कराल १०४ आंतर १०५ अकलुष ११८ करण १२८ तिमि १३५ तनूकृत १५० महीभुज १६१ वितरिं

## मूकनायक

१० मनोज्ञ कपोलभंग १७ वारुणी २६ नासा ४० कृती ( = धन्य ) ४४ भारती; अदूरगतिका, कवल ५२ क्षाम ७९ शासन ८० कोरक ९८ खेचर (!) ११५ कीर्ण, विट, जवनिका १२३ शिखींघन १२७ प्रबोधन १२६ दुरितांतरिता १३८ दुर्दिन, महौजा ( = महाहौजा ? ) १४९ वराकी

## वीरतनय.

१ वचनातिग उज्जृंभण, वृतजगदंब, जनितहेरंब, जगदाडंबर, आवर्त ३ तति ५ रसा ६ स्विन्न ८ परिष्वंग, नितांत १३ सिंजित १६ खनित्र २० युष्मदीय ३५ सैंधवरोपण ४२ परासु ५१ कदन सपदिं, जवन ५८ निगड ६० धृतिभाज् ७१ आयसशल्य ७४ कालावधि ( क्रि. वि. ) ७५ महाक्षण, ऱ्हद ८१ सौजन्यार्दा ( मुद्रा ) सांद्रा, सुमंद्रा ८५ वरेण्या १०४ कातर १०८ उद्रेक, विपाक, सेक, आशंका १०९ लास्य, अलक्त, अक्षता १२८ प्लुत १२९ अभिधा, कृपाणपवि १३८ नारक १३९ निरामय

तशींच कांहीं शब्दांचीं रूपें पाहाण्याजोगीं आहेत. गु. मं. ११६ सह कोमलांगी स्थित. गु. मं. ७३ छायेच्या याच खालीं । स्थित होतों पुण्यशाली मू. ना. २१ मजला देखुनि तुष्टति अंतरिं मू. ना. ११६ जणुं पिशाच्चसंध एकवटुनि स्थित वसे गु. मं. १०४ स्फटिकांचे हे पेले । नयन असति रसपूर्ण सृजियले ' ' अन्य न सृजीला विकार ' गु. म. १२७ ' मरणा स्वीकारितो ' गु. मं १३५ ' तनूकृत ' वी. त. ५१ ' सपदि ' हे तर धडधडीत संस्कृत क्रियाविशेपण असून तें उपयोगांत

भाषेला दारू पाजणें

आणणें ह्मणजे मराटी भाषेला दारू पाजून उन्मत्त करणें होय तसेंच ' अपांग दृष्ट्या ' वी. त. ८६ हा शब्द तर संस्कृत विभक्तिसकट आणला आहे.

याशिवाय मीं कित्येक शब्द असे सोडले आहेत कीं, ते मराठी भाषेंत प्रचारांत नाहींत परंतु कवितेच्या वाचकांस ते माहीत असण्याचा संभव आहे.

साध्या शब्दांची दुर्बोध कविता

वरच्या सारखे संस्कृत शब्द आल्यानें कविता दुर्बोध झाल्यास नवल नाहीं पण साधारण शब्द येऊन सुद्धां कविता दुर्बोध झाल्याचीं पुष्कळ उदाहरणें सांपडून देतां येतील. उदाहरणार्थ वी. त. ८६ मज्जन देई कज्जलघनयुत लज्जितलोचनशशिशुभाकिरणीं. पृ. १२७ सुंदरी विलासिनी सेवि कशी मधुरा विधुरा विधु राहु जशी रविसि कुमुदिनी ॥ ध्रु. ॥ जन्म वृथा करि काय कधीं तरि मोहिनी रोहिणी वाहुनि । निजतनु इतरां शशिवांचोनी ॥ १ ॥ ह्यांत एक विधु ह्मणजे चंद्र शब्द कदाचित अडण्या सारखा आहे, पण अर्थ लावायचा प्रयत्न करा व किती लवकर सिद्धीस जातो पहा. मूकनायकांत पृ. ४४ भारती जडासुधीहि मंदधी बने । बिंबसेवनें जनीं वदे सुधी असें मंजु

भाषणें ॥ ध्रु ॥ मधुमधूंनि रसना अधू सुदति कां अदूरगतिका ही होते । आपल्या गुप्तमंजूषांत तर ' अंबर हें प्रभुलोचन ' तो अनुभूति नेणि ' तसेंच ' प्रणय तरंगासवें ' वगैरे लक्षांत असतीलच.

आणखी एक मजेदार उदाहरण म्हणजे बी. त. पृ. १२८ ' वचन नच मधुर अमृताचि गमे । सुखिं मन रमेचि श्रमे विरमेहि शमेहि क्रमे ॥ध्रु०॥ मुदें निरुपमें नयन जल वमे प्लुत घनतमे विषमेंचि तमें परमेश श्रमे॥ १॥ घ्या लावा अर्थ !

परमेशश्रमे

**मार्मि॰**-जेथें ' परमेश श्रमे ' तेथें आमचा पामरांचा काय पाड ?

**वाचस्प.**—ह्या सर्वांचें कारण कवींची पदलालित्यप्रियता ! ' बहुं खटपट करुनि विकट ' ते जे ' शतपट अति बिकट निकट प्रकट ' असे प्रयोग आणूं पाहतात त्यामुळें अतिशय रसहानि होते. नाहींतर कांहीं कांहीं पदांतील कविकल्पना—विशेषतः मूकनायकांतील—इतक्या मनोहर आहेत कीं, त्यांची तारीफच करीत रहावेंसें वाटतें. उदाहरणार्थ.

' अलि धांवुनियां सोत्कंठ कुसुमा येई वनीं ।
मधुपान करूं आकंठ धरुनी हेतु मनीं ॥ ध्रु. ॥
कोमल त्हृदयीं तूं खरा ।
आर्द्रांतर होसी ।
रक्षक परि हा तामसी ।
छळि कंटक जों वैकुंठसुख हें तद्वदनीं॥ १ ॥

हें गुलाबाला उद्देशून स्वतःच्या स्थितीचें दर्शक असें सरोजिनीनें म्हटलेलें आहे. पद्याचा अर्थ व त्यावेळची स्थिति दोन्ही एकदम डोळ्यांपुढें असतील

तरच खरा आल्हाद उत्पन्न होणार आहे. नाहींतर सहृदय मनुष्यास सुद्धां चालीवरच खुष रहावें लागेल.

**मी.**—साधारण वाचकांना नाहीं अर्थ समजला तरी ग्रॅजुएटांना तरी समजेल कीं नाहीं.

**अरविं.**—जेहेत्ते किर्लोसकर मंडळीच्या हस्तपत्रकांत असें कोठें लिहिलेलें असतें कीं, फक्त ग्रॅज्वेटांनींच नाटकाला यावें म्हणून!

फक्त ग्राज्वेटांनीं नाटकाला यावें

**वाच.**—शास्त्री बोवांचें म्हणणें खरें आहे. नाटकाचा प्रयोग स्टेजवर जर करावयाचा आहे. तर पद्यांचा एकंदर भावार्थ तरी लोकांना समजला पाहिजे. नाहींतर परवां कोणीं म्हटल्याप्रमाणें गुजराथी किंवा कानडी पद्यें काय व मराठी काय सारखीं असें व्हायचें. मीं म्हणजे असें म्हणत नाहीं कीं, 'ढोलकी तंबुरीची झडप' पहाणाऱ्यांना सुद्धां पद्यें समजलीं पाहिजेत. मग कवितेंतला पोक्तपणा जाईल. बाकी तसें म्हटलें तर त्यांच्या साठींही 'म्हातारा इतुका' 'कधिं करिती' किंवा 'घेउनि ये पंखा' असें एखादें दुसरें पद काळ वेळ पाहून घातल्यास वाईट नाहीं. पण तें सोडून देऊं. नाटक पहाणारांना थोडें बहुत संस्कृत समजतें आहे असें समजूं. अशा लोकांना मी मघाशीं म्हटलेल्या 'अलि धांवुनियां' याचा अर्थ लवकर कळणें दुरापास्त आहे. त्यांतून, गणपतराव, असेंही कबूल केलें समजा कीं, सर्व प्रेक्षक संस्कृतचे ग्रॅजुएट आहेत तर त्यांपैकीं किती जणांना कोल्हटकरांचीं पद्यें नाटक ऐकतां ऐकतां समजतील.

**मी.**—( जरा गोंधळून ) नट लोक उच्चार स्पष्ट करीत नाहींत.

**वाच.**—असा मुद्दा बदलूं नका. समजा नट ही समजूतदार ग्रॅजुएट आहेत, कारण ग्रॅजुएटांवर तुमची फार मेहेरबानी दिसते.

**बाबू.**—मी खात्रीनें सांगतों अशा प्रेक्षकांपैकीं देखील शेंकडा पंचाण्णव लोकांना कोल्हटकरांचे पद्यांपैकीं निम्मे पद्यें तीन चारदां ऐकल्याशिवाय पूर्णपणें कळायचीं नाहींत.

**बापू.**—निम्मे कां ? मीं म्हणतों तीन चतुर्थांश पदें.

**ललित.**—घ्या ! बाबूराव एम्. ए. आहेत. आणखी बापूसाहेब एल्. एल्. बी आहेत. एकेरी ग्रॅजुएट राहूंच या.

---

### प्रवेश ५ वा.

( **सारांशः**—राणीनें राजाजवळून वचन घेतल्याप्रमाणें पण तर लावायचा पण शृंगी ( हाच प्रतीपाचा पुत्र असें कैलासनाथानें राजास खोटेंच भासविलें होतें ) ह्याच्याशीं तर नंदिनीचा विवाह व्हावा ह्मणून स्वयंवरासंबंधीं राजा व कैलासनाथ ह्यांच्यांत पुढील बेत ठरतो. फक्त राजपुत्रांतांच पण जिंकण्याची परवानगी; दोन प्रश्न नंदिनीनें घालावे व एक अतिशय अनीतीचा प्रश्न कैलासनाथानें घालावा. तीनही प्रश्न कोणीं न सोडविल्यास नंदिनी वाटेल त्यास देण्यांत येईल. कैलासनाथ जातो व वैराग्याचे वेषांत राणी येते; रुग्णमार्जार विष ओळखते; राजास धीर देते व दोन दिवस रुग्णमार्जाराऐवजीं घेण्यास दुसरें औषध देते. व त्याच्या डोळ्यांत असें औषध घालते कीं, त्याला मुळींच दिसेनासें होतें, पण दोन दिवसांनीं दुसरें एक औषध घातलें म्हणजे उत्तम दिसावयास लागेल असें सांगते. )

पुढें सौदामिनीच्या '**पंजर झाला या अस्थींचा**' व '**औषध वदनीं घालायासि पु**' (पृ. १०१, १०२) या पदांच्या कल्पनेवर मंडळी बरीच खुष झाली व '**आन्तर रोगा**' ह्या पदालाही बरेच मार्क पडले, पण '**शमवाया विरहाग्नि झडकरी । निर्झर धांवुनि येई साह्या** ॥' हा चरण मीं ह्मटला तेव्हां,

**बापू.**—वाहवा ! काय कल्पना ! अग्नि विझवायाला निर्झर धांवून येतो !

भाकरी भाजायला झाडें वाढतात

**मार्मि.**—आणखी भाकरी भाजायाला झाडें वाढतात.

**मी**—ह्मणजे काय !

**गद्य०**—ह्मणजे निर्झराच्या पाण्यानें जसा अग्नि विझतो तशा झाडांच्या लाकडांच्या योगानें भाकरी भाजतां येतात. कवींच्या प्रमाणेंच कार्यकारण भावाचें हें आणखी एक उदाहरण आहे.

पुढें '**ईश्वर पंकज जेंवि मतंगज संकट उद्धरितो**' ह्याच्या अर्थी संबंधानें प्रश्न निघाला. त्याचा अर्थभटांनीं 'ईश्वर संकट उद्धरितो जेंवि मतंगज पंकज ( उद्धरितो )' असा सांगितला. त्यामुळें माझ्या मनांत जी ह्यांच्या अर्थी संबंधानें पुसट कल्पना होती ( ती मीं बोलून दाखविली नाहीं. ) कीं, 'पंकज हें मतंगजाचें जेवण आहे' ती दूर झाली.

**बाबू.**—देव संकटांतून मनुष्य नाहीं उद्धरीत तर मनुष्यांतून संकट उद्धरतो !

**मी.**—( पद ह्मणतां ह्मणतां ) '**...ईश परात्पर करुणा तुजवर अविलंबें करितो**

**मार्मि.**—कोणाला लंबें करतो ?

**मी.**—लंबें नाहीं अविलंबें करितों.

**मार्मि.** ह्मणजे काय !

**मी.**–न विलंबः अविलंबः । 'विलंबें' च्या उलट 'अविलंबें.'

**मार्मि**–धन्य आहे.

---

## प्रवेश ६ वा.

( **सारांशः**—मेघनाथाच्या नगरींत आलेला प्रतीप सौदामिनीच्या शोधाविषयीं आत्मगत भाषण करितो. )

ह्या प्रवेश प्रतीपाचें अर्धापान भर आत्मगत भाषण आहे. त्याचे शेवटीं बाबूराव वाचतात. "**असे कांहीं आणीबाणीचे प्रसंग आहेत कीं, विचाराला अवसर नसल्यामुळें मनुष्यानें स्वगत भाषण सुद्धां बंद ठेवावें लागतें**"

**वाच.**--काय स्वाभाविक भाषण आहे हो हें! जणूं काय कोणी व्यवहारांत स्वगत भाषण करीत असतें, आणि भाषण थांबवायची जरूर भासली असतां इतका तत्त्व विचार करून आपलें भाषण थांबवितें! ह्या दोन तीन वाक्यांत मिनिटभर गेलें असेल कीं!

**मार्मि.**--त्यांतली खुबी तुह्मांला माहीत नाहीं राव! आत्मगत भाषणें लांबलचक असायचीं असा कवींचा नियम आहे. पण हेंच इतकें आंखुड कां व प्रवेश इतका लहान कां ह्मणून कोणी रागावेल त्याबद्दल प्रत्यक्ष प्रतीपाच्याच तोंडून ती दिलगिरी प्रदर्शक सबब ह्मणून सांगण्यांत येत आहे.

दिलगिरी प्रदर्शक सबब

---

## प्रवेश ७ वा.

( **सारांशः**--स्वयंवरासाठीं राजे जमले आहेत त्यांचा पांचटपणा. कैलासनाथ स्वयंवराच्या पूर्वोक्त अटी व यशस्वी राजपुत्राची इतरांनीं एक दिवस सेवा केली पाहिजे अशी आणखी एक अट सांगतो. विलास व शृंगी यांस राजकुल सिद्ध करून देण्याच्या अटीवर बसूं देतात. ह्याशिवाय मेघनाथानें दुसरी हरकत न घेतल्यामुळें विलासाचा संशय दूर होतो. सुदामही मोहनगरीचा राजपुत्र ह्मणून येऊन बसतो. तो व विलास पहिले नंदिनचे दोन प्रश्न सोडवितात. कैलासनाथ तिसरा प्रश्न सांगतो कीं स्वतः सेरीज इतर राजसभासदांच्या स्त्रीचे भुजावरील चिन्ह सांगणें. ह्यांत अनीति नसून मंत्र शास्त्राचा प्रभाव पाहण्यासाठीं प्रश्न आहे असें कै० म्हणतो. सुदाम मेघनाथाचे कानांत त्याच्या बायकोचें ( म्हणजे स्वतःचें ) चिन्ह सांगतो. राजा संतापतो पण बभ्रा व वचनभंग होऊं नये म्हणून नंदिनीशीं त्याचा विवाह लावण्याचें कबूल करतो पण दुसरेच दिवशीं त्याचा शिरच्छेद करण्याचें ठरवतो. )

पुढें सातवा प्रवेश म्हणजे दरबार सीन आला. ह्मा तर आमचा फार आवडता. आमच्या मतें कवींनीं आपलें विनोदकलासर्वस्व येथें ओतलेलें म्हणून मीं या प्रवेशाची अगदीं वाट पाहून होतों. तो सुरू झाला.

अंगवंग राजांचें संभाषण होईपर्यंत मंडळी कांहीं बोलली नाहींत परंतु ती खुष झाल्यासारखी दिसली. पुढें कैलासनाथाच्या अटी आल्या; त्यांपैकीं दुसरी अट कीं, " शेवटीं जो राजपुत्र यशस्वी ठरेल त्याची इतर राजपुत्रांनीं एक दिवस सेवा करावी. "

**गद्यग.**--या अटीची काय जरूर हो ! तिच्यापासून स्वयंवराचे किंवा कैलासनाथाचे काय हेतु साध्य होत होते?

**बापू.**--कां पुढें विलासाचा नंदिनीकडून विनाकारण कां होईना पण छळ करवायचा होता ना !

**गद्यग.**—मग त्याला सेवक करून काय फायदा !

**बापू.**--नाहींतर काय मग नंदिनीनें लग्नाच्या रात्रीं त्याच्या घरीं जावें वाटतें. सेवक करून शेजारच्या खोलींत आणल्यामुळें त्याच्याशीं बोलायला सांपडलें.

**गद्यग॰**—पण त्याचा छळ करण्याचा तरी उद्देश काय ! पुनः सलोखा व्हावयाचाच आहेना ! त्या छळामुळें संविधानकावर मुळींच परिणाम झालेला नाहीं. शोकपर्यवसायी नाटक केलें असतें तर तसा झाला असता मग हें सर्व व्यर्थ गेलें नसतें.

**वाच॰**—खरें पाहिलें तर हें नाटक शोकपर्यवसायी व्हावें अशीच त्याची व्यवस्था केलेली दिसते. विलासानें प्रतीपास मारावें व त्या झटापटींत मधें पडणाऱ्या सौदामिनीस वार लागून किंवा मेघनाथाच्या हातूनच रागाच्या सपाट्यांत तिचा अंत व्हावा. तिच्या शोकानें आधींच मृतप्राय झालेल्या राजानेंही तिच्या मागोमाग जावें, नंदिनीविषयीं निराश झालेल्या विलासानें पितृहत्या झालेली पाहून देहत्याग करावा ( नाहींतरीं त्याला तसली हौसच दिसते आहे ! ) व दरबारच्या लोकांनीं कैलासनाथाचें कपट ओळखुन त्याला मारून त्याच्या मुलांना हांकून द्यावें व नंदिनीनें आत्महत्या करावी. हा खरोखरीं नाटकाचा समारोप असेल असें पृ. १४६ पर्यंत विलासाच्या छळाचा प्रवेश वाचून होईपर्यंत किंबहुना वि-

नाटकाची शोकपर्यवसानाची व्यवस्था

लास तरवार उपसेपर्यंत वाटलें. निदान त्या छळाच्या प्रवेशाला असलाच उपसंहार शोभेल.

**मी**–मूळचा बेत तसा असून मागून बदललेला असेल.

**गद्यग०**–मग प्रस्तावनेंत कां सांगितलें नाहीं?

**वाच०**–तसें असेल तर बदल करण्यांत अगदींच अरसिकपणा दाखविला आहे. शिवाय प्रेक्षकांना व टीकाकारांना ही सबब सांगण्यांत अर्थ नाहीं. काम करावयाचें तें अगदीं बेमालूम केलें पाहिजे. वीरतनयांत अशा तऱ्हेचा प्रयत्न केला आहे तो थोडा बरा साधला आहे; बाकी तेथेंसुद्धां शालिनीला खुशाल एकदोन तास बेशुद्ध ठेवली आहे.

**मी**–( उसळून ) मग बेशुद्ध राहिली म्हणून कोणती हरकत आहे? सुभद्रा नाहीं का बेशुद्धींत कोठल्याकोठें प्रवास करते?

**गद्यग**–वा! वा! अहो तो मोहिनी मंत्राचा प्रभाव!! आपोआप आलेली बेशुद्धी नव्हे.

**मी**–बरं रोमियो जुलिअट नाटकांत तर बेशुद्धपणाची कमाल केली आहे.

**गद्यग०**–त्यांची नाहीं पण तुमची कमाल आहे बस्स!! अहो जुलिअट औषध घेऊन गुंगून पडते तसा प्रकार कांहीं शालिनीचा नाहीं.

**मी**–बरं! वसंतसेना. शकार तिला बाहुपाशानें ठार मारतो व पुढल्या अंकांत ती जिवंत होऊन चालूं लागते.

**गद्यग०**–हें आतां जरा ठीक बोललांत. वसंतसेना बेशुद्ध पडते शकार व वीट तिच्याबद्दल बोलतात व मग लगेच भिक्षू येऊन तिला सावध करितो, हा एकंदर प्रकार कांहीं विशेषतः कडू लागत नाहीं. व कल्पना शक्तीची फारशी ओढाताण करावी लागत नाहीं. बाकी वसंतसेना मृतप्राय पडलेली पाहून ती मूर्छित आहे किंवा खरोखरच मेली हें मुळींच न पाहतां 'मेली गेली विलासिनीही' असा चोपदरी गळा काढूत रडणें विटासारख्या समजूतदार माणसाला शोभत नाहीं. असाच किंबहुना याहूनही अधिक विसंगत प्रकार शालिनीच्या मूर्छना-

प्रवेशांत दिसून येतो. शालिनी नुसती घाबरून मूर्छित पडली आहे (शालिनीची वाघाला पाहून मूर्छा व आर्ता शिपायांना पाहून मूर्छा व वीरसिंगाला पत्र घालून घरभेदेपणा करणें वगैरे पराक्रम पुरुषासारखें शिक्षण तिला असून तारीफ करण्यासारखे आहेत ! ! ) हें फत्तेसिंगाला ठाऊक आहे तरी त्याला वाटतें ती मेलीच. पुढें बकुल शालिनीची तशी अवस्था पाहून पोटभर शोक करून घेतो पुढें शूरसेन धडपडत येतात व तेही बराच वेळ घसा मोकळा करून तिच्या बरोबर मरायला तयार होतात व मग कवीनां आठवण होते कीं, शालिनीला अजून सावध करायचीच आहे. हा वेळपर्यंत शालिनीच्या जिव्हाळ्याची सर्व माणसें तिच्या भोवतीं तार स्वरांत शोक करतात. पण ती खरोखर मेली आहे कीं नाहीं हें कोणी पाहील तर शपथ ! ! !

मग आठवण होते कीं शालिनी बेशुद्ध आहे

शीघ्र०–असो त्याला कांहीं उपाय नाहीं. नटां–प्रमाणें नाटकें करावीं लागतात. नाटका-प्रमाणें नट होत नाहींत.

नट नाटक भावः

**ललित०**—नाटकमंडळीआज्ञापित नट–नाटक–भावः ।

**वाच०**—सेवेच्या अटीवरून ह्या गोष्टी निघाल्या. तेव्हां एकंदरींत छळाचा प्रवेश आणण्यासाठीं ही जी अट घातली आहे ही अतिशय विचित्र व अपूर्व असून राजे लोकांनींसुद्धां कुरकुर न करतां ती पतकरली असें दाखविण्यांत कवींनीं मोठेंच धाडस केलें आहे असें म्हणावें लागतें. असो पुढें चालूंद्या.

**बाबू०**–( वाचतात. पृ. १०८ ) **‘ कैलासनाथ-राजाच्या अशा मर्मभेदक भाषणांनीं चवताळून विलास आजच कुळ जाहीर न करो म्हणजे झालें ’**

**गद्यग०**—तें कां ? विलासाच्या पेटीची ऊर्फ ‘ गुप्तमंजूषे ’ ची कैलासनाथाला माहिती नव्हतीच. मग शृंगी प्रतीपाचा मुलगा म्हणून विलासाला धुडकावून लावण्यास काय हरकत होती ? तसेंच होतां होईल तों कोणी प्रश्नांचीं उत्तरें न देणेंच कैलासनाथास श्रेयस्कर होतें. कारण मग शृंगीकडे कमीपणा आला नसता.

विशेषतः तिसऱ्या प्रश्नाची जरूर राहिली नसती. व म्हणूनही विलासाला उठवून लावणेंच इष्ट होतें. कारण विलास प्रश्नांची उत्तरें देईल अशी कैलासनाथाची कल्पना होतीच ( पृ. ११२ पहिली ओळ )

**बापू०**—अहो कुठें इतक्या भानगडी करीत बसले आहेत कवी ! नाहींतरी तिसऱ्या प्रश्नावर मांडायला विलास पाहिजेच होता. तिसरा प्रश्नही पुढल्या मायलेकींच्या अजब शृंगाराच्या प्रवेशाला वगैरे जरूर होता. विलासाचाही संशय दूर होणें इष्ट होतें. एकंदरींत कसा तरी विलासाला बसवून घेतला आहे झालें.

कसातरी विलासाला बसवून घेतला आहे

पुढें बाबूराव पहिला प्रश्न वाचतात '**वसतों कविरसनाग्रीं अनादि व्युत्क्रान्त सार्थ वाहकरीं । मध्यरहित परहित मज जाणुनि पशुपति निजांगिं सतत धरी** '

**अर्थ०**—ह्यांतील 'व्युत्क्रान्त' ( म्हणजे अक्षरें उलटून ) व 'सार्थवाह' हे शब्द किती राजांनां समजले असतील कोणास ठाऊक ! कारण सगळे राजे घमंडानंदन आहेत असा कवींचाच समज दिसतो.

**अरविं०**—खरेंच कायहो जेहेत्ते त्या सगळ्या राजांना मराठी येत होतें काहो?

**गद्यग०**—नाहीं तर काय ! अंगराज, वंगराज, मगधराज तर तुमच्या देखत जन्म भाषेप्रमाणें मराठी बोलत आहेत. त्या पैकीं अंगराज व वंगराज बंगालचे राजे हे तर परममित्र आहेत ! तसेंच मरुदेशचे ऊर्फ मारवाडचे व कृष्णद्वीपचे राजे हेहि मराठी जाणणारे असतीलच !

तुमच्या देखत मराठी बोलतात

**रागोपंत**—हें कृष्णद्वीप कोठें आहे हो ?

**मार्मि०**—अहो त्या वेळेस काळ्या समुद्रांत हें बेट होतें !

**शीघ्र०**—किंवा श्री कृष्णाचें द्वीप म्हणजे द्वारका असेल.

**ललित०**—मीं अरेबियन नाइट्स मध्यें कृष्णद्वीपच्या राजाचा वृत्तान्त वाचला आहे

**मी**—गदाधरपंत तुमच्या ह्मणण्यासंबंधानें मला असें वाटतें कीं, ह्या सर्व राजांच्या जवळ त्यांचे दुभाषे असतील

**बाबूराव**–ऊर्फ ओरिएन्टल ट्रान्स्लेटर ! आणि त्यांच्या भाषांतराच्या काप्या कवींकडे येऊन त्यांनीं भाषणें छापलीं.

**बापू॰**—अंग वंग ही नांवेंच अशीं आहेत कीं त्यांच्या राजांनीं मित्र झालेंच पाहिजेत.

**प्रसादराय**—अंग वंग ह्यांच्या जोडीला कार्लिंग असता तर बरें झालें असतें.

वंगभंग भावः

**ललित॰**–ह्याला वंगभंग भाव ह्मणतात.

**वाच॰**-आणि सगळ्यांत गम्मत ही कीं इतक्या लांबलांबचे व नानाविध भाषा बोलणारे राजे जमवून केलेल्या या थाटाच्या स्वयंवरांत पण काय लावला होता म्हणाल तर कालिदासाच्या गोष्टींतलीं 'अद्याक्षरारहित तें' असलीं कोडीं ओळखणें! आणखी त्यापेकीं उपमेचें कोडें मराठी जाणणाऱ्यांशिवाय कोणाला उलगडतां यावयाचें नाहीं. कारण माप शब्द दुसऱ्या कोणत्याही भाषेंत नाहीं.

पण काय लावला होता तर कोडीं!

**मीः**—पण प्रश्न काढणें नंदिनीच्या हातीं होतें व तिला मराठी नवराच पाहिजे असला तर!

**वाच॰**—पण तिला पुरुषासारखें शिक्षण मिळालें आहे व तें देणें कवींच्याच मर्जीवर आहे. त्याअर्थीं नंदिनीला इतकी अक्कल असायला नको होती का कीं, इतक्या ठिकाणचे राजे आले आहेत तेव्हां आपल्या शिक्षणाची अब्रू राखण्याकरितां तरी शौर्य व चातुर्य ओळखण्यासारखा पण लावायला पाहिजे!

**गयग॰**—काय तुम्हीं वाचस्पति, उगीच शिक्षणाच्या नांवावर भुरळला आहांत झालें. अहो तिला विलासच नवरा पाहिजे होता व विलास तर बायक्या नायक, मग शौर्याचा प्रश्न काढून कसें चालेल! ज्या गोष्टींत विलासाची बुद्धि चालते असें तिला ठाऊक होतें व जे प्रश्न त्याला माहीत असण्याचा संभव, तेंच

प्रश्न तिनें काढले. खरोखर तिचें शिक्षण कितपत होतें हें तिच्या 'पुरुषांच्या अनुभवा' वरून दिसतेंच आहे.

**बाबू.**—( वाचतात. ) **( मगधराज उठावयास लागतो तों त्याचें आसन त्याच्याबरोबच उचललें जातें. )**

**गद्यग.**—कायहो! पूर्वी दरबारांत राजे लोकांनां बसावयाला इतकीं लहान आसनें देत असत! कीं, आतांप्रमाणें त्यावेळीं खुर्च्याच होत्या?

**अरविं.**—जेहेत्ते रघूच्या सहाव्या सर्गात असें वर्णन आहे.

स तत्र मञ्चेषु मनोज्ञवेषान् सिंहासनस्थान् उपचारवत्सु ॥

वैमानिकानां मरुतामपश्यदाकृष्टलीलान्नरलोकपालान् ॥

म्हणजे जेहेत्ते मञ्च होते व त्यावर जेहेत्ते सिंहासनें होती व त्या सर्वांची शोभा जेहेत्ते विमानांप्रमाणें दिसे.

**मार्मि.**—तुमच्या कालिदासाला कांहीं रघूचा स्टेजवर प्रयोग करून दाखवायचा नव्हता. येथें चार फूट बाय दोन फूट स्टेजवर सगळा दरबार भरावयाचा, त्यांत वंचकासारखे प्रेक्षक व नंदिनीसारख्यांची पडद्यांतली सोय आणखी अलीकडे पेटीवाला तबलेवाला अर्धा स्टेज अडवतात त्यांची सोय येथें मञ्च आणखी सिंहासनें आणतां कोठलीं. एवीं तेवीं खुर्च्या ह्या यायच्याच; मग त्यांतल्या त्यांत एक चूप करायला सांपडली तर घ्या करून! बिचारे जुने पुराणे राजे हल्लींच्या टारपेडोवाल्या राजांच्या आकुंचित आसनावर बसून कवि सांगतील त्याप्रमाणें त्यांना वागलेंच पाहिजे.

पेटीवाला तबलेवाला अर्धा स्टेज अडवतात

**बाबू.**—( वाचतात. ) **कैः—( तुमचें ) उत्तर म्हणजे तुमच्या आंशेची उत्तर क्रियाच!**

**मार्मि.**—"जीते रहो पट्ठे! वाहवारे वाहवा!! काय कोटि केली आहे!!! ह्या विद्वद्रत्नांनीं केलेल्या ह्या व मागच्या भुसाच्या कोटीला शेंकडा शंभर मार्क दिले पाहिजेत. कोटि पण कोटि, कोटि पण कोटि!"

हें शेवटलें वाक्य ह्मणत मार्मिकराव डुलत बसले. आतां काय येतें आहे कोणास ठाऊक असा विचार करीत मी गप्प बसलों.

**वाच०**—कांहो पंडत आपण फार खूष झालांतसे दिसतां.

**मार्मिक०**—खूष! मीं तर बेहोष झालों आहें! काय पण स्वाभाविक व सणसणीत कोटी आहे! शिवाय काय अर्थगांभीर्य! नेहेमीं उत्तरक्रिया पदार्थ नष्ट झाल्याशिवाय होत नाहीं पण त्यांत असाधारणत्व नाहीं. म्हणून येथें, जरी मगधराजांनीं उत्तर दिल्यावर आशा नष्ट होते तरी, आधीं उत्तरक्रिया करून त्या उत्तरक्रियेनंतर आशा नष्ट केली आहे. कां कसें काय आहे अर्थगांभीर्य?

पांच चार जण 'अजब' म्हणतात व बाकीचे 'जितं' म्हणून घोष करितात.

**बाबू०**-( वाचतात पृ. ११२ ) **अंगराजः-'मोहनगरी ना! अगदीं आमच्या माथ्यार्शींच!**

**बापू०**—येथें कवीनीं आमच्या जुन्या राजांची नाहक अब्रू घेतली आहे. हे अंगराज कांहीं मजेदार कोट्या करतात व बराचसा आचरटपणाही करतात हें सर्व सहन केलें पण कोणाही राजास त्याच्या आसपासच्या राज्यांची माहिती नसेल ह्मणणें अगदीं धाडसाचें आहे.

**गद्य०**—आणखी तो इतक्या लांब स्वयंवराला आला आहे हेंही ध्यानांत ठेवलें पाहिजे.

**बाबू०**—वाः! सुदामाचें राजपुत्रत्त्व येनकेनप्रकारेण सिद्ध झालें पाहिजेना!

**वाच०**—एकंदरींत काय कीं, कवि विनोदरूपी सोटा हातांत घेऊन सांपडेल तेथें ठोकतात! स्थलास्थल पात्रापात्र कांहीं पहात नाहींत.

**बाबू०**—( वाचतात पृ. ११५ ) **अंगराजः—जर का फजिती झाली तर मीं नाक खाजविण्याकरितां उभा राहिलोंच समजा; अशी उडवीन कीं बोलायची सोय नाहीं.**

**गद्य०**—ह्याचा अर्थ काय हो! नाक कशाकरितां खाजवितात!

**मी०**—कां पुढें लिहिलें आहे त्याप्रमाणें, उडवण्याकरितां ?

**गद्य०**—पण नाक खाजवून कशी उडते तें तर सांगाल ? नाक खाजवतात फक्त माकडापुढें आणि त्यामुळें तें चिडतें. तेव्हां येथें इतर सर्व लोकांना माकडें ह्मणून त्यांना चिडवीन असा अर्थ आहे काय ?

**बापू०**—आणि चिडवणें म्हणजे उडवणें कीं काय ?

**वाच०**—हें अंगवंगांचें भाषण म्हणजे निव्वळ आचरटपणा करायचा ह्मणून केला आहे. त्याची जरूरही नाहीं व तो शोभतही नाहीं दरबार कंटाळवाणा होण्याची कवींना इतकी भीति वाटत होती तर वंचकालाच दोनचार आत्मगत विनोदी भाषणें दिलीं असतीं म्हणजे झाले असतें. पण हें काय ?

ह्या पेक्षां गुलाब छकडीचा फार्स बरा

**मार्मिक०**—ह्यापेक्षां गुलाब छकडीचा फार्स बरा ?

**मी०**—(पद म्हणतों पृ. ११६ ) **सुखशैलशृंगी। सह कोमलांगी। स्थित तों नगीं। क्षिति कंप पावे॥**

**बापू०**—कल्पना छान आहे बोवा.

**बाबू०**—शैल आणि नग दोन दोन शब्द कशाला ? पर्वतावर आणि डोंगराच्या शिखरावर.

**मार्मिक०**—पहिलें शैल समासांत गुरफटल्यामुळें बेटें लक्षांतूनच गेलें हो ! दुसरें कांहीं नाहीं.

**बाबू०**—( वाचतात पृ. ११७ ) ' **अंगराज-अः त्यांत काय आहे ! माझ्या एका मित्राच्या स्त्रीचें तर चिन्ह मी तेव्हांच सांगून टाकीन ' वंगराज—' आतां पांचटपणा कराल तर हें तोंडावरचें जंगल उपटून हातांत देईन.'**

**बापू०**—वंगराजांनीं म्हटल्याप्रमाणें हा निरर्थक ' पांचटपणा ' ऊर्फ फाजीलपणा अंगराजापर्यंतच थांबतो कीं, तो नाटक पाहण्यास आलेल्या संभावित लोकांना काहीं जरूर पडल्याशिवाय दाखविण्यानें त्याची व्याप्ति कवींपर्यंतही जाते हा एक मोठा प्रश्न आहे.

येथें मात्र माझा राग आवरेना. मीं संतापानें ह्मणालों ' आतां तुह्मीं अगदीं शिव्यागाळीवर आलांत '

वाच०—थांबा रागाऊं नका. जरा पुढें चला ह्या संबंधानें आपण जास्त बोलूं.

बाबू०—( वाचतात ) विलास ' जर उत्तर देणारानें खोटेंच चिन्ह सांगितलें तर ? '

कैला०—' त्याला तोड एवढीच कीं, ज्याच्या रमणीचें खोटें चिन्ह त्यानें सांगितलें असेल, त्यानें धात्रीच्या साह्यानें तें खोटें ठरवावें ह्मणजे त्यानें स्वतः प्रश्न न सोडवितां ही त्याला राजकन्या देण्यांत येईल.'

विलास–' हरहर ! या नीचाचें जाळें फारच सूक्ष्म विणलें आहे.

गद्य०—वाहवा ! विलास राजांचें सुद्धां या उत्तरानें समाधान झालें वाटतें ? धन्य आहे त्यांचीन् काय ?

मी—कांहो, कां होऊं नये समाधान ?

गद्य०—कां ? एक तर असा प्रश्न उभा राहतो कीं, धात्र्या नेहमीं खरेंच बोलणार असें गृहीत धरलें पाहिजे. नाहीं तर खरोखरी चिन्ह असलें तर राणीची अब्रू वांचविण्याकरितां, धात्री तसें चिन्ह आहे म्हणून कधीं कबूल करणार नाहीं. दुसरें ह्या उत्तरानें लबाडी करण्यास जास्त मार्ग झाला. समजा अंगराजासारखें एखादे हलकट आपले जे मित्र वंगराज त्यांस ह्मणाले कीं, ' अहो एर्वी तेर्वीं राजकन्या तुम्हांस मिळत नाहींच. मग मला मिळवून या व त्याबद्दल मीं अमुक अमुक तुम्हांस देईन. तुह्मीं उठून सांगा कीं, त्या अंगराजाच्या रमणीच्या दंडावर पांच तिळांचा झुपका आहे. मीं धात्रींच्या साह्यानें हें खोटें ठरवीन ह्मणजे नंदिनी मला दिलीच पाहिजे कीं नाहीं. '

**वाच०**-आणि ह्यामुळें ज्या ठिकाणीं वाटेल त्यानें वाटेल त्याची बेअब्रू करावी व त्याला धात्रीस बोलावून आपली अब्रू साफ करून घेण्यास लावावें अशा प्रसंगीं सर्व राजे लोक मुकाट्यानें बसले कसे हाच मला अचंबा वाटतो.

**गद्यग०**—आणि अशा स्वाभिमानशून्य भूमिका आणून कवि समाजाची नीति सुधारणार! धन्य आहे कवींची आणि त्यांच्या बरोबर प्रेक्षकांची!!

अशा भूमिका आणून नीति सुधारणार!

**मी**—अहो तुह्मी इतके रागावलांत पण कैलासनाथानें पुढें सांगितलें नाहीं का, कीं मंत्र विद्येचा प्रभाव जाणण्यासाठीं हा प्रश्न घातला म्हणून!

**वाच०**—मग मंत्रविद्येचा प्रभाव जाणण्यासारखा दुसरा प्रश्न कांढतां येत नव्हता वाटतें. आद्य शंकराचार्यांची गोष्ट आहे कीं त्यांची परीक्षा पाहण्यासाठीं एका घागरींत साप घालून त्यांना विचारलें कीं त्यांत काय आहे? तसें कांहीं करतां आलें असतें तर सर्व राजांनाही स्वस्थ चित्तानें मजा पाहत आली असती.

**मी**—पण राजाच्या मनांत संशय उत्पन्न करण्याजोगा अनीतीचा प्रश्न कोणता काढायचा?

**वाच०**—मग असा गचाळपणा करण्यापेक्षां कथाभागच बदलायचा होता. नाहीं तरी त्या दरबार सीनमुळें कोणतीही सुधारणा साध्य होत नाहीं; उलट स्त्रीची विवाहाच्या कामीं स्वतंत्रता मात्र नष्ट होते. आजपर्यंत महत्त्वाचे असे स्वयंवर ह्मणजे लक्ष्मी, इंदुमती, सीता, द्रौपदी, दमयन्ती, व संयोगिता ह्यांचे स्वयंवर होत. पैकीं सीता व द्रौपदी ह्यांच्यांचें स्वयंवरांनां फक्त पण लावले होते. पण ते पण लावतांनां त्यांनीं आपलें मूर्खपण प्रदर्शित केलें नव्हतें. त्या दोन्हींमध्यें शौर्य कौशल्य व दैविक सहाय्य ह्या सर्वांची परीक्षा ठेविली होती. येथें शौर्य ह्मणजे एक दिवस सेवा करण्याचें कबूल करणें, कौशल्य म्हणजे कोडीं सोडविणें व दैवी सहाय्य ह्मणजे दुसऱ्याची अब्रू घेतां येणें!

बाबू०—मेघनाथाच्या मनांत संशय उत्पन्न करण्यासंबंधानें वंगराजाप्रमाणें एकदृष्टी होऊन इतर दृष्टी अंध झाल्या व त्यामुळें कवींच्या हातून असा प्रमाद घडला. असो आतां मीं पुढें वाचतों. **अंगराज ०–' कां वंगराज, झाली कीं, नाहीं पची.'**

बापू०—शिव शिव ! काय भाषा ! हें का नाटक आहे का तमाशा आहे.

मी—कां बरें मित्रामित्रांच्या भाषणांत हा शब्द येत नाहीं काय ?

बापू०—चारचौघे संभावित लोक बसले असतांनां ? आपले लोक अजून इतके हलकट झाले नाहींत ! चार संभावित स्त्रीपुरुष प्रेक्षकांपुढें नाटक करावयाचें आहे हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. वर्तमानपत्रांत किंवा पुस्तकांत हा शब्द कधीं वाचला आहेत ? आतां मीं बोललों म्हणजे वाईट दिसेल पण तुम्ही प्रश्नच काढला म्हणून बोलतों. सुशिक्षितांत सुद्धां चार मित्रमंडळी मोकळेपणीं जमली असतां वाईट फाजीलपणाचे शब्द काय थोडे बोलतात ? व संभावित मनुष्यही एखाद्या कुळंबी माळी किंवा हलकट मनुष्यावर रागावला असतां त्याच्या तोंडांतून कसल्या शिव्या निघत असतात ? दोनचार कुळंबी बोलत असले तर शिव्यांशिवाय बोलतच नाहींत; म्हणून नाटकांत अशा प्रकारची भाषा अगदीं हलक्या लोकांच्या संभाषणांत सुद्धां कोणी आणलेली शोभेल काय ? कादंबऱ्यांत सुद्धां अगदीं रसभंगच होतो असें वाटल्यास फुल्या घालतात; पण तेंही अनिष्टच आहे.

वाच०—प्रस्तुत कवि कोट्या करण्याच्या व लोकांना हंसवण्याच्या भरांत नाटककाराची मर्यादा व इभ्रत ( Dignity ) विसरतात. व संतापाच्या भरांत मनुष्य जसा शिवीगाळीवर येतो. त्याच प्रमाणें हे कविश्रेष्ठ वरपुरुष वासुदेव कोट्या करतां करतां शेणसडा उधळूं लागतात. उदाहरणार्थ, पूर्वीची सुइणीची तुकडी तुमच्या लक्ष्यांत असेलच अशीच पुढें एक कोटि आहे पृ. १२५ वर मेघनाथ

नाटककाराची इभ्रत विसरतात

म्हणतो 'तुला ही बित्तं बातमी कळली ती योगाच्या नाहीं संयोगाच्या बळावर, मंत्राच्यां नाहीं तर तंत्राच्या प्रभावानें, योगासनावर नाहीं तर.... '

**बापू॰**—शिवशिव ऐकवतसुद्धां नाहीं.।

**गद्यग॰**-हेंच वाक्य सौदामिनीनें वरचे शब्द ऐकुन उच्चारलें आहे. काय ह्या कोट्या! रागाच्या सपाट्यांत हा मनुष्य अशा रीतीनें शब्दांवर कोट्या करीत बसला आहे.

**गद्यग॰**-तसेंच मेघनाथाचें स्वगत भाषण पहा 'मीं तिच्या वाटेकडे डोळे लावून होतो त्यावेळीं ती विलास करीत सद्गुणाकडे डोळे लावून (?) असेल............अश्रुपात करितां करितां माझे नेत्र अंध होते तेव्हां ह्या राजपुत्राबद्दल ती प्रेमांध होती. शोकामुळें मीं मूक वृत्तींत बसत होतों तेव्हां तीही चुंबनें घेऊन रात्रींच्यारात्री मूक वृत्तींत (?) घालवीत असेल...........भूलोकीं स्वर्गसुख भोगलें आतां प्रत्यक्ष स्वर्गींच जाऊन स्वर्गसुख भोगा.' काय ही राजाची अगाध विद्वत्ता! कीं संतापाचे आवेशांत सुद्धां त्याला मोठमोठ्या मार्मिक कोट्या सुचतात! ह्या अशा शब्दांनीं व आचरट पणाच्या कोट्यांनीं दरबारचा गंभीरपणा अगदीं नष्ट झालाआहे. हा दरबार पाहिल्यावर सौदामिनीनें म्हटल्याप्रमाणें 'हा काय कुटाळ लोकांचा चव्हाटा आहे किंवा नापिक लोकांचा (न्हाव्याचा) अड्डा आहे ' असें वाटावयास लागतें.

हा काय न्हाव्याचा अड्डा आहे

**गद्यग॰**-त्यांतून कोळी माळी व गिरणबाबू लोकांसाठीं नाटकें रचणाऱ्या व

उच्च शिक्षणाचा संस्कार न झालेल्या मनुष्यानें हें लिहिलें असतें तर तेथें 'म्हणुनि इजाशीं मीं...' 'रतिसुखदान...' ह्या गोष्टी सुद्धां चालल्या असत्या पण आधुनिक सुशिक्षित लोकांचे प्रतिनिधी म्हणून सामाजिक बाबतींत नाटकद्वारा लोक जागृति करण्याचा प्रयत्न करणाऱ्या गृहस्थानीं इतक्या निष्काळजीपणानें लिहिण्याचें ठरविलें तर मग 'अहो कष्टं सापि प्रतिदिनमधोधः प्रविशति ।' ह्या भर्तृहरीच्या वाक्याची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं.

पुढें मग अंक संपेपर्यंत कांहीं झालें नाहीं. नाहीं म्हणायला पृ. १२१ वर 'संदेह या पिशाच्या । सोडितों तयाच्या । अतिघोर अशा नाचा । सहाण्यासि सिद्ध होई । येथें ललितबुवा सधनविधनसंयोगासंबंधानें व मार्मिकराव 'नाच्यापोऱ्या' संबंधानें कांहीं म्हणत होते.

इतिश्री समीरगच्चीकुबटीकाचौकडीविरचितायां श्रीमद्भरताचार्यप्रासादिक नाट्यकलाकुठारटीकायां तृतिय ह्रास समाप्तः ।

## हप्ता ४ था.

दुसरे दिवशीं ' चंद्रबिंब बिंबित का-सारिं निर्मलीं ' होण्याचे रम्य समयास आम्हीं बापूसाहेब घरवाले यांच्या प्रासाद शिखरावर अधिरूढ होत्साते स्थिरस्थावर झाल्यावर बाबुरावांनीं वाचण्यास आरंभ केला.

---

## अंक ४ था.

### प्रवेश १ ला.

( सारांशः—सुदामरूपी सौदामिनी नंदिनी बेशुद्ध होईपर्यंत तिच्याशीं कामुकाप्रमाणें वर्तन करून तिला ओळख देते व विलासाची हीं अशीच परीक्षा पाहण्यास तिला सांगते. )

बाबू०-( वाचतात ) " सुंदरी ह्या शब्दाबद्दल ' बाळे ' हा शब्द जर चुकून आला तर माझें स्वरूप हिचें सत्त्व पहाण्याच्या पूर्वीच उघडकीस येईल. शिवाय बतावणी करण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग असल्यामुळें कामुकासारखें कसें वागावें ह्याचें मला गूढच पडलें आहे. ... ... ... ... पण माझी ही भीति विनाकारण आहे हेंच खरें.

मीः—( पद ह्मणतों. ) प्रीति ही मुळाशी साधी विमल एकरूप असते । देहभेद मात्रें भिन्ना वारि खारखी दिसते ॥ ध्रु० ॥ ही जननी हा जनक बंधु हा रमणी भगिनी ही वल्लभ हा । भिन्न दाविती जरि देहां ज्योति एकची वसते ॥ १ ॥

बापूसा.ः—वाहवारे वाहवा ! हा मात्र अस्सल वेदांत आहे ! नाहीं तर शास्त्री बुवा, तुमचा वेदांत काय ह्मणें 'जीवात्मा आणि परमात्मा एकच असून मायेच्या योगानें हें सर्व विश्व निरनिराळ्या रूपानें दृग्गोचर होतें !' त्याच्यावर कोणाचा

विश्वास बसेल काय ! कां त्यांत कांहीं रमणीयत्व आहे, कीं मनोविकारांचे मनोहरत्व आहे, कीं त्यांत कांहीं कवि कल्पना आहे ! ! ! येथें पहा, श्रवणप्रवेश कीं श्रद्धासंभव, श्रद्धासंभव कीं चमत्कृतिजनन, चमत्कृतिजनन कीं हृदयानंदः । 'प्रीति ही मुळाशीं एकरूप असते' ! किती उदात्त कल्पना आणि काय मार्मिक अवलोकन !

**मार्मिक**०—सौदामिनीला एखादा मोठासा मुलगा असता तर त्यावर तिनें चुंबनालिंगनादि प्रयोग कामुकासारखे केले असते कांहो !

**गद्य**०—हो ! काय हरकत आहे ! प्रेमाचें खरें तत्व कळल्यावर मग काय हरकत आहे ? भगिनी, वल्लभ तसा पुत्र ! त्यालाही तिनें ही प्रेमाची मीमांसा शिकविलीच असती.

प्रेमाचें खरें तत्व

**मार्मिक**०—( स्वकृत गातात ) धोतरा मुळाशीं साधा धवल एक रूप असतो । भागभेदमात्रें भिन्नहि वारि सारखा दिसतो ॥ ध्रु० ॥ पानें पुष्पें फळें बिया ह्या. शाखा दाविति भिन्नहि रूपां ॥ केवळ बी जारि हरि जीवा ज्योति एकची वसते ॥ १ ॥ कां अऽगदीं समर्पक दृष्टांत आहे कीं नाहीं.

**शीघ्र**०—अँगदीं समर्पक ! पण कांहो गणपतराव कामुक म्हणजे तिथें प्रेम असलेंच पाहिजे हा सिद्धांत आहे कांहो.

**मी**०—नाहीं बोवा ! कांहो ?

**शीघ्र**०—मग कामुकासारखें वागावें कसें हें गूढ पडलें आहे तेथें प्रीतिचें तत्वज्ञान कशाला ?

**मी**०—अहो कामुकाला प्रीतिचें ढोंग तरी करावें लागतें.

**शीघ्र**०—तरीच ज्या मोह नगरीच्या राजपुत्रानें तिला प्रथमच पाहिली आहे, त्याला तिच्या विषयींच्या " उज्वल प्रेमानें हृदयाला कशी आग

लावून दिलीं आहे पहा" ह्मणून ह्मणावें लागतें. हा प्रीति एकरूप असते ह्याचा एक पुरावाच आहे, कारण मातृप्रेमानें सुद्धां हृदयाला आगच लागत असते !

**वाच०**—पुरावा नाहीं, त्याला प्रत्यंतर ह्मणावयाचें ! कारण पुढें ( पृ. १३१ ) सौदामिनी ह्मणते आहे कीं, आपल्या मुलीचें तिच्या नवऱ्यावर जसससें जास्त प्रेम बसत जाईल तसतशी आईला जास्त मत्सरबुद्धि उत्पन्न होते व हें प्रीतीच्या एकरूपत्वाचें प्रत्यंतर आहे.

सासूचा मत्सर

**मार्मि०**—तरीच बरेंका, भिल्ल लोकांत सास्वा जावयाला प्रथम चोपतात, आणखी कऱ्हाडे लोकांत तर जावयाला विष घालून मारतात !

**वाच०**—असो पुढें वाचा. ही प्रेम मीमांसा पुष्कळ झाली. शिवाय पूर्वी एकदां झालीच आहे.

**मी**—( पद ह्मणतों ) **स्थिर करा दयाळा सास्वान्ता** ।

**वाच०**—सास्वान्ता ! बरोबर म्हणतां आहां का ?

**मी**—( नीट पाहून ) अरें नाहीं ! स्वास्वान्ता आहे. पण मी अलीकडे नाटकांत सास्वान्ताचा म्हटलेलें ऐकतों.

**मार्मि०**—अहो ती कदाचित् म्हणणाऱ्या पात्राची दुरुस्ती असेल ! नंदिनीला नाहीं तरी नंदिनीच्या पात्राला माहीत आहे कीं, जरी सौदामिनी विलासाची सासू होणार आहे, तरी त्यावर रागावते आहे; म्हणून सास्वान्ता !

**प्रसा०**—'**स्वा स्वान्ता**' '**षा शान्ता**' '**का कान्ता**' म्हणजे प्रसाद अगदीं दुथडी भरून चालला आहे.

**मार्मि.**—हें अक्षरसादृश्य मनांत आल्याबरोबर कवींना धन्य वाटली असेल कीं ( त्याच चालीवर ह्मणतात ) **जुळविलें मनोहर साम्या म्यां** ! ! ( टाळ्या ) .

जुळविलें मनोहर साम्या म्यां

**मी**—( पुढें ह्मणतों पृ. १३२ ) **कुसुम नच खोडुनि घ्या.**

**ललित.**—फुलें खोडतात कीं खुडतात हो ? खुडुनि ह्मटलें तर एक मात्रा कमी होते.

**मीः**—( ह्मणतों ) **छळितसां मज आजि तसेंच कां कान्ता**

**बापूः**—हिला तो आवडत नव्हता मग त्याला ' कान्ता ' कां ह्मणते.

**ललित.**—कान्ता म्हणजे 'हे नवऱ्या' इतकेंच. दरबारांत ती त्याची बायको ठरलीच आहे.

**शीघ्र.**—पण गांधर्व विवाह कोठें झाला आहे ?

**मार्मि.**—अहो नुसतें कान्ता नाहीं काकान्ता. मघाशीं सास्वांचा अन्त झालाच आहे, आतां काकांचा !

**बाबू.**—( वाचतात ) **डोकें आपटावयास जाते तों मूर्छित होते.**

**गद्य.**—हें कितपत स्वाभाविक आहे हो ?

**बापू.**—कोणत्याही मनोविकाराचा अतिरेक झाल्याशिवाय मूर्च्छा येत नाहीं. उदाहरणार्थ सुखदुःख क्रोध भीति इत्यादि.

**गद्य.**—मग तिनें जीव द्यावयाचा निश्चय केल्यावर मागून मनोविकाराचा अतिरेक व्हावा हें मुळींच शक्य नाहीं

गद्यगदाधरांच्या त्या म्हणण्याला सर्वांची पुष्टि मिळाली. बापूसाहेबांची कल्पना अशी धावली कीं ' पूर्वी शोकपर्यवसायी नाटकाचा बेत असतांना येथें नंदिनीचा अंत होणार होता पण बेत बदलल्यामुळें नंदिनीला पुन्हां सावध करावी लागली. ' नंतर प्रवेश सुरळीतपणें पार पडला. प्रवेश वाचून झाल्यावर गद्यगदाधरांनीं प्रश्न काढला कीं ' सौदामिनीनें नंदिनीचा इतका अंत कां पाहिला '

**मी**—वाः प्रथमच सौदामिनी म्हणत नाहीं का कीं, **' माझें स्वरूप**

सत्त्व पाहण्याचें कारण काय ? **हिचें सत्त्व पाहण्यापूर्वी उघडकीस ' येऊं नये** म्हणून !

**गद्य०**—पण हें सत्य पहाण्याचें कारण काय ?

**मी**—विलासावर तिचें प्रेम आहे कीं नाहीं. ह्याबद्दल शंका आली म्हणून.

**गद्य०**—हें मुळींच खरें नाहीं पृ. ९१ वर विलासानें सौदामिनीला सांगितलें आहे कीं, ' नंदिनीचें माझ्यावर निर्मळ प्रेम आहे '

**बाबू०**—मी म्हणतों सौदामिनीचा स्वभावच निष्ठुर आहे पृ. १४९ वर ती म्हणतें ' महाराजांनां आतांच्या आतां खरें सांगून टाकूं का ? पण नको. एकदां माझ्या दुर्वर्तनाबद्दल खात्री झाली कीं नंतर माझें शुद्ध वर्तन त्यांना ढळढळितपणें दिसून येईल. थोडावेळ त्यांना दुःख होईल खरें पण सत्य कळल्यावर सुखही परमावधीचें होणार आहे '

**बापू०**—निष्ठुर आहे म्हणावें तर राजाला सोडून जातेवेळचें व त्याला औषध देते वेळचें भाषण व पदें फारच हृदयद्रावक आहेत. कदाचित् चुकून पडलीं असल्यास न कळे !

**बाबू०**—मग फक्त राजावर तिचें प्रेम होतें बाकी तिचें हृदय कठोर होतें असें हिचें स्वभाव वर्णन समजूं.

**गद्य०**—शिवाय तो प्रसंगही थोडा बिकट होता.

**वाच०**—हृदय कठोर खासच आहे यांत संशय नाहीं. कारण मनुष्य पुष्कळ दिवसांनीं वेष पालटून आलें असल्यास एखाद्या ओळखीच्या माणसाची थोडावेळ थट्टा करील, पण ' जिला घट्ट पोटाशीं धरण्यासाठीं बाहू अधीर झाले आहेत ' तिचा जीव जायची पाळी येईपर्यंत थट्टा कोठची.

**मी०**—( रागावून ) पण ही थट्टा म्हणतो कोण !

**वाच०**—थट्टा नाहीं तर इतका अंत पाहण्याचा दुसरा उद्देश काय ! त्या-

पासून तिला यत्किंचित सुद्धां कार्य साधून घ्यायचें नव्हतें किंवा तिचा दुर्वर्तना-बद्दल संशय दूर करायचा नव्हता. ती म्हणते ( पृ. १२७ ) 'माझ्या आवडत्या अर्भकापाशीं ही बतावणी करण्याचें मला प्राणसंकट वाटूं लागलें आहे.' पण हें संकट घातलें होतें कोणी ! आणखी पुन्हां 'नररूपिं वृथा तुज छाळिले' हें म्हणण्याची पाळी आणायला सांगितली कोणी!

सुटलें हो सुटलें गद्य०—( उभें राहून हात वर करून ) सुटलें हो सुटलें !

सर्वजण०—अहो काय !

गद्य०—अहो हें सौदामिनीचें कोडें. तिनें पृ. १२८ वर म्हटल्याप्रमाणें 'नाट्याचा व काव्याचा अभ्यास यावेळीं उपयोगी पडेल पण अनुभवावांचून पुस्तकी विद्या कितीशी टिकणार' ह्याची परिक्षा पाहण्याकरितां ही आपली एक चूप केली.

मार्मिक०—शाबास! जितं ! ! दहा नंबर वर जा !

वाच०—शिवाय येथें दुसरा एक विचार आहे. इंग्रजींत ज्याला 'ड्रॅमॅटिक आयरनी' ह्मणतात ( मराठींत आपण त्याला पात्रभ्रम ह्मणूं ) तो येथें आणण्याचा कवींनीं प्रयत्न केला आहे. पात्रभ्रमाचें उदाहरण म्हणजे वीरतनयांतील वीरसेन मालिनी ह्यांचा प्रवेश; प्रेक्षकांना ही शालिनी नसून मालिनी आहे हें ठाऊक आहे त्यामुळें वीरसेनाच्या चुकीची त्यांना मजा वाटतें.

ललित.—हं हं हं आलें लक्ष्यांत ! ह्याला पात्रभ्रम म्हणण्यापेक्षां जेहेत्ते 'ज्ञाताज्ञाताभाव' म्हणावा; म्हणजे एखादी गोष्ट जेहेत्ते प्रेक्षकांना ज्ञात व पात्रांना अज्ञात असणें.

मी०— हा फार कठिण शब्द आहे त्यापेक्षां 'नाट्यविसंवाद' म्हणणें श्रेयस्कर आहे.

गद्यग.—हा शब्द सोपा झाला वाटतें ? मला वाटतें 'कल्पनाभास' असा शब्द जास्त योग्य दिसेल.

नाट्य कुतुहल

बाबू.—ह्या शब्दानें हा अर्थ नीट कळत नाहीं. माझ्या मतानें 'नाट्यकूतूहल' हा शब्द येथें बरोबर लागू पडेल.

बापू.—मला सुद्धां हा शब्द बरा वाटतो. प्राकृत हवें तर 'नाट्यभूल' म्हणावें.

अरविंद.—जेहेत्ते वेदान्तांत अशा प्रसंगीं 'अध्यास' शब्दाचा उपयोग जेहेत्ते करितात. येथें पाहिजे तर जेहेत्ते त्याला 'नटाध्यास' ह्मणावें.

वाच.—बरें चला आपण त्याला 'नटाध्यास' म्हणूं. समर्पक शब्द शोधुन काढणें कोशकार रानडे वगैरे मोठ्या मंडळींकडे आहे.

सेक्सपीयरमध्यें अशीं उदाहरणें ( Comedy of Errors ) ( भ्रान्तिकृत चमत्कार ) Merchant of Venice ( प्रणय मुद्रा ) व इतर नाटकांत पुष्कळ सांपडतील.

बाबूराव:—'मालती माधवा' मध्यें, ही लवंगिका आहे असें समजून मालती माधवाच्या पायां पडून त्याला आलिंगन देते आहे, व मदयन्तिका निजलेल्या मकरंदाला मालती समजून त्याच्या शेजारींच आपल्या गुजगोष्टी सांगत आहे.

बापुसा०—गुजराथी 'सौभाग्यसुंदरी' नाटकांत उपनायिका ही पुरुष वेषधारी नायिकेवर लुब्ध होऊन तिच्या विनवण्या करीत आहे व शेजारच्या खोलींत कोंडलेला उपनायक तें पाहून चडफडत आहे, तो प्रवेश ही असलाच आहे.

वाच०—या सर्व प्रसंगीं प्रेक्षकांना मौजच वाटते. कांहीं प्रसंगीं अशा फसवणुकीनें नुकसान होत असल्यामुळें करुण किंवा शोकरसही उत्पन्न होत असेल पण येथील हा कसला प्रवेश आणि काय त्यांतला रस ! सौदामिनीसारखी सुशिक्षित स्त्री पुरुषाचा वेष घेऊन शिवाय पुरुषाप्रमाणें तुझ्या नेत्र-

कटाक्षांची मला चांगली ओळख करून घेतली पाहिजे,' 'तुझ्या बाहुपाशाचें बंधन हाच माझा मोक्ष,' इत्यादि जेव्हां भाषणें करते तेव्हां आपल्याला तर अगदीं किळस येते, एवढाच कायतो रस ह्या प्रवेशांत उत्पन्न होतो.

बीभत्सरसाची अजब तऱ्हा

**गद्यगदा०**—ही बीभत्स रसाची अजब तऱ्हा मराठी भाषेला नवीन मिळाल्याबद्दल सर्व महाराष्ट्रभर दीपोत्सव केला पाहिजे.

**बाबू०**—त्याला सोपी युक्ति आहे; आणखी बिन खर्चाची! सगळ्यांनीं आपलीं 'वदनें' 'व्यक्त रदनें' करावीं म्हणजे झालें.

**मार्मि०**—पण तीं 'स्वतां' पाहिलीं पाहिजेत हो! कारण मूकनायकांत म्हटलें आहे.

"व्यक्त रदन बघुनि वदन भागिनिचें स्वतां। दीपोत्सव वाटतसे...."

---

## प्रवेश २ रा.

( सारांशः—नंदिनी विलासाची परीक्षा पाहते व सकाळपर्यंत देह शुद्ध ठेवीन अशी खात्री देते. )

**मी**—( पद म्हणतों ) 'तव करीं तनू देईं करी तियेचा स्वाहा'

तर्पणानंतर स्वाहाकार

**मार्मि०**—मधांशीं तर्पण झालें आतां हा स्वाहाःकार चालला आहे बरं का!

**बाबू०**—( वाचतात ) **विलास**—( स्वतःशीं ) .........वंचकाला विचारावें तर तो साऱ्या मुलखाचा लबाड...'

**मार्मि**०—( मुरका मारून बारीक आवाजानें ) इश्शं ! काय तरी मेला
बाई बाई शर्थ झाली — व्हाटळपणा हा ! बाइ बाइ शर्थ झाली या वंचकापुढें !
किनई फारच माजला आहे हो तो आताशा !

मार्मिकरावांचा हा आकस्मिक गोळीबार ऐकून आम्हीं सर्वजण एकदम चकित झालों. मीं म्हणणारच होतों कीं, त्यांनां वेड लागलें कीं काय? इतक्यांत—

**वाच**०—कां मार्मिकराव, इतकें खुष झालां आहां का ह्या पात्रावर ? आतां तर मी विस्मयानें वेडा होण्याच्या बेतांत आलों.

**मार्मि**०—माझी अगदीं खात्री झाली.

**मी**—ती काय !

**मार्मि**०—कीं नटाकरितां नाटकें होतात नाटकाकरितां नट नाहींत. जेव्हां मुख्य नट वीररसप्रधान नसतात त्या वेळेस नाटकांतील नायकाचें पात्र केवळ, शृंगार, करुण शोकरसात्मक करावें लागतें इतकेंच नाहीं तर भाषणें सुद्धां जितकीं बायकीं करावीं तितकीं जास्त शोभतात.

**मी**०—तुम्हीं बराच वेळ बायक्या नायक बायक्या नायक ह्मणून चालविलें आहे त्यांचीं इतका काय तुम्हांला पुरावा आहे हो !

**बापूराव**–असें कां ? तर मग आपण पाहूंच. आतां यादच लिहून काढतों.

## नायकाचें स्त्रैणत्त्व दाखविणारीं स्थळें.

पृ. १४ नंदिनीला तिची आई दूरदूर करते ह्मणून ह्यांना स्वप्न पडलें कीं दाईनें त्यांना दूर केलें आहे. इतक्या ह्यांच्या मनोवृत्ति नाजुक आहेत,

पृ. २७ वि:०—तर चल आपण कृतज्ञपणें राणीसाहेबांना बरोबरच अश्रुस्नान घालूं.

पृ. ४८ वि०—‘ अभिमत वदमज अघटित, त्यजुं असुं, रणि पडुं, हरिमुखिं वदना धरूं ’

पृ. ५० शृंगीनें तोंड सोडलें असतां उपरोधिक भाषण बोलतो व राजानें जा म्हटल्याबरोबर मुकाट्यानें निघून जातो.

पृ. ६९ वि–'वंचका तुला माझ्या गळ्याची शपथ आहे खरें सांग काय झालें तें '

पृ. ७१ वि०–' शेवटीं नंदिनीनें माझा असा गळा कापावाना '

**मार्मि०**—अग आई ग !

बापू०–पृ. ८७ '**लबाडा**' सांग परवाचें खरें कां आजचें खरें '

' हं आटप लवकर माकड कुटला '

पृ..८८ आग लागो तुझ्या शब्दांना '

**मार्मि०**—जळो तुझें तोंड मेल्या·

**बापू०**—पृ. ९२ येथें तो सौदामिनीपाशीं रडतोच आहे ' कांहीं तरी तोड काढा ' ' काननीं वनीं संचरूं । कां जळीं तटिनी तळीं मरूं। मस्तका मधिं या चिरूं ' त्यांला सौदामिनिसुद्धां म्हणते (पृ. ९३ ) ' तुमच्या सारख्या तरुणानें असे हातपाय गाळणें ह्मणजे मीं तर भित्रेपणाचें लक्षण समजतें.'

पृ. ११७–' आतां यांतून माझी सुटका कसची होणार !

पृ. १३६–' साऱ्या मुलखाचा लबाड '

**गद्यग०**—हीं विलासाचीं भाषणें पहा व त्राटिका नाटकांतील प्रतापराव पिल्या ह्यांचे प्रवेश पहा.

**बापू०**—एके ठिकाणीं मात्र विसरून चूक केल्यासारखी वाटते. ती ह्मणजे दरबारांत विलास अंगराजास म्हणतो ( पृ. ११८ )' गप बैस मूर्खा ! एक शब्द काढशील तर तुझी निंदक जिव्हाच छेदून टाकीन. '

**गद्यग०**—मला त्याचेंही कांहीं नवल वाटत नाहीं कदाचित् अंगराज उघड उघड घमंडानेंदन असल्यामुळें त्याची विलासाला भीति नसेल, तेव्हां चेपून तर पहा साधलें तर साधलें. त्यांतुन अंगराज उलट कांहीं बोलला असता तर फार फार ह्मणजे प्रतीपावर उपसली तशी एकदां तलवार उपसून वीरश्री पाजळली असती म्हणजे झालें.

वीरश्री पाजळली असती.

**बाबू०**:—कारण त्याला ठाऊकच होतें कीं, दरबारांत कोणीं लढूं देणार नाहीं.

**मीः**—( निराशेनें ) तुह्मीं एक दोन शब्दांत प्रतीपावर तलवार उपसल्याचा मुद्दाही उडवून लावला.

**गद्यग०**—अहो नाहींतर काय ? तलवार उपसतांनां तो मापण काय करतो ? 'याच्या शरीरांत घुसण्याला तयार झालेली नग्न तलवारच स्त्रि-यांचा सलज्जपणा सिद्ध करो.'

**मार्मि०**—शाबासरे पट्ठे ! तेवढ्यांत एक कोटि करून घेतली !

**मीः**—( आश्चर्यानें ) काय कोटि ! येथें कोटि आहे ह्मणतां ! तुम्हांला जिकडे तिकडे कोट्याच दिसतात पंडत ( ह्रा पंडत शब्द मीं ध्यानांत ठेवला होता. )

**मार्मिक०**—मग फक्त नंदिनी संबंधानें प्रश्न निघाला असतां सगळ्या स्त्रियांची तरफदारी ह्याला कशाला करायला हवी होती हो ?

**मी**—बरें मग ?

**मार्मिक०**—म्हणून सर्व स्त्री जातीचा सलज्जपणा सिद्ध करण्याला तो एक उदाहरण देतो आहे. तें असें. तरवार ही स्त्री आहे. ती आतां नग्न आहे. पण ज्याअर्थी ती प्रतीपाच्या शरीरांत घुसून आपणास आच्छादित करूं पहात आहे त्याअर्थी ती सलज्ज आहे.

**अर०**—जेहेत्ते मार्मिकरावांना 'तर्कशास्त्रपीरभोंपदुशेखर' ही पदवी देण्यांत यावी अशी माझी सूचना आहे. ( टाळ्या )

मार्मिक०—( विनयाचा आव आणून ) कशाला ! कशाला !

मलाही वाटलें कीं, येथें नम्र शब्दावर कोटी आहे पण अशा ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं कोटि केलेली कबूल करण्यांत कमीपणा येतो 'ऐशा विचारीं चित्तवृत्ति बावरी' होत होती इतक्यांत–

गद्यगद्दा०—तसेंच सौदामिनी मध्यें पडल्याबरोबर काय ह्मणतो. 'दूर हो नीचा ! नंदिनीकडे पासून मला तुझ्यावर शस्त्र चालवितां येत नाहीं.

मी.०—( फिरून बळ येऊन ) मग ह्यावर काय ह्मणतां ?

गद्यगद्दा०—ह्यावर इतकेंच म्हणतों कीं हे जर एवढे शूर वीर इतक्या आवेशानें पुढें गेले होते तर सौदामिनी सारख्या स्त्रीला बाजूस ढकलून पुढें जातां येत नव्हतें काय ? शस्त्रच कशाला चालवायला पाहिजे होतें ? पण ह्यांचें अवसान तितकेंच ! प्रत्यक्ष लढण्याचें त्यांचे मनांत नव्हतेंच. कारण नंदिनीला जें पुरुषासारखें शिक्षण मिळालें तेंच ह्यांना मिळालेलें. त्यांत युद्धकला आली असली तरी जितक्यास तितकीच.

मीः—( त्रासून ) मग तुमचें म्हणणें काय ?

बापू०—म्हणणें इतकेंच कीं कवींच्या हातून ह्यांत कांहीं चूक झालेली नसून जाणून बुजूनच त्यांनीं असा नायक करून पाहिला आहे. इतर सुधारणा तशी ही एक सुधारणा. भरताचार्यांच्या नियमाप्रमाणें धीरोदात्तच नायक कां असला पाहिजे ? सध्यां धीर काढून टाकूं. पुढें उदात्तही काढून टाकतां येईल.

नायक धीरोदत्त का असावा

वाच०—असो; नायक वर्णन फार झालें ! बाकीच्या पात्रांकरतां थोडी वाक शिल्लक असूं द्या.

मग बाबूराव वाचतात–

( नंदिनी विलासाला स्पर्श करून दूर होते. )

विलासः अहाहा ! दुःखाच्या ह्या दाट अंधःकारांत हा पहा चंद्रोदय होत आहे !

अरविं०—जेहेत्ते येथें प्रत्यक्ष उत्तररामचरित्र स्मृतिगोचर होत आहे.

वाच०—मोर नाचे लांडोर नाचे ! उत्तररामचरित्रांतील रामाच्या व सीतेच्या परम सात्त्विक प्रेमाची गोष्ट कोणीकडे व एकमेकांच्या प्रेमाबद्दल सुद्धां ज्यांना संशय आहे अशा आधुनिक लोकांचें सुशिक्षित स्वार्थपर राजस प्रेम कोणीकडे ! नंदिनी बहीण आहे असें कळल्याबरोबर, सौदामिनीच्या एक-मूलस्वाच्या तत्त्वाविरुद्ध, ज्यांचे प्राण कासाविस होऊं लागले असे विलास व शान्तीशीं मत्सरबुद्धी धरणारी नंदिनी ! आणि हिच्या स्पर्शानें त्यांना चंद्रोदय होणार ! उत्तर रामचरित्रांत तो भाग वाचतांच चित्तवृत्ति काय होते व हा भाग पाहतांना प्रेक्षकांची चित्तवृत्ति काय होते हें पाहिलें म्हणजे झालें.

मार्मि०—अहो ही मघाशीं सांगितलेली बीभत्सरसाची नवीन तऱ्हा आहे.

बाबू०—पुढें नंदिनीचें वर्णन ' स्पर्शें चंदन भासवि विषसम '

बापू०—म्हणजे काय ?

अर्थभट—म्हणजे हिचा स्पर्श इतका थंड आहे कीं, हा स्पर्श झाल्यावर मग चंदनाची उटि विषाप्रमाणें भासूं लागते.

मार्मि०—इतके हे गार पडतात ! हिच्या शरीरांत काय आइसफॅक्टरी आहे कीं काय ?

अरविंद—संताप हारकः अत एव शीतलः स्पर्शः ।

वाच०—तें कांहीं असो. हा एक संस्कृत ग्रंथांतला अलंकार आहे. व त्या दृष्टीनें पहातां ह्या पदांतील कल्पना एकपरी मनोहर, आहे पण ही

सवाई पाणिनीशाही

इतकी सवाई पाणिनीशाही का ? अर्थ लावीत बसलें तर नाटक ही संपून जायचें ! असो कोळसा उगाळावा तितका काळाच.

मग प्रवेश संपेपर्यंत कांहीं टीका झाली नाहीं ' सर्वांगनिंद्याची अर्धांगी ' येथें ' आवेशाचे भरांत कोटी ' बद्दल बाबूराव कांहीं पुटपुटले.

विलासाच्या शोकरसपूर्ण पदाची तारीफ झाली व ह्या प्रवेशावर पूर्वी टीका झाली असल्यामुळें एकदम पुढचा प्रवेश हातीं घेतला.

---

## प्रवेश ३ रा.

( सारांश०—प्रतीपाला स्वयंवराची हकीगत कळली तेव्हां त्याला वाटलें क्षुदामाचा वेष धारण करणाऱ्या स्त्रीनें नांदिर्नांचा विश्वासघात केला म्हणून राजाला सावध करण्यासाठीं राजसभेंत जाण्याचा बेत करितो. )

**बाबू०—आज दोन दिवस त्या स्त्रीचा शोध केला पण पत्ता नाहीं...............उद्यांपर्यंत मला माझ्या खऱ्या वेषानें मेघनाथांकडे जातां येत नाहीं यास नाइलाज आहे'**

गप्पग०—कां हो कां जातां येत नाहीं ? मेघनाथाच्या दरबारांतच याला अपघात होणार असें ठरलें होतें कीं काय !

मी—अहो असें नाहीं. गुप्त राहिलें म्हणजे अपघाताचा संभव कमी,

गप्पग०—असें नाहीं कांहीं ! पुत्राशीं एका स्त्रीवरून कज्जा व्हावयाचा होता. 'हा प्रतीपराजा व आपला बाप ' ह्या समजुतीनें मुलगा मारण्यास येणार नव्हता. शिवाय त्याच्या समजुतीनें मुलाला आपल्या राजधानींत सुमंताच्या स्वाधीन करून तो आलाच होता मग दरबाराला जायला काय हरकत होती ?

बापू०—असा प्रश्न काय विचारतां हो ? मग शेवटल्या प्रवेशांत क्षुदामाची त्यांची अवचित गांठ पाडून बाप लेकांची लढत लावायची आहे तें कसें जुळेल ?

गप्पग०—मग प्रतीपाला मुळीं आणायचाच होता दोन दिवस उशीरानें. दोन दिवस आधीं आणून क्षुदामाच्या शोधार्थ त्याला अहोरात्र भटक्या मारीत फिरवण्याची काय जरूर होती.

प्रतीपाला भटक्या मारीत फिरविणें

बापू०—खरेंच इतकी ह्या राजेसाहेबांना क्षुदामरूपी स्त्रीला शोधण्याची उत्कंठा कां झाली होती कोणास ठाऊक ? मागील अंकांत ( पृ. १०५ ) हे मरवीर म्हणतात—

'असें कांहीं आणीबाणीचे प्रसंग असतात कीं....स्वगत भाषण सुद्धां बंद ठेवावें लागतें........एक क्षण गमाविला तर ती जनसमुद्रांत तेव्हांच नापत्ता होऊन जाईल ?' एवढा तिच्यावांचून यांच्यावर काय आणीबाणीचा प्रसंग गुदरला होता. ?

**मीं०**—कां बरें ! तिच्यावर त्यांचें पुत्राप्रमाणें प्रेम होतें व त्यानें पूर्वी ह्मठल्याप्रमाणें ( पृ. ८१ ) तिचा हेतु व कर्तव्य हीं त्याला कळून यावयाचीं होतीं.

**बापू०**:—मग स्वयंवराच्या गडबडीनंतर सर्व कळलें असतें. शिवाय तिच्या शोधाकरितां तरी दरबारला जाणें अवश्य होतें.

**मीः**—डिटेक्टिव्हचें काम असें उघडपणें होत नसतें, त्याला...

**बापू०**:—आतां आह्मी हरलों ! पुढें चालूं द्या.

---

## प्रवेश ४ था.

( **सारांशः**—राजा क्षुद्रामाला शिक्षा करण्याच्या बेतांत आहे. तोंच प्रतीप येऊन राजाला ह्मणतो कीं, येथें एक महादुष्ट स्त्री आहे. विलासाला वाटतें कीं, तो नंदिनीसंबंधानेंच बोलत आहे, ह्मणून तो तलवार घेऊन त्याच्यावर धांवतो. इतक्यांत सौदामिनी मधें पडून ते बापलेंक आहेत असें सांगते व राजवैद्याकडून राजाच्या डोळ्यास औषधानें उत्तम दृष्टी देऊन आपलें स्वरूप प्रकट करते. प्रतीपाचे सुमंताचे हातांत कैलासनाथाचें पत्र पडल्यामुळें त्यानें कैद करून पाठविलेला भृंगी येतो. कैलासनाथ आपला अपराध कबूल करतो. उकरून काढलेली पेटी ( गुप्त अशी जी मंजूषा ) दाखवून विलास आपलें प्रतीपपुत्रत्व सिद्ध करतो, त्याला नंदिनी मिळते. कैलासनाथास क्षमा होऊन, त्याची अंगना-शिक्षणाचे कामावर नेमणूक होते, ( Director of Female Instruction. होतो. )

**मी०**—( पद म्हणतों )'........ओता या लवणा या डागीं'

**बापू०**—डाग म्हणजे काय हो?

**मार्मि०**—स्टेशनावर हमाल नाहीं का म्हणत 'आपले डाग मोजून घ्या'?

**ललि०**—अहो डाग म्हणजे शाईचा डाग!

**शीघ्रक०**—पण त्याला लवण कशाला पाहिजे? मिठानें शाईचा डाग जातो कीं काय?

**बाबू०**—छे! हो! भाजलेली जागा बरी झाली म्हणजे नाहीं का भाजल्याचा डाग म्हणत!

**अर्थभट**—संदर्भावरून मला डाग म्हणजे व्रण—बरा न झालेला—असा अर्थ दिसतो आहे पण हा अर्थ कोणत्या कोशांत दिला आहे कोणास ठाऊक?

**वाच०**—नेवढाच शब्द अडतो आहेना? शेकडा नव्याण्णव मार्क, पुढें.

**बाबू०**—( वाचतात ) पृष्ठ १५८. **कैलासनाथ...राणीसाहेब आतां आपण ज्या कुलक्षयाला भीत होतां तोच घडून येणार आहे.**

**गद्यग०**—अरे बापरे! हा काय, फिरून रुपाछत्राखालीं घेतल्याबद्दल आशिर्वाद वाटतें.

**बापू०**—हें ऐकून राणीसाहेबांची छाती धडधडायलाच लागली असेल कीं, हें काय नवीन संकट उपस्थित झालें?

**शीघ्र०**—कैलासनाथ आणखी काय आशिर्वाद देतात तें ऐकूं.

**बाबू०**—( वाचतात ) **कारण अज्ञानी स्त्रिया हें आपलें कुळ त्याचा आपण खरोखरच क्षय करून टाकणार.**

सगळेजण आश्चर्यानें पांच मिनिटें पर्यंत स्तब्ध होतात.

**गद्यगदा०**—ही एक जातां जातां विनोदाची चुणूक दाखविली आहे बरें का!

मार्मिक०—मी ज्या दिवशीं गुप्तमंजूष पाहण्यास गेलों होतों त्या दिवशीं नाटक झाल्यावर दाराकडे जातांना एक गृहस्थ दुसऱ्यास म्हणाला ‘आपली आर्यभूमि आतां विधवा होणार आहे’ त्याबरोबर दुसरा दचकला. त्याला भृंगांची फार मजा वाटली होती. तो म्हणाला “शुभ बोल नाऱ्या आणि मांडवाला आग लागली. ही विधवा कशी काय होणार” तेव्हां गृहस्थ नंबर एक म्हणतात ‘अहो मिंटोसाहेबांनीं प्राथमिक शिक्षण फुकट द्यावयाचें ठरविलें आहे हें तुह्मी ऐकलेंच असेल, तेव्हां आतां आजपर्यंत ज्या अज्ञानाला आर्यभूमिनें वरिलें होतें त्याचा नाश होणार!’ त्या गृहस्थाच्या अगाध विद्वत्तेचा रस्त्यावरच्या एका कुत्र्याला सुद्धां अतिशय आनंद होऊन त्यानें नो उच्च स्वरानें व्यक्त केला.

आर्यभूमि विधवा होणार

मी०—(शेवटलें पद ह्मणतों) ‘वंद्यचि ते जगतीं जन साचे। सुखविति जे मनुजवृंद ॥ ध्रु० ॥ अमूल्य भूवनीं विद्या धन ते। सदैव अर्पुनि सार्थक करिति तनूचें ॥ १ ॥ ऐसे महात्मे कृतिनें जे उजळिती सकळ दिगंत। त्यांची अनुकृति करावया देवो बुद्धि अनंत ॥ २ ॥

गद्यग०—खूप स्तुति केली आहे बुवा! पण अमूल्य विद्याधन एरव्हीं देतात त्या देण्यापेक्षां खरोखरीच अमूल्य ऊर्फ फुकट दिलें तर एवढी स्तुति सार्थ आहे. पैसे घेऊन काय इतर धंदे तसा हा धंदा!

मार्मि०—हे कवी कां शिक्षण खात्यांत आहेत कायहो!

मीं—नाहीं बोवा, कां!

मार्मि०—नाहीं म्हटलं इतकी स्तुति कां केली आहे? तें असो पण कैलासनाथावर राणी इतकी खुष कशी?

कैलासनाथाचें पात्र

मी—अहो आतां ती सर्व जगावर खुष आहे व कैलासनाथाच्या विद्येवर व चातुर्यावर तर ती फारच खुष आहे. शिवाय कवी त्याच्यावर खुष आहेत नां!

गणग०—एवढें चातुर्य काय आहे आम्हाला कळूंद्या तरी.

मी—त्यांनींच आपल्या तोंडानें सांगितलें आहे. (पृ. १५८) मीच स्वप्नाचा अर्थ सांगून राणीसाहेबांना घालविलें.

वाच०—ह्यांत काय चातुर्य दाखविलें ! कोणीही हें करूं शकला असता ! शिवाय, मीं पूर्वी एकदां ह्मटल्याप्रमाणें देवीचें स्वप्न अशा सारख्या आकस्मिक चमत्कारांचा फायदा घेऊन नाटक सुरू करणें ह्यांत नाटककर्त्याकडे कमी-पणा येतो. 'मूक नायकां' त राजावर केयूराचा हल्ला व तेथें विक्रांताचें आकास्मिक येणें व त्याला सोडविणें ह्या गोष्टीचा फायदा घेतला आहे. तसेंच 'वीरतनयां' त वाघाची शिकार, वाघानें शालिनीवर उडी टाकणें व शूरसे-नानें तिला सोडविणें ह्याचा फायदा घेतला आहे. चांगले नाटककार असल्या गोष्टींचा बहुतेक फायदा घेत नाहींत. नाहीं म्हणायाला 'विक्रमोर्वशीया' मध्यें राजा ऊर्वशीला दैत्यापासून सोडवितो आहे पण तेथें देखील ह्याचा फायदा फक्त राजाचें ऊर्वशीला दर्शन एवढ्यापुरताच घेतला आहे. 'टेंपेस्ट' मध्यें प्रास्पेरोनें वादळ बुध्या घडवून आणलें होतें.

बापूसा०—हें तर झालेंच; पण स्वप्न गृहीत धरलें तरी चातुर्य काय होतें तें पुढेंच होतें; तें म्हणजे राणीच्या पाठीवर हेर ठेवून तिच्या हालचालीची बातमी ठेवणें व तिला ह्या जगांतून नाहींशी करणें. कारण राणीबद्दलचें त्यांचें मत आहे कीं, 'राणीला दूर करतां आलें तर माझे हेतु सिद्धिस गेलेच ह्मणून समजावें.' (पृ. १२) पण असें कांहीं न करिता हे राजश्री म्हणतात 'राजाला इतका तर्क होईना कीं, त्याच्या नाजूक राणीनें केव्हांच स्व-र्गाचा रस्ता सुधारला असला पाहिजे,' (पृ. ३५) ह्याला म्हणावें धोरणी ! बरें सहा वर्षें पर्यंत स्वस्थ बसले; कारण काय तर 'मेघनाथ व प्रतीप यांचा सूड एकदम उगवितां यावा अशा संधीची सहा वर्षें वाट पाहिली.' (पृ. ३५) प्रतीपाविरुद्ध यत्किंचितही खटपट न करितां नुसत्या सं-

धीची वाट पाहणारे हे मोठे जंगीच मुत्सद्दी समजले पाहिजेत ! आणि तोंपर्यंत राणी विद्यासंपन्न होऊन परत येईल ही कल्पनाही नाहीं व त्याची व्यवस्थाही नाहीं. निदान राणीविषयीं राजाचें मन तरी कलुषित करून ठेवावयाचें होतें.

**मी०—( वाचतों ) आपल्याला अंधता आणि अशक्तता आणिली.**

**बापू०**—कोठें एक विष माहीत झालें होतें त्याच्या एकट्याच्या प्रभावानें हें केलें. ह्यांत काय मोठी विद्या होती ! मात्र राजावर छाप ठेवणें ह्यांत जग कौशल्य होतें.

**वाच०**—पण हे राजे ह्मणजे काय होते हेंही लक्ष्यांत आणिलें पाहिजे. माझ्या मतें हे मेघनाथ म्हणजे नुसते दहपे होते. स्वतःची अक्कल म्हणून त्याला कांहीं नव्हतीच. राणी गेल्यावर त्याच्यावर छाप ठेवण्याचें कांहींच कठीण नव्हतें असें त्यांनीं स्वतःच कबूल केलें आहे.

**मी—( वाचतों ) सर्व राज्याची सूत्रें आपल्यां ताब्यांत घेतली.**

**बापू०**—राजावर छाप टेवल्यावर हें अगदींच सोपें आहे. कोणीही साधारणबुद्धीचा मनुष्य हें करूं शकेल.

**मी—( वाचतों ) शृंगीचा नंदिनीशीं विवाह करायचा घाट घातला व भृंगीला प्रतीपाकडे युवराज म्हणून पाठविलें.**

**वाच०**—विलासाचें रहस्य दाईकडून कळल्यावर हें मनांत येणें साहजिक आहे. पण त्यांतही एक घोड्याएवढी चूक केली. प्रतीपानें विलासाजवळ एखादी खूण अवश्य दिली असली पाहिजे ही एवढीशी गोष्ट ज्याच्या लक्षांत आली नाहीं तो चतुर कसला ? व प्रतीपानें भृंगीजवळून खूण मागावयास पाहिजे ह्याची कधींनाहीं पूर्वी आठवण किंवा शक्यता भासली नाहीं !

**बापू०**—कायहो 'दाई नुकतीच मेली' ( पृ. ८९ ) तेव्हां तिला आतापर्यंत केला सनाथाचा संशय आला नाहीं काय ! राजवैद्याला, नंदिनीला व विलासाला

सुद्धां जो संशय आला तो दाईला आला नाहीं काय ? बरें नाहीं असें समजूं; तरी तिची कैलासनाथावर इतकी श्रद्धा कशी बसली कीं तिनें आपलें रहस्य त्याला सांगून टाकलें ? बरें जर श्रद्धा होती म्हणावें तर फक्त विलासाची हकीकत सांगून पेटीबद्दल त्याजवळ कांहींच कसें सांगितलें नाहीं ?

नाटकाच्या नांवाची मीमांसा

**वाच०**—एकंदरींत जिच्यावरून नाटकाला नांव दिलें त्या गुप्तमंजूषसंबंधानें कथाभाग अगदींच कच्चा राहिला आहे इतकेंच नाहीं तर त्या गुप्तमंजूषेवांचून कांहीं अडलेंही नसतें. कारण खुणांवरून ती दाई व तिनें पाळलेला उर्फ तिचा 'मानींव' मुलगा विलास, हींच प्रतीपाकडून आलेलीं माणसें हें सहज सिद्ध करतां आलें असतें. व कैलासनाथाच्या हातीं पेटी लागली असती तरी देखील तिचा त्याला उपयोग झाला नसता. कारण आपल्या पुत्राचें नांव सुद्धां प्रतीपाला माहीत होतें असें पेटीवरील 'हे महाभाग्यशाली विलासा' (पृ. ८४) ह्या शब्दांवरून स्पष्ट होतें. ह्या सगळ्यांवरून 'मृच्छकटिका' प्रमाणें 'गुप्तमंजूष' नांव देण्याच्या प्रयत्नांत कवीचा कसा घोंटाळा झाला आहे हें दिसून येतें.

**गद्य०**–बरें मुद्राराक्षसांतील चाणक्याप्रमाणें कृती जरी विशेष सांगतां आल्या नाहींत तरीं धूर्त व चतुर प्रतिनायक बोलण्यांत तेव्हांच दिसून आला पाहिजे. उदाहरणार्थ आथेल्लोमधील यागो ऊर्फ जाधवराव पहा. नाहीं म्हणायला कैलासनाथांनीं तिसऱ्या प्रश्नाची अजब युक्ति शोधून काढली हें एक म्हणतां येईल, पण ह्या प्रश्नावर आलेल्या शंकेचें कैलासनाथानें केलेलें समाधान जरी विलासास पटलें असें कवींनीं दाखविलें तरी तें अगदीं पोकळ आहे हें मधाशीं आपण पाहिलेंच. बाकीचीं कैलासनाथांचीं भाषणें म्हणजे नुसतें महाभारत आहे. आणखी सगळ्याच्या शेवटी ह्यांनीं केलेली कुलक्षयाची कोटि ! त्या वेळेस प्रतीपानें किंवा मेघनाथानें एक जोडा काढून मारला असता तरी बावगें झालें नसतें.

**वाच०**—हो ! पुरे ! ! बरं गणपतराव आणखी कोणती तुमच्या आवडीचीं पात्रें आहेत.

**मी**—शृंगी, भृंगी.

**वाच०**—ती उत्तम साधलीं आहेत कबूल ! पण तीं गौण आहेत. अंगराज, वंगराज, वंचक ह्यांच्याबद्दलही विवेचन झालेंच आहे.

**ललि०**—महत्त्वाच्यांपैकीं राहिलीं नंदिनी व सौदामिनी.

**गद्य०**—मग प्रतीप व दाईशिवाय बाकी राहिलीं कोण !

**शी. क०**—कां सुनंदा तुलिका तारा नाहींत का !

**गद्य०**—खरेंच ! ती एक कवींनीं अशक्य बहार करण्याचा प्रयत्न केला आहे नाहीं का !

**बापू०**—नंदिनीचें पात्र म्हणजे एक आपला चिखलाचा गोळा आहे झालें.

नंदिनीचें पात्र म्हणजे एक चिखलाचा गोळा आहे

तिच्यांत शालिनीची तडफही नाहीं किंवा सरोजिनीचें मनोहर कवित्त्वही नाहीं. तिचें सगळ्या नाटकांत काम म्हणजे थोडासा बेचव शोक करायचा इतकेंच. प्रथम आईबद्दल मग प्रियकराबद्दल शोक करिते आहे व शेवटीं आईनें आपला नाहक छळ केलेला पाहून तोच प्रयोग विलासावर करते आहे. एकंदरींत ह्या पात्रानें कोणाच्याही चित्तवृत्ति आकर्षण होत नाहींत. प्रथम आईचा थोडासा शोक सहा वर्षांपुरताच आहे, हें प्रेक्षकांनां ठाऊक आहे. प्रियकराच्या शोकाच्या प्रवेशांत वंचकाच्या कोट्यांनीं घाण झाली आहे व शेवटचा तिच्या छळाचा प्रवेश व विलासाच्या छळाचा प्रवेश हे खोटे आहेत, हें प्रेक्षकांना ठाऊक आहे. त्यामुळें ह्या पात्राचें स्वारस्य अजीबाद गेलें आहे.

**वाच०**—पुढें सौदामिनी. हिच्या स्वभावाचीं अंगें दोन. एक अर्वाचीन

सौदामिनीचें पात्र

व एक प्राचीन, ह्यांचा मिलाफ कसा काय झाला आहे हें पाहूं. अर्वाचीन भाग ह्मणजे तिची स्त्रीशिक्षणाविषयीं उत्कंठा व प्रतीपाच्या नगरांत व भरदरबारांत-राज्याला अरे तुरे

ह्मणून-पुरुषासारखें वागण्याचें धारिष्ट. प्राचीन भाग म्हणजे तिचें राजावरील अप्रातिम प्रेम—इतकें कीं विलासाचे सांगण्यावरून तिचे मनांत राजाविषयीं संशय आला होता तो क्षणभरसुद्धां टिकला नाहीं:—व तिचा म्हसोबा खंडोबा इत्यादि वरील विश्वास. ह्यापैकीं तिला घर सोडून जाण्यास अनुकूल गोष्टी म्हणजे शिक्षणाविषयीं उत्कंठा व दैविक गोष्टींवर विश्वास; व प्रतिकूल म्हणजे पतिप्रेम व स्त्रियांच्या अंगीं असलेला स्वाभाविक विनय. पैकीं पतीला सोडल्यावर पतिप्रेमाची अडचण नाहींच; राहिला विनय. त्याची सोय लावतां येईना तेव्हां एक थोडी युक्ति केली ! ह्या विनयाला अजीबाद हांकून दिला म्हणजे काम झालें ! शिष्टाचारापुरता 'युअर अंबल सर्वंट' ऊर्फ 'ही अधमा दासी आपुली' इतका बस् आहे.

अंबल सर्वंट उर्फ अधमा दासी

**बाबू०**-मेघनाथाचे शब्द 'मिरवितिल सभांमाजि थाट माट दाट भाट बनुनि मिळवितिल तयांवरि सुयशा' हे पुढें खरें ठरलेंच.

**ललित०**-प्रतापाला भेटल्याबरोबर एक पद त्याच्या तोंडावर टाकून दिलें 'या कोणि वाली'

**शीघ्र०**-आणखी लागलीच कवींच्या नियमाप्रमाणें अरे जारे सुरूं झालें ('न मजवरी नृपा। करिं रे अकृपा ॥') एकदां 'आपण' ह्मणावें एकदां 'रे' ह्मणावें एकदां 'तुम्ही' म्हणावें ('निज जनकाहुनि मानिन तुम्हां।') मारे गल्लत उडवून दिली आहे.

**मार्मि०**-हंः । विनयाबद्दल उगीच तुम्ही ओरड चालविली आहे, ती कांहीं उपयोगाची नाहीं ! आमच्याजवळ प्रत्यक्ष प्रतापाचें सर्टिफिकीट आहे प्रतापाचें ! पृ. ७९ 'तूं पुरुष म्हणून सांगितलेंस तेव्हां तुझ्यासारखा धीट चतुर व शूर

विनयाबद्दल प्रतापाचें सार्टिफिकेट

असा पुरुष त्रिभुवनांत नसेल असें मला वाटूं लागलें; स्त्री आहेस असें कळतांच तुझ्यासारखी विनयवती व सुशील स्त्री कुठेंही आढळणार नाहीं असें वाटूं लागलें आहे!'

बापू०-परमेश्वरा! त्या वेळचे पुरुष आणि स्त्रिया कशा होत्या हें तुलाच माहित!

मीः-तुह्मीं इतके विनयाबद्दल हांका मारतां पण सौदामिनीचें अविनयाचें असें एक तरी कृत्य दाखवून द्या!

गयग०—होय कां? पान १५० काढा. तेथें एक सौदामिनीनें कोटि केली आहे 'आमचें दोघांचें एकेच ठिकाणीं भोजन, पान, आसन, शयन' माझ्या मतें असले शब्द कोणत्याही सुविनीत स्त्रीच्या मुखांतून चार चौघांत आपल्या नवऱ्यासंबंधानें सुद्धां निघायचे नाहींत. हिचा वेष पुरुषाचा असला तरी अंतःकरण स्त्रीचे होतें कीं नाहीं? आणखी पुढें तिला आपलें स्त्रीत्व प्रकट करावयाचें होतें कीं नाहीं? असले शब्द कोणाच्याही तोंडून निघालें तरी कसेसेच वाटतात. राजानें तर ऐकून सुद्धां घेतले नाहींत.

वाच०—बरें हें राजाला जास्त जास्त चिडवण्यासाठीं करिते आहे ह्मणावें तर थट्टेमध्यें सुद्धां जी स्त्री, कोणत्याही सद्धेतूनें ह्मणा, आपल्या विषयीं नवऱ्याच्या मनांत वाईट कल्पना उत्पन्न करण्यास तयार होईल तिला

बेशरम किंवा आह्मी बेशरम तरी ह्मणूं, किंवा ती हिंदु नाहीं असें तरी
हिंदु नाहीं ह्मणूं, कारण कोणत्याही सुविनीत हिंदु स्त्रीला असली गोष्ट विषासारखी वाटेल.

बाबू०—अहो हें तुमचें वर्णन हिंदु अशिक्षित स्त्रियांना लागू पडेल, पण अशी दगडी युगांतली मर्यादा काढून टाकण्याचें काम सुशिक्षणानें केलें नाहीं तर तें सुशिक्षण हवें कशाला? सौदामिनी आतां जुनी हिंदु स्त्री राहिली नसून तिला-पुरुषांसारखें इतकेंच नाहीं तर-पुरुषांचेंच शिक्षण मिळालें आहे. व वेषही पुरुषाचा आहे; त्या अर्थी स्त्रिया सुशिक्षित झाल्या असतां पुरुषापेक्षां-

ही अचाट कसे पराक्रम करून दाखवितील हें आतां तिला सिद्ध करून दाखविणें भाग आहे.

**मी**—अहो हें नाटक आहे. व्यवहार नाहीं.

**बापू०**—नाटक झालें म्हणून काय झालें. फार तर व्यवहारांत न येणारे असे कांहीं प्रसंग म्हणजे राजे, राण्या, वाघाची शिकार, आत्मगत भाषणें (पौराणिक नाटकांत दैविक गोष्टी) वगैरे एकवेळ आणलेल्या चालतील म्हणून भाषणें व स्वभाव वगैरे जितकीं व्यावहारिक साहजिक व स्वाभाविक येतील तितकें नाटक उत्तम. बरें नाटकांत तरीं भरदरबारांत नवऱ्याला (पुरुषवेषानें कां होईना) 'मीं लावितों त्वदंगा सहस्रशः भुजंगा' असें म्हणण्या इतकी बेफाम स्त्री कोठें सांपडेल ?

बेफाम स्त्री

**मी**—पण हें सर्व कैलासनाथाच्या कचाट्यांतून नंदिनीला सोडविण्यासाठीं करावें लागलें.

**बाच०**—मग त्याकरितां आपल्या हातानें एखादें पत्र राजाला पाठवून विवाहाचा दिवस पुढें ढकलतां आला असता किंवा उत्तरें कोणीं न दिल्यामुळें होणारी राजपुत्राची निवड पुढें ढकलतां आली असती.

**मी०**—पण राजानें तिचें ऐकलें असतें कशावरून ? तिच्यावर त्याची पहिल्या इतकी प्रीति आहे कीं नाहीं कळावें कसें !

**गद्य.**—ह्याचा तर तिला वैराग्याचे वेषांतच उलगडा झाला होता; पृ. १८३ काढा 'परवां माझी प्रियतमा मला भेटणार आहे तिचें नुसतें डोळे भरून दर्शन जरी झालें तरी मी आपल्या या वैद्यकास सर्व शास्त्रांत श्रेष्ठ ठरवीन तिला पाहिल्यावर मग या देहाचें कांहीं झालें तरी हरकत नाहीं.

**मी०**—हो खरेंच, पण तिला अज्ञातवास होताना ?

**बापूसा०**—मग राजाला पाठविण्याचे पत्रांत आपला ठावठिकाणा हकीकत लिहिली नाहीं म्हणजे झालें. नुसत्या पत्र पाठविण्यानें अज्ञातवासाचा भंग होत नाहीं.

अज्ञात वास मीमांसा

**गद्यग०**—ब ब काय हो! राजवैद्याला ओळख दिल्यानें अज्ञातवासाचा भंग झाला नाहीं का?

**मार्मिक०**—अहो असें काय करतां? कोणाला तरी अज्ञात राहिलें ह्मणजे अज्ञात वास!

ह्या बाबतींत मात्र माझी 'मतिही निमाली कालिया' असें मला वाटलें पण कांहीं तरी सांगायचें ह्मणून म्हणालों 'तिला शिक्षण द्यायचें होतें तें काम झालें. आतां नवऱ्याचा जीव वांचविण्यासाठीं एखादे दिवसानें अज्ञातवास मोडला म्हणून काय झालें!'

**गद्य०**—ही कांहीं तरी सबब आहे, हें तुमचें तुह्मांलाच ठाऊक आहे.

**शीघ्र०**-( आठवून ) हो खरेंच ज्याच्यामुळें हें 'स्त्रीशिक्षणाचें नाटक' म्हणून गाजत आहे असें तें सौदामिनीचें शिक्षण तरी काय होतें तें मला कळूं द्या.

**बाबू०**—नाटकांत दिग्दर्शन केलेलें म्हणजे काव्यें व नाटकें ह्यांचा अभ्यास ( पृ. १२८ ).

**शीघ्र०**—त्याचा परिणाम म्हणजे प्रीतिचें एकरूपत्व! बाकी तिच्या शिक्षणापूर्वीचें 'तुजवीणें कुणाला' व नंतरचें 'ईश्वर पंकज' त्या पदांपैकीं पहिलेंच पद सरस आहे व दुसऱ्यांत अवडंबर मात्र जास्त आहे.

**बाबू०**—दुसरें उखाणे ओळखणें.

**बापू०**—ही मात्र जाडी विद्वत्ता खरी!

**गद्य०**—पण मी म्हणतों विलास नंदिनी व सौदामिनी ह्यांनां पूर्वीं कोडीं सोडविण्याचा नाद असेल! व घातलेलीं कोडीं कदाचित् त्यांपैकींच विलासासाठीं घातलीं असतील!

**बाबू०**—तिसरें रुग्ण मार्जार.

**गद्य०**—हें प्रतीपाच्या राजधानींतलें एक ठराविक विष दिसतें.

**मार्मि०**-चक् चक्! तुम्ही अगदींच अरसिक लोक आहां! एवढा खटाटोप करून सौदामिनी प्रतीपाच्या राज्यांतून एम् ए. एम् डी. होऊन आली. आणि तिच्या विद्येचे असे धिंडवडे करितां!

अहो वैदग्ध्यम्

**अर०**—अहो वैदग्ध्यम्!

गद्य०—बरें गणपतराव तुम्ही आतां खरेंच मनापासून सांगा कीं ह्या नाटकामुळें स्त्रीशिक्षणाचे कामीं लोकमतावर कितीसा परिणाम होऊं शकेल ? किंवा झाला आहे ?

मी ह्यासंबंधानें खोल विचार मुळींच केला नव्हता म्हणून मुत्सद्दीगिरी लढवून टाळाटाळी करीत ह्मणालों ' स्त्रीशिणापासून होणारे फायदे ज्याप्रमाणानें दाखविले असतील त्यावर तें अवलंबून आहे. '

गद्य०—तेंच ! कोणचे फायदे तुह्मीं दाखवितां आहां ? मात्र ते फायदे म्हणजे असे दाखविले पाहिजेत कीं, स्त्री अशिक्षित असती तर त्या वेळेस काय झालें असतें व सुशिक्षित असल्यानें काय झालें, हें ढळढळीत दिसले पाहिजे. मागें एकानें एक २५-३० पानांचें कविताबद्ध मत्तमयूरी वृत्तांत ह्या विषयावर फारच सोपें व उत्तम पुस्तक प्रसिद्ध केलें होतें. त्यांत अशी एक गोष्ट ( कल्पित ) आहे कीं एका अडाणी बाईला एक मनुष्य तिच्या नवऱ्याकडून पत्र घेऊन आला. तेव्हां तिनें त्याला बसायला पाट, साखर पाणी व एक रुपया दिला व ह्मणाली हें पत्र मला एवढें वाचून दाखवा. त्यानें पाहिलें कीं ही भोळी आहे. वाचतां वाचता त्यानें असें वांचून दाखविलें कीं ' पत्र घेऊन येणाराजवळून मीं दहा रुपये घेतले आहेत ते त्यास द्यावे ' व तिला तें खरें वाटून तिनें रुपये दिले ! !

बाबू०—मीं म्हणतों शारदा नाटकासारखें तरी पाहिजे. तेथें कोदंड व भुजंगनाथ दोन्ही प्रेक्षकांसमोर असून पाटीभर दागिने घालणाऱ्या भुजंगनाथापेक्षा निर्धन कोदंडाशीं लग्न लावण्यांत मुलींची किती खुषी असते, आणि म्हातारा नवरा व त्याचा होऊं पहाणारा सासरा हे लोकांच्या किती तिरस्कारास पात्र होतात, हें कवींनीं फारच उत्कृष्ट रीतीनें दाखविलें आहे. तरी मीं म्हणतों कीं तें नाटक आनंदपर्यवसायी केल्यानें असल्या विचाराचें अश्लाघ्यत्व व्हावें त्याच्या दहाव्या हिश्शानें सुद्धां उघड झालें नाहीं. तरी त्या नाटकाचा लोकमतावर फारच परिणाम झाला आहे हें कोणालाही कबूल करावें लागेल.

गद्य०—तसा मीं म्हणतों येथें स्त्रीशिक्षणासंबंधीं काय परिणाम झाला आहे ? शारदानाटकानें थोड्या तरी बायांनां वाटलें असेल, कीं म्हाताऱ्या नवऱ्याला मुलगी देऊं नये, व कांहीं तरी म्हाताऱ्यांनां बुद्धि झाली असेल, कीं

एखाद्या कोंवळ्या मुलीच्या संसाराचा आपण सत्यानाश करूं नये; पण गुप्तमं-

नाटकामुळें स्त्रियांना कोण शिकवूं लागले

त्रूषमुळें एखाद्याला तरी असें वाटलें असेल कां कीं आपल्या मुलीला किंवा बायकोला किंवा बहिणीला लिहिण्यावाचण्याला शिकवावें म्हणून!

शीघ्र०—अहो वाढणार कसें? येथें स्त्रीशिक्षणाचे फायदे काय दाखविले आहेत? नंदिनीला पुरुषासारखें शिक्षण दिलें आहे—

मार्मि०—त्याचा फायदा पुरुषांचा अनुभव!

शीघ्र०—व सौदामिनीनें स्वतः धडपड करून मिळविलें.

मार्मि०—त्याचा फायदा उखाणे ओळखणें व दरबारांत आपल्या व नवऱ्याच्या अब्रूची नासाडी करणें.

मी—कां रुग्ण माजांराबद्दल—

मार्मि०—हो खरेंच! कोणी आपल्या नवऱ्याला विष देईल म्हणून सर्व विषें व त्यावरील उतारे मटीरियामेडिका मधून शिकण्यासाठीं बायकांनीं श्रीगणेशायनमःला सुरुवात केलीच पाहिजे!

बाबू०—घरें वैद्यकीची थोरवी दाखवावयाची आहे तर ती विद्या नंदिनीला कां नाहीं शिकविली? जर तिला शिकविली असती तर तिला अगदींच कांहीं करतां आलें नसतें असें नाहीं. तिला कैलासनाथाचें कपट माहीत होतें (पृ. १३३).

गद्य०—तसेंच सौदामिनीलाही, सर्व विद्या घरींच राहून शिकतां आल्या नसत्या काय? त्यासाठीं तिला देवीकडून हद्दपार कशाला करविण्यास हवें होतें! राजानें कांहीं अडचण केली नसती, कारण तिच्या आग्रहावरून नंदिनीला शिक्षण मिळतच होतें.

मार्मि०—मग रेसिडेन्सीचे फायदे कसे मिळाले असते?

वाच०—माझ्या मतें नंदिनीचें व सौदामिनीचें हीं दोन भिन्न कथानकें आहेत. हें नीट लक्ष्यांत येण्यासाठीं आपण नाटकाचा सारांश पाहूं. अंक १ ला. सौदामिनीला स्वप्न पडून ती प्रतापाच्या आश्रयास जाते. विलासाची जन्मकथा व त्याची राजकन्येवर प्रीति. अंक २ रा. सहा वर्षांनंतर मेघनाथ

विलासाला नंदिनीपासून हांकून देतो. कैलासनाथ भृंगीला प्रतीपाकडे पाठवितो. सौदामिनी परत निघते. अंक ३ रा. विलासाला नंदिनी बहीण आहे कीं काय ह्याबद्दल संशय पडतो. ( ह्या संशयाचें नाटकाच्या संविधानकाला मुळींच सहाय्य नाहीं. ) सौदामिनी राजाला औषध देते व दरबारांत पुरुष वेषानें नंदिनीची प्राप्ति करून घेते. अंक ४ था विलास प्रतीपावर तलवार उगारतो पण सौदामिनी त्याला थांबवून त्याचें जन्माचें रहस्य व आपलें स्वरूप उघड करिते. भृंगीला पाठविलेल्या पत्रावरून कैलासनाथाचा बेत ढासळतो व नंदिनी विलासाला मिळते.

मार्मि०—आणखी एक राहिलें.

वाच०—तें काय ?

मार्मि०—राज्यांत जिकडे तिकडे किमेल हायस्कुलें आणि कॉलेजें स्थापन होतात.

वाच०—ह्यावरून पहा कीं, सर्व संविधानक कसें विस्खलित आहे तें! मीं मघांशीं दोन कथानकें म्हटलीं पण तीन म्हटलीं तरी चालेल. मात्र पहिल्या नाटकांतील तीन प्रथम हें लक्षांत ठेवा कीं, विलासाच्या व नंदिनीच्या भिन्न कथानकें छळाचे घाणेरडे प्रवेश हे नाटकांत नाहींत असें समजून चालावयाचें. मग चवथा अंक म्हणजे ( प्रतीपाचा आत्मगत भाषणाचा बारीक प्रवेश सोडून ) एकच खुलाशाचा शेवटचा प्रवेश राहिला. आतां विलास व नंदिनी ही पहिल्यापासून दरबारसीनपर्यंत एकमेकांवर प्रीति करून आहेत; त्यांचा कोणाशीं अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं; ह्मणजे त्यांच्या वांचून संविधानक यत्किंचितही थांबत नाहीं. नसेंच सौदामिनी मेघनाथ व कैलासनाथ ह्यांचें एक निराळेंच कथानक व शृंगीभृंगीचें तिसरें, म्हणजे शृंगीभृंगीमुळें कथानकांत कांहीं एक फरक होत नाही. नाहीं म्हणायला कैलासनाथाची तिसऱ्या प्रश्नाची धडपड शृंगीकरितां आहे, पण प्रत्यक्ष शृंगी शेवटपर्यंत निराळाच पडतो. शृंगी व भृंगी हे हास्यरसाकरितां व कैलासनाथाच्या खटपटीला आधार म्हणून चिकटवून दिले आहेत दरबारसीन म्हणजे ह्या कथेचा शेवटच ह्मणावयाचा कारण नंतर एक उलगड्याचा प्रवेश राहिला.

**बापू॰**—तुमच्या म्हणण्यावरून असें दिसतें कीं, खरें नाटक तिसऱ्या अंकापासून सुरु होतें. पहिले दोन अंक केवळ उपोद्‌घातादाखल आहेत, म्हणून अर्ध्या-फारतर एका अंकांत आटपून टाकून पुढील कथाभाग छळांच्या प्रवेशापेक्षां कांहीं तरी चांगल्या रीतीनें वाढविण्यास हवा होता, व ह्या रीतीनें स्त्रीशिक्षणाचे आणखी कांहीं फायदे दाखवितां आले असते.

पहिले दोन अंक उपोद्‌घाता-दाखल

**मार्मिक॰**—पण ह्या गोष्टी हव्या आहेत कोणाला? आम्हांला फक्त 'अमुक अमुक गृहस्थ ना! जाडे विद्वान! काय त्यांची संस्कृतशब्दप्रचुर भाषा!' असें लोकांनीं म्हटलें म्हणजे झालें. (स्वकृत गातात)

**सुगम करुनि दूषवी स्वनाट्य, कीर्ति मी यदा।**
**रौरव नरकीं पडो झडो कृतघ्न मी सदा ॥ ध्रु॰ ॥**
**प्लाट नको, अर्थ नको, कोटि असो सर्वदा ।**
**लटपट बहु करुनि विकट प्रकट होउं शारदा(विद्वत्ता)॥१॥**
**मद्वचन क्लिष्ट म्हणुनि कष्ट होत ज्यां पदां ।**
**त्याच पदीं तेंच वचन नच सुधरिन मी कदा ॥ २ ॥**

**अर॰**—इतिश्री सभीरगच्चीक्लबटीकाचौकडीविरचितायां श्रीमद्भरताचार्यप्रसादिक नाट्यकलारुकुठारटीकायां चतुर्थ हप्ता समाप्तः।

**बापू॰**—अनेन नाट्यकलारुगुप्रहरणेच्छयाकृतेन नाट्यकलारुकूकुठारटीका-पुराणेन तेन आराध्यदेवता श्रीमद्भारताचार्यस्वरूपी परमेश्वरः प्रीयतांनमम।

ॐ तत्सद्ब्रम्हार्पणमस्तु।

हरयेनमः। हरयेनमः। हरयेनमः।

**मार्मिक॰**—हें आख्यान जो श्रवण करील, पठण करील, मनन करील, त्याचें पारायण करील त्याला कविता देवी मातृभाषेची अखंड सेवा करण्याची बुद्धि देऊन जन्मोजन्मीं त्यांचे घरीं धनधान्य संपत्ति आयुरारोग्य यांची समृद्धि करील.

# उपसंहार.

याप्रमाणें वरील वाग्यज्ञाची समाप्ति झाल्यावर मी घरीं गेलों व झालेल्या प्रकाराबद्दल स्वस्थपण विचार करीत ईझिचेअरवर पडलों. नंतर पहिले दिवसापासून झालेल्या एकंदर वादविवादाचें थोडक्यांत सार काढावें असा विचार मनांत करून खालीं लिहिल्याप्रमाणें नाट्यकलारुक्कुठाराचा पुन्हां अर्क काढून तो वाचकांस अर्पण करीत आहे.

## नाटक रचावें कसें—

नाटकाचे मुख्य प्रकार दोन प्राचीन किंवा अर्वाचीन मग तें संगीत असो किंवा गद्य असो. प्राचीन कथानक जर रंगभूमीवर उठवायचें असेल तर तत्कालीन स्त्रीपुरुषांची बोलण्याची, चालण्याची, पोशाखाची, गाण्याची, लढण्याची वगैरे तऱ्हा ज्या प्रकारची असेल तेच प्रकार हुबेहुब नाटकांत आले पाहिजेत. व अर्वाचीन प्रवेशापेक्षां वरील प्रकार बरोबर साधायला कविचातुर्य उत्तम प्रकारचें लागतें. नाटकाचें प्रधान अंग अभिनय हें आहे. गायन हें नव्हे. हें नेहमीं लक्ष्यांत ठेवून गद्यामधून पद्यरचना करणें तो करावी. पद्यें वरचेवर म्हणावयास लागली तर नटास उत्तम अभिनय करणें अशक्य आहे. नाटकाचे अंक स्वभावतःच होतील तसे पाडावे. किती अंकीं नाटक करावयाचें हें आधीं ठरवून मग नाटक लिहूं नये. याचप्रमाणें नाटक शोकपर्यवसायि किंवा आनंदपर्यवसायि करणें हें कवीनें किंवा नाटक करणाऱ्या कंपनीनें आधीं कधीं ठरवूं नये. जसें कथानक वळेल व जसजसें एखाद्या पात्राचें चित्र वठत जाईल त्याप्रमाणें करावें. नाटक कंपन्यांनीं पैसे कमी मिळतील या भीतिस्तव शोकपर्यवसायी नाटक करून दाखविण्याला कधीं लाजूं नये. गद्यनाटकांतील भाषणें व्याख्यानपर असूं नयेत. पदोपदीं कोट्या करणें याला भाषणचातुर्य म्हणत नाहींत. प्रत्येक व्यक्तिचें स्वभावचित्र स्पष्ट व मनावर कांहींना कांहींतरी परिणाम करणारें पाहिजे. प्रवेश नुसते चटकदार असून उपयोगी नाहींत, तर प्रत्येक प्रवेशामध्यें

उत्तम प्रकारची संगति असली पाहिजे. गद्यनाटकापेक्षां संगीत नाटककारांवर फार जबाबदारी असते. कारण अनेक प्रसंगीं पद्यें रसभंग करितात ते प्रसंग कोणते हें त्यानीं आधीं ओळखलें पाहिजे. कविता म्हणण्याचा उमाळा आल्याशिवाय पात्रांचें तोंडीं पद्यें घालूं नयेत आणि प्रत्येक पद्यांतील अर्थ स्फूर्तिजन्य असून चमत्कृतिजनक असला पाहिजे. रचना प्रसादपूर्ण असावी. प्रसाद म्हणजे सोप्या पण रसपूर्ण वाणीनें येणारी प्रसन्नता. शब्दचमत्कारासाठीं कठिण रचना कधींही करूं नये. अर्थ सरळ साधला तर मग वाटतील ते चमत्कार करावेत. अर्थ हें कवितेचें शरीर आहे व अलंकार हे त्यावरील दागिने आहेत. शब्दचमत्कार हा एकप्रकारचा अलंकार आहे तरी त्याचा अतिरेक झाल्यानें शरीरास सुरूपता न येऊन उलट कुरूपता येईल. भाषा मनास वाटेल तशी लिहूं नये. भाषेचा अभ्यासच केलापाहिजे. भाषा कमावली पाहिजे. नाटकांतील पद्यें त्या त्या प्रसंगाला त्या त्या वेळेला व त्या त्या रसाला अनुकूल अशींच ठेवावींत. बाष्कळ कोट्या लोकांना हसवितात म्हणून कवींनीं आपली इभ्रत व अधिकार विसरतां कामा नये. कोणतेंही नाटक कांहीं तरी विवक्षित हेतु मनांत धरून लिहिल्यास तो हेतु जसा ग्रंथकाराचे मनांत असेल तसाच त्या नाटकांतही नखशिखांत भरून राहिला पाहिजे तरच प्रेक्षकांचे मनावर थोडासा ठसा उठेल. नाटक लिहिण्याचा हेतु अमुक आहे हें सांगून उपयोगी नाहीं तर तो ढळढळीत लोकांपुढें मांडला पाहिजे. त्यांत भीडभाड कामाची नाहीं.

असो याप्रमाणें जे जे मुद्दे सुचले ते ते विस्तृतपणें कथन न करितां आठवले तसे टिपून ठेवले व मग दुसरे दिवशीं वाचस्पतींचे घरीं गेलों व त्यांस ते मुद्दे दाखविले. त्यांनीं ते सर्व वाचून त्यांत काय काय सुधारणा केल्या व मग ते सर्व मुद्दे अगदीं थोडक्यांत सूत्ररूपानें प्रसिद्ध करण्याचें कसें ठरविलें वगैरे प्रकार पुढचे खेपेस वाचकांस सादर करीन.

समाप्त

# आयुर्वेदिक औषधी पेटी.

' नर करणी करे तो नरका नारायण हो जाय '

आयुर्वेदिक औषधी पेटी अथवा कामधेनु—कामधेनु म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, करामतीनें या पेटीपासून वाटेल तें मिळवितां येतें! पण कोणाला? जो ही पेटी खरेदी करील व त्यांत सांगितल्याप्रमाणें वागेल त्याला! कारण विशेष खटपट न करितां संपत्ति व राजऐश्वर्य मिळवितां येणें, रोग्यांना निरोगी करितां येणें, दुर्बलांना सबल करितां येणें, वांझ स्त्रियांना पुत्रवान् करितां येणें, अशक्तांना सशक्त करितां येणें व मुबलक द्रव्य मिळवितां येणें, इतक्या क्रिया केवळ या पेटीपासून करितां येतात. ही अनुभवसिद्ध क्रिया आहे, सबब प्रसिद्ध करीत आहोंत. तर गरजू लोकांनीं एकवेळ अनुभव घेऊन पहावा. मात्र यांस एक अट आहे. ती अशी कीं, जो कोणी ही पेटी खरेदी करील तो साधारण उद्योगी व सुशिक्षित असला पाहिजे; या शिवाय दुसरें कोणतेंही साधन करण्यास नको. इतक्या क्रिया घरबसल्या गांवातल्यागांवांत करितां येतात. या पेटींतील सर्व औषधें शास्त्रोक्त रीतीनें तयार केलीं असल्याकारणानें रोगावर बेमालूम काम करतात. हीं औषधें म्हणजे आयुर्वेदाचें सार आहे; ही स्वदेशी द्रव्यांनीं अती मेहनत घेऊन तयार केलेलीं आहेत; हीं सर्व रोगांवर देण्यास लायक अशीं आहेत; हीं अक्षयी टिकणारीं आहेत, यांत अपायकारक द्रव्यें नसून सत्वगुण प्रधान आहेत; हीं आबालवृद्धांना सारखीं लागू पडणारीं आहेत; यांच्या सेवनापासून सर्व तऱ्हेचे रोग विशेष पथ्य न करितां बरे होतात, अशी ही बहुमोल व बहुगुणी औषधें आटोपसर व मजबूत अशा पेटींत चांगल्या तऱ्हेनें सुशोभित करून ठेविलीं आहेत. तर सर्व देशबांधवांस, राजे रजवाडे, जहागिरदार, श्रीमंत व्यापारी, सुखवस्तुलोक, शाळामास्तर, प्रवाशी, व ग्रामवासी या सर्वांना आमची विनंति एवढीच आहे कीं, ही पेटी घ्या व आयुर्वैद्यकीच्या प्रभावाचा अनुभव पहा ? सर्वांस घेतां यावी

